चित्रमयजगत्मधील

# निवडक व चटकदार गोष्टी.

---

मुद्रक व प्रकाशक—

शंकर नरहर जोशी,

१०२६ सदाशिव, चित्रशाळा प्रेस, पुणें.

---

सन १९२७.

---

किं. १ रु.

# प्रस्तावना.



चित्रमयजगतमध्यें १९१० सालापासून १९१४ पर्यंत ज्या गोष्टी प्रसिद्ध झाल्या, त्यांतील निवडक गोष्टी या पहिल्या भागांत समाविष्ट केल्या आहेत. गोष्टींची निवड शक्य तितकी कसोशीनें करण्यांत आली असल्यामुळें गोष्टी वाचकांना आवडतील, अशी आम्हांस खात्री आहे. हल्लींच्या काळीं कथा-वाङ्मयाकडे बहुजनसमाजाचें बरेंच लक्ष वेधल्यामुळें त्याच्यापुढे उच्च दर्जाचें वाङ्मय ठेवणें जरूर आहे. वाचकांपुढें आचारविचाराना घातुक अशा गोष्टीच जर वारंवार येऊं लागल्या, तर त्यांची आवड बिघडते व सुश्लिष्ट वाङ्मयहि त्यांना नकोसें होतें. आजकाल कादंबऱ्या, गोष्टी वगैरेंना कसलें स्वरूप प्राप्त होत आहे, हें सांगण्याची अवश्यकता आहे असें नाहीं. तेव्हां अशा वेळीं वाचकांची अभिरुची बिघडूं नये म्हणून चटकदार पण भारदस्त, मनोरंजक पण बोधप्रद अशा गोष्टी त्यांच्यापुढें ठेवणें जरूर आहे. या उद्देशानें आम्ही हा प्रथम भाग प्रसिद्ध करीत आहों.

या गोष्टी जेव्हां प्रसिद्ध झाल्या, तेव्हां त्या वाचकांना आवडल्या होत्याच. आज जरी ह्या गोष्टी प्रसिद्ध होऊन बराच काळ लोटला असला, तरी त्या गोष्टींचें नाविन्य नष्ट झालें नाहीं. त्या वेळचे व आजचे प्रश्न एकच असल्यामुळें वाचकांना नुकत्याच घडलेल्या गोष्टी आपण वाचीत आहों असें वाटेल.

[redacted]र पुढील भाग लवकरच प्रसिद्ध होतील.

प्रकाशक.

## चित्रमय जगत्मधील

# निवडक गोष्टी.

## पागलपूरचे महाराज व त्यांचे खानगी कारभारी.



त्तर हिंदुस्थानांतील एका मोठ्या रेल्वेच्या जंक्शन स्टेशनच्या प्लॅटफार्मवर कलकत्ता-पंजाब मेलच्या सेकंड क्लासच्या डब्यामधून एक तरुण प्रवासी सकाळीं सात वाजता उतरला. त्याचें वय पंचवीस-तिशीच्या सुमाराचें असावें. त्याच्या बरोबर सामानसुमान फारसें नव्हतें. परंतु जें होतें तें अगदीं ऐटदार-फॅशनेबल-असें होतें. एक कातड्याची पोर्टमेंटो, एक हँड-बाक्स, चामड्याच्या वाद्यांनीं आवळलेला एक बिछाना फराळाचें सामान व फळफळावळ ठेवण्याची एक वेताची टिफिन-बास्केट इतकाच काय तो त्याच्याजवळ बोजा होता. पोषाख सर्व इंग्रजी तऱ्हेचा असून डोक्यास मात्र एक फेटा होता. त्यावरूनच हा कोणी युरोपियन किंवा युरेशियन नसून कोणी तरी हिंदी गृहस्थ आहे असें जाणाऱ्या येणाऱ्या लोकांच्या लक्षांत येई. स्टेशनवर उतरल्याबरोबर त्यानें एका कुलीस हांक मारून आपलें सामान त्याच्या स्वाधीन केलें व स्टेशनच्या बाहेर येऊन त्यानें एक फर्स्टक्लास व्हिक्टोरिया भाड्यानें ठरवून महाराजा पॅलेस हॉटेलकडे गाडी हाकण्यास कोचमनला हुकूम केला.

स्टेशनपासून महाराजा पॅलेस हॉटेल मैल सव्वा मैलावरच होतें. तेथें गाडी चार पांच मिनिटांतच येऊन दाखल झाली. या उतारूनें हॉटेलच्या मॅनेजराला आपल्या येण्याची कांहीं तरी आगाऊच सूचना दिलेली असावी. कारण उतारूची गाडी हॉटेलच्या पोर्चमध्यें उभी रहाते तोंच मॅनेजरांची स्वारी सामोरी आली. तरुण-प्रवाशी व्हिक्टोरियामधून खालीं उतरतो आहे तोंच मॅनेजर साहेब

यांच्याशीं शेकहँड करून म्हणाले, ' आपण कलकत्त्याहून पाठविलेला टेलिग्राम मला कालच सायंकाळीं मिळाला. आपल्यापाठीं दोन फर्स्टक्लासच्या खोल्या मीं मुद्दाम राखून ठेविल्या आहेत. '

या भाडोत्री आगतस्वागताबद्दल प्रवाशी गृहस्थानें मॅनेजरांचे इंग्रजी तऱ्हेनें आभार मानून मॅनेजरच्या मागोमाग ते आपल्या खोल्यांकडे गेले.

या फॅशनेबल प्रवाशानें जरी हॉटेलच्या मॅनेजरास तार केली होती तरी त्याचें नक्की नांवगांव त्याला माहित झालें नव्हतें; कारण त्या तारेंतील मजकूर फक्त ' फर्स्ट क्लासच्या दोन खोल्या राखून ठेवा ' इतकाच होता व तार पाठविणाराचें नांव तारमास्तराच्या चुकीनें नीट लिहिलें न गेल्यामुळे तें मॅनेजरला धड वाचतांही आलें नव्हतें, तेव्हा नवीन आलेले पाहुणे कोण, हे जाणण्यास हॉटेलचा मॅनेजर फार उत्सुक झाला होता. त्याला फार वेळ बुचकळ्यांत पडण्याचें कारणच राहिलें नाहीं. कारण हॉटेलच्या एका नोकरानें नवीन पाहुण्यांचें सामान खोलींत आणून ठेविलें. तें प्रथम मॅनेजर उभे होते त्यांच्या समोरच आणून आदळलें. तेव्हां हँड-बाक्स आणि पोर्टमँटो या दोहोंवरही पंडित सुवर्णचंद्र बार-अॅट-ला ' Pandit Suvarnchandra Bar-at-Law ' अशीं इंग्रजी अक्षरें सोनेरी शाईनें कोरलेलीं होतीं.

पंडित सुवर्णचंद्र हे दिसण्यांत चांगले खुपसुरत असून, त्यांची कांति गौरवर्ण होती. पंचवीस सत्ताविशीचें वय दिसत होतें; परंतु हनुवटीवर किंवा वरच्या ओंठावर लवसुद्धां दृग्गोचर होत नव्हती. त्यांच्या शरिराचा बांधा आटपशीर होता; तथापि थोडा आडव्या पेराचा दिसत होता. केस शीख लोकांप्रमाणें लांबलचक वाढविलेले असून त्यांजवरून पंजाबी तऱ्हेचा फेटा ते बांधीत असल्यामुळें त्यांच्या वरवर दिसण्यांत नाजूक अशा चेहेऱ्याला मर्दानीपणाची थोडी उसनी ऐट एका विलक्षण प्रकारची शोभा देत होती. त्यांचा आवाज कोमल, मृदु, व कर्णमनोहर होता व त्यांचें हंसणें तर कोणाही मनुष्याचे चित्त रिझविण्यास समर्थ होईल, अशा प्रकारची त्यांत जादू भरलेली आहे कीं काय, असें सर्वांस वाटे. बॅरिस्टरसाहेबानीं प्रवासामध्यें मोठ्या जाड्या बनातीचा डबल-ब्रेस्ट कोट घातला होता व सफेत, कडकडीत, आणि लकाकणाऱ्या अशा कॉलरच्या भोंवतीं गुंडाळलेला काळ्या रेशमाचा व मध्यें पांढरे ठिपके ठिपके असलेला असा जाडा नेकटाय त्यांनीं छातीच्या मधोमध कोटामध्यें सोडून दिला होता. हॉटेलांत उतरण्यास आलेल्या या पाहुण्याविषयीं मॅनेजरच्या मनामध्यें चांगलीच आदरबुद्धि उत्पन्न झाली.

वरील पाहुण्यास त्यांच्या खोलींत सोडून मॅनेजर साहिब पोर्चजवळील आपल्या ऑफिसांत येऊन बसले तोंच पांच दहा मिनिटांत तारखात्याचा एक सायकल-स्वार एक अर्जंट तार घेऊन आला.

सायकल-स्वार म्हणाला, ' या हॉटेलांत कोणी प्रायव्हेट सेक्रेटरी टु हिज हायनेस धी महाराजा ऑफ पागलपूर असे गृहस्थ उतरले आहेत काय ? '

मॅनेजर म्हणाले, ' नाहीं. ' परंतु त्यांनीं तारेचा लिफाफा हातांत घेऊन पाहिला व वरचा पूर्ण पत्ता वाचला तो पुढील प्रमाणें होता. ' पंडित सुवर्णचंद्र बॅरिस्टर पागलपूरच्या महाराजांचे प्रा. सेक्रेटरी '

मॅनेजर स्वतःच तार घेऊन बॅरिस्टरसाहेबांच्या खोलीपर्यंत गेले व बॅरिस्टर-साहेबांच्या हातात तार देऊन म्हणाले.

' आपण पागलपूरच्या महाराजांचे प्रायव्हेट सेक्रेटरी हे मला प्रथम आपण कळविले नाहीं. त्यामुळे मघाशीं आपल्याशीं वागण्यात माझ्या हातून कांहीं चूक झाली असली तर माफ करावी. '

बॅ सुवर्णचंद्र म्हणाले, ' पागलपूरच्या महाराजाचा मी प्रायव्हेट सेक्रेटरी आहे हें तुम्हास ओघाओघाने कळणारच होतें, म्हणून स्वतः होऊनच मी अमुक हुद्दार आहें, याबद्दल तुम्हांस मी कांहीं माहिती दिली नाहीं. '

असें म्हणता म्हणताच सेक्रेटरीसाहेबांनी तारेचा लखोटा फोडला व तो वाचून मॅनेजराकडे वळून ते म्हणाले:—

' या शहरी आठ दिवसांनीच ले. गव्हर्नर जो दरबार व ॲग्रिकल्चरल अँड कॅटल-शो ( शेतकीचे व गुरांचे प्रदर्शन ) भरविणार आहेत, त्याकरितां पागलपूरचे महाराज यावयाचे आहेत. मी त्यांची उतरण्याची वगैरे व्यवस्था लावण्याकरितां पुढें आज आलो. खुद्द महाराज प्रदर्शनाच्या फक्त आदल्या दिवशीं येणार असें पहिल्याने घाटत होतें. परंतु या तारेवरून महाराजांची स्वारी उद्यांच येथें परिवारासह दाखल होणार असें कळतें. आतां अवघ्या या एका दिवसात परक्या ठिकाणी त्यांच्या उतरण्याची व्यवस्था मी कशी लावूं शकणार ? कांहीं समजत नाहीं. मॅनेजरसाहेब, तुम्ही या शहरचे माहितगार; सबब या कामीं मला तुम्हीं शक्य ती मदत अंतःकरणापासून केली पाहिजे. मी आपणांस सांगतो कीं, आपले श्रम कांहीं या कामीं व्यर्थ जाणार नाहींत.

मॅनेजर म्हणाले, ' महाराजसाहेबांबरोबर लवाजमा व परिवार किती असण्याचा संभव आहे त्याची नक्की माहिती मला मिळेल तर उतरण्याची व्यवस्था करण्यास सोपें होईल. '

सुवर्णचंद्र म्हणाले, आमचे महाराज अगदीं साध्या [illegible] राहतात. त्यांना ज्या त्या ठिकाणीं दरबारी थाट व भपका दाखविण्याचा मनापासून पूर्ण कटाळा आहे. आतां कसें झालें तरी ते महाराजच, तेव्हां १०१५ माणसांचा लवाजमा आणि दोन चार गाड्या सामान हें त्यांच्याबरोबर असावयाचेंच.'

'मग आमच्या हॉटेलमध्यें सुद्धां उतरण्याची महाराजांची सोय करतां येईल. निराळा बंगला पाहण्याची सुद्धां जरूरी नाहीं. माझ्या या हॉटेलांत मंकीपूरचे महाराज व फाजलाबादचे नबाब अशी बडी बडी मंडळी पूर्वीं उतरून गेलेली आहे पाहिजे तर मी त्यांचीं सर्टिफिकिटेंही आपणांस दाखवितो.'

'सर्टिफिकिटांची कांहीं जरूरी नाहीं. हॉटेलच्या इमारतीचा सबंद तिसरा मजला आमच्या महाराजांना उतरण्यास तुम्हास देतां येत असला तर त्यांना येथेंच उतरविण्याची मी तजवीज करतों.'

'तिसरा मजला सर्व न द्यायला काय झालें? आज संध्याकाळीं तुम्ही म्हणाल त्याप्रमाणें सर्व व्यवस्था लावून देतों.'

'ठीक आहे! मग येथेंच उतरण्याची व्यवस्था लावा. दरबार व प्रदर्शनाचा मंडपही या हॉटेलपासून फार दूर नाहीं. तेव्हां येथेंच उतरणें महाराजासही सोईचें वाटण्याचा संभव आहे.'

येणेंप्रमाणें हॉटेलचे मॅनेजर व बॅरिस्टर सुवर्णचंद्र प्रायव्हेट सेक्रेटरी यांचें संभाषण झाल्यावर मॅनेजरनें हॉटेलच्या भव्य बंगल्याचा सर्व तिसरा मजला खाली करवला व पागलपूरच्या महाराजांच्या स्वारीची वाट पहात त्यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी त्या रात्रीं आपल्या खोलींत झोपीं गेले. एक कोणी मोठा महाराज आपल्या हॉटेलांत उतरणार म्हणून मॅनेजरासही फार आनंद झाला।

ज्या शहरामध्यें हें हॉटेल होतें त्या शहरीं एक मोठा दरबार भरावयाचा होता व शेतकीकडे लोकांचें लक्ष विशेष लागावें म्हणून गुरांचे व शेतकी सामानाचें प्रदर्शन भरविण्याचेंही त्या प्रांताच्या ले. गव्हर्नरांनीं ठरविलें होतें. शिवाय राजनिष्ठेच्या अवश्यकतेबद्दलही ले. गव्हर्नर जमणाऱ्या मंडळीस प्रदर्शन उघडण्याच्या समारंभाच्या वेळीं बराच उपदेश करणार अशी अटकळ असल्यामुळें त्या प्रांतांतले दूरदूरचे राजे, महाराजे, अधिराजे, खानबहादुर, रायबहादुर, जहागिरदार, तालुकदार वगैरे मंडळी या प्रदर्शनाप्रीत्यर्थ त्या शहरीं जमावयाची होती. तेव्हां पागलपूरच्या क्षात्रकुलावतंस राजनिष्ठ महाराजांनींही या प्रसंगीं

दरबार व प्रदर्शनाला हजर राहण्याचा बेत करावा हें त्यांच्या उच्च कुलास व शीलास साजेसेच होतें.

आदल्या दिवशींच्या तारेप्रमाणे पागलपूरचे महाराज दहा बारा माणसांच्या लवाजम्यानिशीं × × × पूरच्या स्टेशनवर पोंचले. प्रायव्हेट सेक्रेटरी बॅ. सुवर्णचंद्र व हॉटेलचे मॅनेजर हे हारतुरे वगैरे सामान घेऊन स्टेशनवर महाराजांस सामोरे गेले होते. कलकत्ता–पंजाब मेल थांबतांच फर्स्ट क्लासच्या डब्यांतून एक उंच, दाढी वाढविलेला, दिसण्यांत भव्य व तेजःपुंज असा सुमारें चाळीस वर्षांचा पुरुष खालीं उतरला. तो उतरल्याबरोबर बॅरिस्टर सुवर्णचंद्र पुढें सरसावले. हॉटेलचे मॅनेजरही त्यांच्या मागोमाग होतेच. बॅ. सुवर्णचंद्र यांनीं हेच उतरलेले गृहस्थ पागलपूरचे महाराज होत अशी हॉटेलवाल्या गृहस्थाला खुणेने इषारत केली, व मॅनेजरने आणलेले हारतुरे महाराजास समर्पण केले. महाराजाबरोबरची दहापंधरा मंडळी जवळच्या सेकंड क्लासच्या डब्यांतून उतरली व नंतर मॅनेजरांनीं सर्व मंडळींना गाड्या वगैरे पुरविण्याची व्यवस्था केल्यावर सुमारें एक तासाच्या आंतच महाराजा पॅलेस हॉटेलमध्ये पागलपूरचे महाराज व त्यांचा सर्व परिवार येऊन मुक्काम करता झाला.

पागलपूरचे महाराज व त्यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी यांनीं पॅलेस हॉटेलच्या तिसऱ्या मजल्यावर तळ दिल्यानंतर दरबारासाठीं येणारे पुष्कळ बडे बडे लोक या हॉटेलमध्ये उतरले. ही सर्व मंडळी पागलपूरच्या महाराजांचें ऐश्वर्य व त्यांच्या प्रायव्हेट सेक्रेटरींची हुषारी, बोलण्याचालण्याची चतुराई व येईल त्याच्यावर छाप ठेवण्याची हातोटी यांची वाहवा करूं लागली. खुद्द हॉटेलमध्यें मंकीपूरचे महाराज व फाजलाबादचे नबाब यांच्याही स्वाऱ्या उतरल्या व हॉटेलजवळच्या बंगल्यामध्ये एक दोन राजे, महाराजे व मोठे जमीनदार उतरले होते. परंतु पागलपूरच्या प्रायव्हेट सेक्रेटरी इतका हुषार खानगी कारभारी कोणाजवळच नव्हता असें म्हटल्यास हरकत नाहीं.

प्रदर्शनाचा दिवस जसजसा जवळ येऊं लागला तसतशी बाहेरगांवच्या मंडळींची अतोनात गर्दी उसळली व पागलपूरचे महाराज ज्या हॉटेलमध्ये उतरले होते त्या हॉटेलांत एक इंचभर जागा देखील रिकामी राहिली नाहीं. तरी पाहुण्यांची गर्दी येतच होती. तेव्हां हॉटेलचा मॅनेजर सुवर्णचंद्र यांच्याकडे आला व म्हणाला.

‘ आपण जर मेहेरबानी करून आपल्या दोन खोल्यांमध्यें थोडी जागा कराल तर आणखी चार पाहुण्यांची व्यवस्था मला लावतां येईल ! ’

बॅरिस्टर सुवर्णचंद्र या गोष्टीस एकदम कबूल होतना. ते म्हणाले, ' महाराजां-करितां जरी तिसरा मजला असला तरी माझ्या म्हणून मला दोन स्वतंत्र खोल्या लागतातच. '

मॅनेजर म्हणाला, ' तिसऱ्या मजल्यावरची जागा आपले महाराज व त्यांच्या बरोबरचे दहा सरदार यांना पुरून उरेशी आहे. आपण जर माझ्यावर कृपा कराल तर एवढी विनंति मान्य करा. चार पाहुण्यांना सामान ठेवण्याला व रात्रीं निजण्याला तरी आपल्या एका खोलींत जागा द्या. मग त्याची मी इतर व्यवस्था म्हणजे बसण्याउठण्याची व जेवण्याची माझ्या खासगी खोलींत करतों. '

सुवर्णचंद्र म्हणाले, ' हे चार गृहस्थ कोण हें समजल्याशिवाय मला कांहींच सांगतां येत नाहीं. कारण वाटेल त्या फटिंगाला कांहीं मी आपल्या खोलींत जागा देण्यास तयार नाहीं ! '

मॅनेजर म्हणाले, ' अहो फटिंग कोण या हॉटेलात उतरणार ? मी म्हणतों ते गृहस्थ देखील आपल्याप्रमाणें बॅरिस्टर व हायकोर्ट वकील आहेत ! '

' तसें असेल तर तुमच्या आग्रहास्तव मी त्यांना माझ्या खोलींत सामान ठेऊं देईन. '

सुवर्णचंद्र यांनी येणेप्रमाणें संमति दिल्यानंतर मॅनेजरनें सांगितलेल्या चार नवीन पाहुण्यांचें सर्व सामान सुवर्णचंद्र यांच्या खोल्यात येऊन पडलें. या पाहुण्यां-पैकीं सर्वजण कलकत्ता हायकोर्टांत वकिली करणारे कायदेपंडित होते. एकाबरोबर त्याची सुशिक्षित परंतु गतभर्तृका बहीण ही प्रदर्शन पहावयास आली होती. तिचें नांव हेमकांता कुमुदिनी असें होतें. हिचें वय वीस एकवीस वर्षांचें होतें व ती कलकत्ता युनिव्हर्सिटीमध्यें बी. ए. पर्यंत शिकलेली होती. रूपानें ती फार देखणी होती असें नाहीं परंतु साधारण दहा बऱ्या स्त्रियांप्रमाणें दिसण्यांत असूनही विद्येचें थोडें तेज चेहऱ्यावर विलसत असल्यामुळें व कपड्यालत्त्यांत नटिनेटकेपणा व बोलण्याचालण्यामध्यें सुधारकीपणाची लकब असल्यामुळें कोणाही तरुण पुरुषाचें हृदय विद्ध करण्यास पुरेशी लावण्यसंपदा तिच्याजवळ होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. या बाईच्या उतरण्याची सोय हॉटेलच्या मॅनेजरानें आपल्या बायकामुलांमध्यें केली होती; परंतु मॅनेजराचें कुटुंब जुन्या प्रकारचें व अशिक्षित असल्यामुळें दिवसभर गप्पा वगैरे छाटण्यास हेमकांता कुमुदिनी ही आपल्या भावाच्या मित्रमंडळींमध्येंच बसे. ती आपल्या भावाबरोबर सुवर्ण-चंद्राच्या खोलींत प्रथम आली तेव्हां तिचा भाऊ शामाचरण यानें इंग्रजी रिवाजा-

प्रमाणें त्यांची ओळख करून दिली. सुवर्णचंद्राकडे वळून शामचरण म्हणाला.

" ही माझी भगिनी हेमकांता कुमुदिनी ही कलकत्ता युनिव्हर्सिटीची अंडर ग्रॅजुएट आहे."

नंतर आपल्या बहिणीकडे वळून तो म्हणाला, ' हे सुवर्णचंद्र बॅरिस्टर पागलपूरच्या महाराजांचे प्रायव्हेट सेक्रेटरी आहेत. यांनी मेहेरबानगी केली म्हणून आपल्याला येथें उतरण्याला जागा तरी आज मिळाली."

सुवर्णचंद्र व हेमकांता यांची ओळख झाल्यानंतर बॅरिस्टर सुवर्णचंद्र यांचा धाकटा भाऊ जो हिराप्रकाश यांच्याशीं त्यांनीं कुमुदिनीची ओळख करून दिली. हिराप्रकाश हा पागलपूरच्या महाराजांचा ' एडीकांग ' होय अशी माहिती सुवर्णचंद्रांनीं ओळख करून देताना हेमकांतेला सांगितली. हिराप्रकाश हा रूपानें सुवर्णचंद्र यांजपेक्षां जास्त तरतरीत, धडधाकट व शिपाई बाण्याचा दिसत होता. इंग्रजी बोलण्याची त्याची शैली सुवर्णचंद्र बॅरिस्टर याजपेक्षां सफाईदार असून, दोघां भावांमध्यें धाकट्या भावाविषयीं एक दोन दिवसांच्या सहवासानें कोणाचाही जास्त अनुकूल ग्रह झाला असता.

सुवर्णचंद्र, हिराप्रकाश व हेमकांता कुमुदिनी या तिघामध्यें एकदोन दिवसामध्येंच चांगलें सख्य उत्पन्न झालें व तिसऱ्या दिवशीं सायंकाळीं पागलपूरचे महाराज दोन घोड्यांच्या मोठ्या गाडींतून जेव्हां हवा खाण्यास निघाले तेव्हा हिराप्रकाश यानें कुमुदिनीला गाडींत चवथी जागा रिकामीच असल्यामुळें हवा खाण्यास येतां काय असा उडत उडत प्रश्न केला.

हेमकांता कुमुदिनी ही जरी चांगली सुशिक्षित होती तरी अजून स्वभावानें थोडी अल्लडच होती. हिराप्रकाशानें विनंति करण्याचा अवकाश कीं ती गाडींतून हवा खाण्यास जाण्याला एका पायावर तयार झाली. पुढें एकदोनदां शहरच्या जुन्या इमारती व देखावे वगैरे पहाण्यास हिराप्रकाश व कुमुदिनी हीं दोघेंच गाडींतून जाऊन आलीं. कुमुदिनीचे बंधु सुधारलेले असल्यामुळें व पुरुषांप्रमाणें सुशिक्षित स्त्रियांनाही वर्तनस्वातंत्र्य असावें असें त्यांचें मत असल्यामुळें त्यांनीं आपल्या बहिणीच्या हालचालींकडे विशेष लक्ष पुरविलें नाहीं.

येथपर्यंत पागलपूरचे महाराज, त्यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी व एडी-कांग यांचे बस्तान तर ठीक जुळलें; परंतु प्रदर्शन उघडण्याच्या समारंभास हजर राहण्याच्या वेळीं राजे-महाराजे बसण्याच्या जागची तिकिटें कशीं मिळवावी याची त्यांचे प्रा. से. सुवर्णचंद्र व एडी-कांग हिराप्रकाश यांना काळजी पडली. परंतु ऐटदार पोषाख व समयोचित भाषण यांच्या जोरावर वाटेल ती बिकट कामगिरी पार

पाडण्याची संवय झालेल्या या दोघां व्यक्तींना त्या अडचणाचा विशेष बाऊ वाटला नाहीं. प्रदर्शन उघडण्याच्या पूर्वीं दोन दिवस संध्याकाळची वेळ गाठून एका मोठ्या घोड्याच्या गाडींतून सुवर्णचंद्र व हिराप्रकाश हे प्रदर्शन-कमेटीच्या आफिसांत गेले. प्रदर्शन-कमेटीचा सेक्रेटरी एक गोरा व्यापारी होता. त्याच्या टेबलाशीं जाऊन पांचशें रुपयांची एक नोट त्याच्या पुढें ठेवून सुवर्णचंद्र म्हणाले, ' पागलपूरच्या महाराजांनीं प्रदर्शन-कमेटीच्या फंडास ही रक्कम मदत म्हणून दिली आहे. '

युरोपियन सेक्रेटरीनें विचारलें, 'पागलपूरचें संस्थान कोणीकडे वसलेलें आहे ?'

सुवर्णचंद्र म्हणाले, ' काश्मीर, चित्रल, टिरा व नेपाळ याच्या सरहद्दीच्या एका कोन्यांत पागलपूरचें संस्थान आहे. राजनिष्ठपणाबद्दल पागलपूरच्या महाराजाची इंग्रजसरकारला पक्की खात्री आहे. आणि बायकॉटची बडबड करणारा एखादा बाबू जर पागलपूरच्या हद्दींत आला असता तर त्याचा चोवीस तासांत कडेलोटच झाला असता. '

पागलपूरच्या संस्थानाधिपतींचें हें वर्णन ऐकून साहेब सेक्रेटरी खुष झाला व प्रदर्शन उघडण्याच्या समारंभाच्या वेळीं महाराजांना किती तिकिटें पाहिजेत अशी आपण होऊन त्यानें पृच्छा केली.

सुवर्णचंद्र म्हणाले, ' फर्स्ट क्लासचीं तीन व सेकंड क्लासचीं निदान सात अगर दहा तरी तिकिटें पाहिजेत.

या मागणीप्रमाणें सुवर्णचंद्रास तिकिटेंही मिळालीं. याप्रमाणें अडचणीचें काम बिनबोभाट पार पाडून सुवर्णचंद्र व हिराप्रकाश हॉटेलमध्यें परत आले.

असो. अखेर दरबारचा व प्रदर्शन उघडण्याच्या समारंभाचा दिवस उजाडला. महाराजा पॅलेस हॉटेलमध्यें जी पुष्कळ लांबलांबची मंडळी उतरली होती, त्यापैकीं पुष्कळांना पागलपूरचे महाराज हे कोण याबद्दल संशय उत्पन्न होऊं लागला होता. परंतु अखेर जेव्हां खुद्द प्रदर्शन-कमेटीच्या युरोपियन सेक्रेटरीकडून महाराज व त्यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी वगैरे मंडळीस बोलवण्याच्या चिठ्या आल्याचें सर्व हॉटेलभर कळलें तेव्हां संशयास जागाच उरली नाहीं.

प्रदर्शनाच्या दिवशीं सकाळीं हिराप्रकाश व हेमकांता यांची गांठ पडली. तेव्हां तो तिला म्हणाला, ' आपल्याला जर चांगल्या ठिकाणीं बसावयाचें असेल तर आमच्या दहा तिकिटांपैकीं एक मी तुम्हाला देतों. '

हेमकांता म्हणाली, ' ठीक आहे. '

परंतु इतक्यावरच त्यांचें त्या दिवशींचें सकाळचें भाषण संपलें नाहीं. हिरा-

प्रकाश म्हणाला कीं, ' प्रदर्शन उघडल्याबरोबर त्याच दिवसाच्या गाडीनें पागलपूरचे महाराज येथून निघून विलायतेस जाण्याची तयारी करणार आहेत. त्यांच्या महाराणी साहेबांसाठीं एक सुशिक्षित हिंदु स्त्री ' कंपॅनियन ' पाहिजे आहे. तर आपण पागलपूरच्या महाराणी साहेबांच्या कंपॅनियन म्हणून याल काय ? पहा कंपॅनियन व्हाल तर युरोप व इंग्लंड मजेमध्यें पहावयाला सांपडेल. '

हेमकांता म्हणाली, ' या गोष्टीला माझे बंधु संमति देतील कीं नाहीं याची मला शंका वाटते. त्याची संमति तर घेतली पाहिजे ! '

हिराप्रकाश म्हणाला, तुम्ही आमच्या बरोबर चलाच व आपल्या भावाला मग पत्रानें कळवा कीं, मी एका महाराणीची कंपॅनियन होऊन विलायतेस गेलें आहें. '

स्त्रियांच्या स्वभावांतील नैसर्गिक भीरुपणाला अनुसरून हेमकांता म्हणाली, ' वा ! असें कोणाला कांहीं न विचारतां सवरतां भलतीकडेच गेलें तर लोक काय म्हणतील ? '

हिराप्रकाश म्हणाला, ' लोक कोण म्हणणार ? तुमचे बंधु बॅरिस्टर शामाचरण विलायतेस कसे गेले हे आम्हाला माहित आहे. तेव्हां लोक काय म्हणाले ? वडील कांहीं शामाचरणाला विलायतेस जाऊं देत ना. तेव्हा बायकोचे दागिने लांबवून शामबाबू पसार झाले व मुंबईस दागिने विकून स्वारी विलायतेस गेली. तेव्हा लोक नाहीं कांहीं म्हणाले ! लोक काय म्हणतील याची पर्वा करणाराच्या हातून कांहीं होत नाहीं. '

हेमकांता म्हणाली, ' पुरुषांची गोष्ट निराळी, बायकांची निराळी '

हिराप्रकाश म्हणाला, ' निराळी कांहीं नाहीं. सुशिक्षित स्त्रियांनी पुरुषांप्रमाणेंच कांहीं बाबतींत स्वावलंबन आणि साहस दाखविलें पाहिजे. '

हें भाषण संपल्यावर थोडक्याच वेळानें हेमकांता कुमुदिनी हिराप्रकाश यांस म्हणाली, ' मी महाराणींची कंपॅनियन होऊन येते. पण याबद्दल तुम्ही कोणाशीं चकार शब्द काढूं नका. '

दरबारच्या दिवशीं दुपारीं हॉटेलमधील नवीन आलेल्या लोकांमध्यें मोठी गडबड उडाली होती. जो तो लवकर जेवून झोकदार पोषाख करून प्रदर्शन उघडण्याच्या मंडपामध्यें जाण्याच्या तयारीस लागला. ले० गव्हर्नर तीन वाजतां येणार होते. परंतु राजेरजवाडे व इतर बाजारबुणगें यांना एक वाजल्यापासूनच आपापल्या जागा धरून बसण्याची इशारत झालेली होती. याच दिवशीं सकाळीं

पागलपूरच्या महाराजाचे प्रायव्हेट सेक्रेटरी आजारी पडले. ते बरींच जाडी जाडी पांघरुणें घेऊन अंथरुणावर पडले. एकाएकीं सांधे धरल्यासारखें झाल्यामुळें त्यांना खोलीच्या बाहेरही पडण्याची ताकत उरली नाहीं. हॉटेलांतील बहुतेक मंडळीला सुवर्णचंद्रांच्या आजाराची वातमी कळल्याबरोबर फार वाईट वाटलें; परंतु त्याची बरीच स्नेहीमंडळी म्हणाली कीं, प्रदर्शन तुम्हाला उद्यां पहायला सांपडेल. पण आज आम्हाला अशी काळजी पडली होती कीं, जडजोखमीचा माल हॉटेलांत टाकून पांच सात तास कसें बाहेर जावें ! आतां तुम्ही खोलीतच असणार तेव्हां आम्ही आमचें जोखमीचें सामान तुमच्या खोलींत टाकतों. असें म्हणून पांच पन्नास जणांनीं आपल्या ट्रंका, पेट्या वगैरे सुवर्णचंद्राच्या खोलींत टाकून दिल्या. सुवर्णचंद्राच्या खोलीला लागूनच मॅनेजराची खासगी खोली होती व श्रीमंत पाहुण्यांची गर्दी उसळल्यामुळें त्याच्याही पेटीमध्यें त्या दिवशीं पांच सात हजारांपर्यंत रोकड व नोटा वगैरे पडल्या होत्या.

त्या दिवशीं रीतीप्रमाणें दरबार, प्रदर्शन उघडण्याचा समारंभ वगैरे पार पडला. साडेतीनच्या सुमारासच ले. गव्हर्नर साहेबाचें भाषण वगैरे संपलें. मंडळी प्रदर्शनाच्या विस्तीर्ण आवारामधील निरनिराळ्या दालनांतील प्रेक्षणीय वस्तु पहाण्याकरतां इकडे तिकडे फिरूं लागली. प्रदर्शनाचें वर्णन किंवा ले. गव्हर्नरच्या भाषणाचा सारांश देण्याचें कांहीं हें स्थळ नव्हे. आपण आपल्या गोष्टीच्या ओघाकडे वळूं.

साडेचार वाजण्याच्या सुमारास प्रदर्शनच्या शहरच्या स्टेशनावरून लाहोरकडे जाणारी पंजाब-मेल व लाहोरहून मुंबईकडे जाणारी पंजाब-बोंबे-मेल अशा दोन्ही गाड्या सुटावयाच्या असतात. त्यावेळीं त्या स्टेशनवर दोन तीन मोठमोठ्या दोन घोड्यांच्या गाड्या आल्या. एका फॅशनेबल सरदारी गृहस्थानें लाहोरचीं फर्स्टक्लासचीं चार तिकिटें घेतलीं व दुसऱ्या एका माणसानें मुंबईकडे जाणाऱ्या गाडीचीं चार थर्ड क्लासचीं तिकिटें घेतलीं व साडेचार वाजतां दोन्हीहि गाड्या आपापल्या मार्गानें निघून गेल्या.

प्रदर्शनाच्या आवारामध्यें जी मंडळी महाराजा पॅलेस हॉटेलमधून गेली होती ती त्या रात्रीं आठ वाजेपर्यंत कोणी परत आलीच नाहीं. मध्यंतरी कोणाला तहानभूक लागली तरी सर्व व्यवस्था प्रदर्शनाच्या आवारांत होतीच. शिवाय प्रदर्शन इतकें विस्तीर्ण होतें कीं, तें संपूर्ण बघण्यास दोन दिवसही पुरले नसते. पहिल्या दिवशीं सायंकाळीं ले. गव्हर्नरांच्या सन्मानार्थ दिवे लागण्याच्या सुमारास विजेची रोषनाई व दारूकामही सुटावयाचें होतें. तेव्हां ती सर्व मजा पाहून ८।९

वाजेपर्यंत परत शिबिराप्रत जाण्याची कल्पनाही कोणाच्याही मनांत आली नाहीं.

बाबू शामाचरण हे ९ वाजतां हॉटेलांत परत आले व सुवर्णचंद्र यांच्या खोलींत शिरले. तों दरवाजा मोकळाच होता. सुवर्णचंद्र मात्र कोठें नव्हते. तेव्हां हॉटेलच्या नोकरास विचारतां त्यानें सांगितलें, " सुवर्णचंद्र आजारी होते म्हणून त्यांना तपासण्यास एक डॉक्टर तीन वाजतां आला व डॉक्टर आणि ते मिळून साडेतिहींच्या सुमारास बाहेर गेले ते अजून आले नाहींत. त्यांनीं जातांना सांगितलें कीं मी कदाचित् रात्रीं येणार नाहीं. उद्यां सकाळीं येईन. '

शामाचरण यांची भगिनी हेमकांताही कोठें परत आली नव्हती. तिच्याबद्दल चौकशी करतां त्यांच्या एका मित्रानें सांगितलें कीं, ' पागलपूरचे महाराज, त्यांचे एडी-कांग हिराप्रकाश व हेमकांता कुमुदिनी अशीं महाराजांच्या गाडींत बसून समारंभ संपल्याबरोबर चार वाजतांच प्रदर्शनाच्या आवाराबाहेर पडलीं व ते. गव्हर्नराच्या बंगल्यावर मुलाखतीसाठीं आम्ही जात आहों असें हिराप्रकाश णत होता. '

पागलपूरच्या महाराजांच्या परिवारापैकीं एक माणूसही हॉटेलमध्यें रात्रीं अकरा बारा वाजेपर्यंत कोणी परत आलें नाहीं तेव्हा मात्र मंडळींच्या मनामध्यें शंका येऊं लागली. शामाचरण व त्याचे अनेक मित्र यांनीं सुवर्णचंद्राच्या खोलींतील आपलें सामान तपासण्यास सुरवात केली, ट्रंका वगैरे जागच्याजागीं होत्या. कुलपेंही जशीच्या तशीं लाविलेलीं होतीं. मात्र ट्रंका व पेट्या उघडून पाहिल्यावर असें दृष्टोत्पत्तीस आलें कीं आंतील मौल्यवान् अशी चिजवस्त सर्व नाहींशी झाली आहे. सुवर्णचंद्र हा कोणी तरी सोनेरी टोळींतला असावा अशी मंडळीची खात्री झाली. मॅनेजराच्या कानावर गोष्ट गेली तोही घाबरला. त्यानें आपली लोखंडी सेफ उघडून पाहिली. कुलूप कायम होतें. परंतु आंतील पांच सात हजारांचा ऐवज नाहींसा झाला होता. त्या वेळची मॅनेजरची मुद्रा पाहण्यासारखी होती. डोक्यावर हात मारून घेऊन तो म्हणाला, " कुठल्या पागलपूरच्या महाराजाला घरांत घेतला! तरी त्या सुवर्णचंद्राच्या बोलण्याचालण्याच्या लकबीवरून मला वाटलेंच होतें कीं हा कोणी भामटा असावा. '

शामाचरण म्हणाला, ' सुवर्णचंद्रच काय! पण पागलपूरचे महाराज आणि त्यांचे ते ऐटबाज एडीकांग हिराप्रकाश हे देखील भामट्यांचे साथीदार असावे! अहो, तुमची तर तिजोरींतील रोकडच गेली परंतु त्या हिराप्रकाशानें माझ्या बहिणीला भुलथापा देऊन कोठेंतरी पळविलें असा मला संशय येतो!

मध्यान्ह रात्रीला हॉटेलमध्यें एकच गोंधळ उडाला. मॅनेजरनीं पोलिसला

वर्दी दिली. व शामाचरण आणि इतर कित्येक वकील मंडळी जाऊन स्टेशनवर चौकशी करूं लागली. दिवसपाळीचीं माणसें रात्रीं हजर नसल्यामुळें प्रथम कांहींच दाद लागेना. पण लाहोरच्या मेलनें ४ फर्स्टक्लासचीं तिकिटें घेऊन कोणी सरदारी गृहस्थ गेले असा तपास अखेर लागला. लाहोरला रात्रीच्या गाडीनें एक माणूस रवाना झाला व लाहोरच्या पोलिसला व स्टेशनमास्तरला तारा गेल्या कीं अमुक स्टेशनवरून येणाऱ्या चार उतारूंना अडकवून धरा. अशी व्यवस्था करून मंडळी परत हॉटेलांत येऊन बसली. परंतु कोणासच झोंप घेण्याइतकें मनःस्वास्थ्य वाटलें नाहीं. लाहोरला गेलेल्या माणसाचेकडून दुसऱ्या दिवशीं काय बातमी येते याच्याकडे सर्वांचें लक्ष लागलें होतें. दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं लाहोरला गेलेल्या माणसाकडून तार आली कीं, चार फर्स्ट क्लास उतारू प्रदर्शनच्या शहराहून त्या दिवशीं कोणी लाहोरास उतरलेच नाहीत. तेव्हां लाहोरचीं तिकिटें काढण्याचा एक केवळ लपंडाव पागलपूरच्या महाराजांच्या प्रा. सेक्रेटरींनीं योजला असें मंडळीस कळून चुकलें.

× × × × ×

मग पागलपूरचे महाराज, त्यांचे प्रा. सेक्रेटरी, एडीकांग व सुशिक्षित परंतु स्वावलंबनवादी हेमकांता कुमुदिनी हीं कोठें होतीं असा साहजिकच प्रश्न उद्भवतो. वाचकांना जास्त वेळ बुचकळ्यांत पाडण्याचें कारण नाहीं. वरील चारी व्यक्ति मुंबईहून युरोपकडे जाणाऱ्या एका फ्रेंच आगबोटीच्या फर्स्ट क्लास सलूनमध्यें हंसत खेळत असून ती आगबोट दुसऱ्या दिवशीं पांच वाजण्याच्या सुमारास मुंबईच्या पलीकडे समुद्रांत पाउणशें शंभर मैल दूर होती. परंतु त्यांची बातमी प्रदर्शनच्या शहरांतील हॉटेलांत तेव्हांही कळली नव्हती.

प्रदर्शन उघडण्याच्या दिवशीं सकाळीं सुवर्णचंद्रानें घेतलेलें आजारीपणाचें सोंग निव्वळ लुच्चेगिरीचें होतें. मंडळी गेल्यावर त्याच्याजवळ असलेल्या किल्ल्यांच्या जुडग्यानें त्यानें सर्वांच्या ट्रंका व मॅनेजराची सेफ उघडली, व ऐवज लांबविला. पूर्वसंकेताप्रमाणें एक साथीदार माणूस डॉक्टर बनून आला व त्याच्याबरोबर लांबवलेला सर्व ऐवज झाकलेल्या गाडींत घालून स्टेशनावर नेण्यास सुवर्णचंद्रास सोपें झालें. पूर्वीं ठरल्याप्रमाणें प्रदर्शनांतून महाराज, हिराप्रकाश, हे निघाले ते थेट स्टेशनावर गेले. पोलिसांना व इतरांना झुकांडी देण्याकरतां लाहोरचीं फर्स्ट क्लासचीं तिकिटें या टोळीनें काढलीं. परंतु गाडींत बसण्यापूर्वीं वेष पालटून साधे पोषाख करून ही मंडळी मुंबईकडच्या गाडींत चार थर्ड क्लासचीं तिकिटें घेऊन बसली. हीं तिकिटें प्रदर्शनच्या गांवापासून जवळच्या एका जंक्शनचीं होतीं

तेथें त्यांच्या एका सांथीदारानें मुंबईचीं चार फर्स्ट क्लासचीं तिकिटें त्याना काढून दिलीं. स्टेशनावर आल्याबरोबर हेमकांता कुमुदिनीला संशय येऊ लागला. परंतु पागलपूरच्या महाराजांना कधीं कधीं तिसऱ्या वर्गानें प्रवास करण्याची लहर येते असें सांगून हिराप्रकाशनें वेळ मारून नेली. पागलपूरच्या राणीसाहिब मुंबईस आहेत, त्या आपल्याबरोबर मुंबईहून विलायतच्या बोटींत येतील असेंही हिराप्रकाश म्हणाला. प्रदर्शनपुराहून निघालेली मेल गाडी दुसऱ्या दिवशीं दुपारीं अकरा वाजता मुंबईस पोहोंचली. एडी-काग हिराप्रकाश यानें एक तासामध्यें एका शिपिंग-एजन्सीकडून फ्रेंच बोटीचीं चार फर्स्ट क्लास तिकिटें आणलीं. हीं तिकिटें काढण्याबद्दल त्यानें आगाऊ तारेनेंच शिपिंग-एजन्सीला वर्दी दिली होती. तिकिटें मिळाल्याबरोबर हीं चार मंडळी बंदरावर जाऊन फ्रेंच बोटीवर चढलीं व २--२॥ वाजतां फ्रेंच बोटीनें मुंबईबंदरातून नांगर उचलला. बोटीवर चढल्यावर हेमकांतेनें हिरा-प्रकाशला विचारलें.

‘ तुमच्या राणीसाहिब कोठें आहेत ? ’

हे शब्द सुवर्णचंद्रानें ऐकल्याबरोबर त्यानें डोकीचा फेटा काढून खालीं आपटला व अंगांतला डबल-ब्रेस्ट कोट काढला आणि ‘ मी सुवर्णचंद्र नसून सुवर्णचंद्रा आहे ’ असें उद्गार काढले.

हिराप्रकाश म्हणाला, ‘ याच तुमच्या राणीसाहेब व यांच्यांच तुम्ही कंपॅनियन. या माझ्या सख्या भगिनी असून महाराजांच्या पत्नी आहेत. ’

हेमकांता म्हणाली, ‘ तुम्ही राजाराणीच्या गोष्टी सांगता पण भामटेगिरीचा तर धंदा करतां. ’

हिराप्रकाश म्हणाला, ‘ आमच्या महाराजांनी या धंद्यावर आज दहा लाख रुपये कमावले आहेत. आता हा धंदा सोडून संभावितपणानें रहावयाचें म्हणूनच आम्ही देशांतर करीत आहों ! दहा लाखांपैकीं माझ्या वाटणीस पांच लाख आहेत. इतक्या रुपयांवर कोणत्याही देशांमध्यें भारदस्त व संभावितपणानें राहतां येईल. तुम्ही पांच लाखांच्या मालकाची पट्टराणी होण्याला तयार नाहीं काय ? ’

त्या वेळेपुरतें ‘ नाहीं ’ असें कुमुदिनीनें उत्तर दिलें. परंतु पुढें हिराप्रकाश व कुमुदिनी यांचा पतिपत्नी असा संबंध जडल्याचें शामाचरण बाबूंना कळलें. हीं मंडळी पुढें इटाली देशांत खरोखरच सुखासमाधानानें राहिली असें म्हणतात.

---

# नथ हरवली पण आई सांपडली.





रंगोपंत एकाके हा आपल्या आईबापांचा एकुलता एक मुलगा होता. त्याचीं मातापितरें त्याच्या लहानपणींच इहलोकची वस्ती सोडून परलोकीं गेलीं होतीं. त्याला जवळचें कोणी नातलगच नव्हतें. दूरच्या एका मामानें रंगोपंताला लहानाचें मोठें केलें. तो दूरचा मामाही गरीबच होता. शिवाय रंगोपंताची बुद्धिमत्ताही विशेष उत्तम प्रकारची नव्हती. तेव्हां इंग्रजी चार पांच यत्तांचें जेमतेम शिक्षण झाल्यावर रंगोपंताना आपल्या पोटापाण्याची सोय पहावयाची पाळी आली. युनायटेड प्रॉव्हिन्सेस फ्राँटियर रेल्वेचा एक फांटा नवीन बांधण्यांत येऊन डोंगरपूर येथें त्याचें एक स्टेशन झालें होतें. या डोंगरपूरच्या स्टेशनवर तिकिट मास्तरची जागा रंगोपंत एकाके यास आपल्या वयाच्या १८।१९ व्या वर्षीं मिळाली त्याना पगार १५ रुपये मिळत असे. डोंगरपूरच्या जंगली स्टेशनावर रंगोपंतानीं १० ११ वर्षें नोकरी बजावली तेव्हा वयाच्या तिसाव्या वर्षाच्या सुमारास त्याचा पगार १५ चा वीस रुपये झाला. बारा वर्षें आठपंधरा दिवसांची सुद्धां रजा न घेता सतत नोकरी केल्यामुळें व डोंगरपूरच्या स्टेशनावर अन्नवस्त्रापलीकडे पैसा खर्च करण्याचें अन्य कांहीं साधन नसल्यामुळें रंगोपंताजवळ त्याच्या कमाईची अशी चार पांचशें रुपयांची माया झाली होती. तेव्हा आता लग्न करून घ्यावें अशी उत्कट इच्छा रंगोपंत एकाके यांच्या मनामध्यें येणें अगदीं स्वाभाविक होतें. हें निराळें सांगण्याची जरूरीच राहिली नाहीं.

डोंगरपुराहून निघून कन्यागताची संधि साधून रंगोपंत महाराष्ट्रामध्यें एका क्षेत्राचें गांवीं आले व तेथें त्यांनीं लग्न उरकून घेण्याची खटपट चालविली. वय ३० वर्षांचें. नोकरीही मोठी नाहीं, आगा ना पीछा अशा या गृहस्थाना मुलगी देण्याला एकाएकीं कोण धजणार. परंतु आगा ना पीछा अशा गृहस्थांना मुलीही असतात किंवा आगा ना पीछा अशा मुलीही अनेक असतात, तेव्हां अशांपैकींच कोणी तरी रंगोपंत एकाक्यांची पट्टराणी व्हावयाची हें उघड आहे. मुलगी मात्र दिसण्यांत चांगली पाहिजे असा एकाक्यांचा एक मोठा आग्रहाचा मुद्दा होता.

भिकाजीपंत सुदामे या नांवाचा एक मराठी शाळामास्तर, वरील क्षेत्राच्या गांवीं रहात असे. त्याच्या बहिणीची मुलगी बालपणापासून त्याच्याकडे वाढली होती. मुलगी नक्षत्रासारखी सुरेख; परंतु भिकाजीपंताच्या घरांत अठराविश्वे दारिद्र्य आणि मुलीला बाप ना चुलता. तेव्हां तिला चांगलें स्थळ कोठून मिळणार? मुलीचें नांव तारी होतें व तिला आज १४ वें वर्ष संपून पंधरावें लागण्याचा समय होता. तिचें लग्न व्हावयाचें होतें म्हणून भिकाजीपंत तीं बारा वर्षांची आहे असें सांगत असे. परंतु तें कोणाला क्वचितच खरें वाटे. तारेचा बाप ती २।३ वर्षांची असतानाच वारला होता. एक वर्षभर ती व तिची आई तिच्या चुलतचुलत्याकडे होती. पुढें तोही वारला. तेव्हां तिच्या आईनें तारेला आपल्या भावाकडे आणून टाकलें व आपण यात्रेला जाण्याचा बेत करून ती जी कोणीकडे गेली तिचा कोणाला पत्ताच नव्हता. कोणी म्हणत तीं काशीस तपस्विनी होऊन राहिली होती, कोणी म्हणत ती पंढरपूरच्या यात्रेंत वाळ्यानें मेली तर कोणी तिच्याबद्दल भलत्यासलत्या व अनिर्वाच्य अशा कांहीं गोष्टीही सांगत. परंतु तिचा खरा पत्ता बिलकूल कोणाला माहित नव्हता हें खास. तिच्याविषयीं निरनिराळ्या उठलेल्या बातम्यांत कितपत तथ्य होतें हें तिच्या भावाला म्हणजे भिकाजीपंतानाही माहित नव्हतें मग इतरास तें काय कळणार?

तारेचा विवाह डोंगरपूरचे तिकिटमास्तर व सिग्नल रंगोपंत एकाके यांच्याशीं लावण्यास भिकाजीपंत सुदामे तयार झाला. हुंडा देण्याची त्याची ऐपत नव्हती व मनासारखी बायको मिळाली म्हणजे झालें, हुंडा वगैरे श्रीमंती लचांडें कांहीं नसलीं तरी चालतील असें रंगोपंतांचेंही मत असल्यामुळें रंगोपंत व तारा यांचा विवाह एका मंगल मुहूर्तावर क्षेत्रस्थ उपाध्यायांच्या हातून पार पडला व विशेष दगदग न पडता मनासारखी सुरेख व आसन्नयौवना बायको मिळाली म्हणून रंगोपंतानाही अत्यानंद झाला. त्यांची रजा संपतच आली होती. लग्नसमारंभ आटोपल्यावर चार पांच दिवसांतच रंगोपंतांची स्वारी आपल्या नवपरिणत वधूस बरोबर घेऊन डोंगरपूरच्या लांबच्या प्रवासास निघाली व तेथें पोंचल्यावर त्यांनी आपलें नवीन गृहस्थाश्रमाचें बिऱ्हाड थाटलें. रंगोपंत व तारा या दोघांच्याही पत्रिका जरी लग्नाच्या पूर्वी कोणी पाहिल्या नव्हत्या तरी त्यांचे ग्रह उत्तम जुळले [illegible] असें वाटतें. कारण लग्नाहून डोंगरपुरास परत येऊन एक महिना [illegible] सेल नसेल तोंच रंगोपंतांना बढती मिळून दौलतापूरच्या जंक्शन स्टे

वर गुड्स क्लार्कच्या ५० रुपयांच्या जागेवर त्यांची नेमणूक झाली. अर्थात् रंगोपंत व तारा यांनीं आपलें बिऱ्हाडबाजलें डोंगरपूरहून उचललें व दौलतपूरला नेलें.

दौलतपूर जंक्शन हें साधारण मध्यम प्रतीचें स्टेशन होतें. जंक्शन स्टेशन असल्यामुळें दिवसांतून ८।१० गाड्या तेथें थांबत व दौलतपूर व्यापाराची पेठ असल्यामुळें तेथें गुड्सचा व्यवहार मोठाच चाले. त्यामुळें दौलतपूरच्या गुड्स क्लार्कला ५० रुपये पगारावरही बरीच प्राप्ति असे हें सांगावयास नकोच. शिवाय रेल्वेकडील एखाददुसरा पोर्टरही रंगोपंतास घरकामाकडे थोडाबहुत लावता येत असे; येणेंप्रमाणें अंदाजाबाहेर भाग्य उघडल्यामुळें रंगोपंत व तारा हीं परस्परांच्या सहवासामध्यें मोठ्या आनंदानें राहूं लागलीं.

× × × × ×

रंगोपंत व तारा हीं स्टेशन जवळ रेल्वेकंपनीनें बांधून दिलेल्या लहान लहान दगडी बंगल्यामध्येंच राहत असत. दौलतपुराला रहावयास येऊन त्यांना वर्ष दीड वर्ष झालें असेल अशा सुमारास उन्हाळ्यामध्यें सायंकाळीं सहा वाजण्याच्या वेळेला तारा आपल्या ओसरीवजा बंगल्याच्या पडवीमध्यें डाळतांदूळ निवडण्यासारखें कांहीं काम घेऊन बसली होती. तिच्याजवळ एक मोलकरीणही कांहीं काम करीत इकडेतिकडे वावरत होती. तारा आतां चांगली सोळा सतरा वर्षांची व सुस्थितींत असलेली अशी दिसत होती व लग्न झाल्या दिवसापासून तिच्या नवऱ्याची सांपत्तिक स्थिति सुधारत गेल्यामुळें त्यानेंही तिला प्रेमपूर्वक सांभाळलें होतें.

अशाप्रकारें वर्ष दीड वर्ष कल्पनेच्या बाहेर अशा सुखासमाधानामध्यें गेल्यामुळें तारेचें नैसर्गिक लावण्य फारच खुलून दिसत होतें. एकीकडे ती डाळतांदूळ निवडीत होती, एकीकडे मधून मधून मोलकरणीला कांहीं हुकूम सोडीत होती व स्टेशन जवळच असल्यामुळें रंगोपंतांच्या येण्याच्या वाटेकडेही तिची दृष्टि मधून मधून फिरवत होती. तारा अशा प्रकारें गुंतलेली असतांना बंगल्याच्या फाटकाशीं साधारण उतार वयाची दाक्षिणी ब्राह्मण विधवा बाई खाकोटीस गाठोडें घेऊन उभी राहिलेली तिला दिसली. दौलतपूरचें स्टेशन नर्मदेपलीकडील रांगड्या मुलखांत असल्यामुळें त्या ठिकाणीं अनोळखी असे दाक्षिणी माणूस सहसा दृष्टीस पडत नसे. तारेची मोलकरीण देखील लहंगा वापरणारी व रांगडी हिंदी बोलणारी तद्देशीय कुणबीण होती.

आपल्या अंगणाच्या फाटकाशीं एक अनोळखी अशी परकी परंतु महाराष्ट्रीय ब्राह्मण बाई आलेली पाहताच तारा उठून उभी राहिली व फाटकाजवळ येऊन,

'बाई तुम्ही कोण, कुठल्या, इकडे कोणीकडे आलांत?' असा त्या अनोळखी बाईला तिनें प्रश्न केला.

ती अनोळखी बाई म्हणाली, ' मुली मी यात्रेकरू आहें. नाशकाहून काशी-कडे जात आहे. वाटेंत माझें तिकीटच गाडींत हरवलें म्हणून मला स्टेशनावर एका साहेबाच्या पोरानें ओढून काढलें. आतां उद्यांच्या गाडीनें पुन्हां तिकीट काढून पुढें जाईन खरी. पण या अनोळखीच्या ठिकाणीं एक रात्र तरी मी कुठें काढणार, या विवंचनेंत मी आहें. मुली तूं दक्षिणी ब्राह्मणाची दिसतेस. मला रात्रभर तुझ्या पडवींत टेंकायला जागा देशील तर मी तुझे उपकार जन्मभर कांहीं विसरणार नाहीं.'

बाईची ही हकीकत ऐकून तारेचें कोंवळें मन कळवळलें. शिवाय मराठी बोलणारें मनुष्य स्वतः व स्वतःचे यजमान रंगोपंत यांच्या पलीकडे तिसरें असें तिला गेल्या सहा महिन्यांत एकदा देखील भेटलें नव्हतें. तेव्हां या वृद्ध बाईला पाहिल्याबरोबरच तिला एका प्रकारचें आनंदाचें विलक्षण भरतें आलें होतें. तेव्हा त्या आनंदाच्या भरामध्यें ती एकदम उल्लसित वृत्तीनें म्हणाली:—

'बाई! तुम्ही कोणी असा. आमच्या घरीं एक रात्र कां दोन तीन दिवस जरी तुम्ही राहिलांत तरी मला कमीच वाटेल.'

असें म्हणून तारेनें बंद केलेलें फाटक उघडलें व तारेच्या मागोमाग ती वृद्ध पांथस्थ बाई तारेच्या रहात्या घराच्या पडवींत शिरली. तिनें आपलें गांठोडें पडवीच्या एका कोपऱ्यामध्यें ठेविलें व तिनें तारेच्या चेहेऱ्याकडे एकदोनदां निरखून पाहिलें. ही परकी बाई आपला चेहेरा इतका निरखून कां पहात असावी, याचें तारेला कारण कांहींच समजेना. मात्र तिच्या या निरखण्यानें तारा जरा बावरली व तिचें तोंड थोडें गोरेमोरें झालें. अखेर तिच्यानें बोलल्याशिवाय रहावेंचना, ती म्हणाली:—

'बाई! तुम्ही इतकें न्याहाळून काय पहात आहां.'

वृद्धा म्हणाली, 'मुली, तुझ्यासारखीच मी एक मुलगी पुष्कळ वर्षांपूर्वी पाहिली होती. तेव्हां तूं तिची बहिणबिहिण असावीस असा माझा तर्क धांवला म्हणून मी तुझा चेहेरा निरखून पाहात होतें. कांहीं भलताच विचार मनांत आणूं नको हां त्याच्याबद्दल.'

त्या बाईचा हा खुलासा ऐकून तारेचें समाधान-निदान अर्धवट-झालें असा असें वाटतें. कारण तिनें या बाबतींत विशेष मन न घालतां आपल्या रांगड्या मोलकरणींस चार आणे काढून दिले व बाजारांतून कलाकंद, खजूर, केळीं व भुईमुगाचे दाणे असे जिन्नस आणावयास सांगितलें. ही उतारवयाची यात्रेकरू बाई असल्या फलाहाराच्या पदार्थांशिवाय भलतेंच कांहीं खाणार नाहीं हें जाणून तारेनें हेच पदार्थ मागविले. पदार्थांची यादी ऐकून यात्रेकरू बाई म्हणालीः—

'मुली, इतके पदार्थ कांहीं आणायला सांगूं नको. मी आतां घोटभर गार पाणी पिऊन स्वस्थ बसतें. मग रात्रीं तुमच्या जेवणाच्या वेळीं चार दाणे तोंडांत टाकीन.'

परंतु अशा बोलण्यानें तारा थोडीच थांबणार होती. तिनें बाजारांतून जिन्नस आणवून ते त्या वृद्ध पांथस्थ बाईस खाण्यास दिले. तों संध्याकाळचीं दिवे लागण्याची वेळ झाली.

पांथस्थ बाई म्हणाली, 'मुली, तुझे यजमान केव्हां घरीं येतात?'

सलज्ज वदनानें थोडें स्मित करून तारा म्हणाली, 'नेहमीं सहाच वाजतां परत यायचें असतें. पण कामाची गर्दी वगैरे असली तर सातही वाजतात.'

वृद्ध बाई म्हणाली, 'मुली, तुला या ठिकाणीं करमतें कसें? कोणी बरोबरीचें माणूस नाहीं कांहीं नाहीं.'

तारा म्हणाली, 'करमतं कसलं! मला तर या रामप्यारी मोलकरणीशीं वेडें-वांकडें हिंदी बोलतांना जीव नकोसा होतो. मेलीला एक मराठी शब्द कळायचा नाहीं. कांहीं दिवसांपूर्वी मराठी वर्तमानपत्रं तरी घ्यायचीं असत, तेव्हां तीं वाचून कांहीं वेळ जाई आणि मराठीचा गंध राही. आतां म्हणे वर्तमानपत्र वाचणारांना कायसा दंड का शिक्षा. तेव्हा तींहीं घ्यायचीं बंद केलीं. आतां काय तीं हीं मासिक पुस्तकांतलीं चित्रं आणि गोष्टी राहिल्या आहेत.— × × पण चला बाई चूल पेटवून संध्याकाळच्या स्वयंपाकाची कांहीं तजवीज केली पाहिजे. असं बसून कसं चालणार?' असें म्हणून तारा बंगल्याच्या मागच्या बाजूच्या पडवींतील स्वयंपाकगृहाकडे निघाली. ती पांथस्थ बाई व रामप्यारी मोलकरीणही तिच्या मागोमाग स्वयंपाकगृहाकडे गेल्या. चूल वगैरे पेटवल्यावर तारा स्वयंपाक करूं लागली. पांथस्थ बाई तिच्या मदतीस लागली. थोडक्यांतच तिला असें दिसून आलें कीं, तारेला स्वयंपाकगृहांतील कृत्यांचें ज्ञान जेमतेमच होतें. थोडक्याच

जिनसांमध्यें चवदार व चटकदार अशा भाज्या, चटण्या, कोशिंबिरी कशा कराव्या, इत्यादि केवळ अनुभवजन्य ज्ञान अद्यापि तिला प्राप्त झालेलें नव्हतें. तारेचा नवशिकेपणा पाहून ती प्रवासी बाई म्हणाली:—

'मुली तूं आज जरा विश्रांती घे! मी तुझ्या वांटचा स्वयंपाक करतें.' असें म्हणून तिनें चुलीजवळची मुख्य जागाच पटकावली. तेव्हा तारेला तिच्या म्हणण्याप्रमाणें विश्रांति घेणं भागच पडलें. ही अनोळखी परकी बाई इतक्या मोकळ्या मनानें व ममतेनें आपल्याशीं वागतांना पाहून तारेच्या मनांत तिच्याविषयीं सहजच चांगला ग्रह व आदरबुद्धि उत्पन्न झाली. स्वयंपाकाला सुरवात होते न होते तोंच बंगल्याच्या पुढील दाराच्या पडवींतील दार उघडल्याचा आवाज झाला व रंगोपंत मालगुदामांतून घरीं आल्याची वर्दी रामप्यारीनें तारेला कळविली. लागलींच तारा बंगल्याच्या पुढील पडवींत आली. पडवीच्या आतल्या बाजूसच रंगोपंतांची निजण्याबसण्याची खोली होती. रंगोपंत खोलींत जाऊन एका हिंदुस्थानी तऱ्हेच्या चारपाईवर पडले, व 'हुश्श हुश्श' करीत म्हणाले:—

'कोण उत्तर हिंदुस्थानचा उन्हाळा! दक्षिणेंत अर्धपोटीं राहिलेलं पुरवलें, पण ह्या हिंदुस्थानच्या उन्हाळ्यात होरपळायला नको. तुमचें बायकांचें चुलीपाशीं या दिवसांत कसें होत असेल ईश्वर जाणे! पण आज आपण सोवळ्याशा! संध्याकाळीं थंडा फराळ करायाचा बेत आहे कीं काय?'

एक परकी बाई अचानक आपल्या घरीं उतरली आहे व एक दोन दिवस तिला राहून घेण्याचा आपण आग्रह केला आहे, इत्यादि गोष्टी यजमानांच्या कानावर घालण्याचा तारेचा बेत होताच. परंतु हकीकत सांगण्यास उपक्रम कसा करावा याविषयीं ती घोटाळ्यांत पडली होती. शिवाय, नवऱ्याला आपलें करणें आवडेल किंवा नाहीं याविषयींही तिचें मन साशंक होतें. अखेर नवऱ्यानें केलेल्या प्रश्नाची संधि साधून ती म्हणाली, 'थंडा फराळ का? स्वयंपाकाची सर्व तजवीज चालली आहे.'

रंगोपंत म्हणाले, 'तो कशी काय? काय यक्षिणीच्या कांडीनें स्वयंपाक होतो कीं काय? कीं त्या रामप्यारीलाच रसुई बनवायला सांगितलीस. इथे परक्या ठिकाणीं अडल्या गरजेला तिच्या हातचें आपण पाणी घेतों, पण तिच्या हातचा स्वयंपाक खाण्यापर्यंत कांहीं आपला सुधारकीपणा जाऊं देता उपयोगी नाहीं. दोनतीनशें रुपये पगार असल्याशिवाय असला सुधारकीपणा चालत नाहीं.'

यावर तारा म्हणाली, 'मीच सुधारकीपणा करतें कीं नाहीं! रामप्यारी स्वयंपाकाला लावायला मला काय वेड लागलें आहे?'

रंगोपंत म्हणाले, 'मग कोण सापडलें चुलीशीं बसायला? की तो स्टेशनवरचा कनोजा ब्राह्मण गंगादीन? कोणी वेड्यानें या गंगादिनाला बम्मन केला ईश्वर जाणे. आठ दिवसांत स्नान करील तर शपथ. बाकी तोही स्नान करण्याला 'अष्णान' च म्हणतो. तेव्हा त्याचें दररोज 'अष्णान' होतेच'

तारा म्हणाली, 'गंगादीनही नाही नी रामप्यारीही नाही. ही पहा रामप्यारी दिवा लावून घेऊन आली. आपल्याकडे आज तिसरंच एक माणूस आलं आहे.'

इतक्यांत रामप्यारीने लावलेला दिवा टेबलावर आणून ठेविला.

रंगोपंत म्हणाले, 'हें तिसरेंच माणूस कोण सापडलें?'

या प्रश्नाला तारेनें साद्यंत उत्तर दिलें. तिकीट हरवून दौलतपूरच्या स्टेशनवर अडकून [illegible] एक वृद्ध बाईनें आपल्या दाराशीं येऊन गयावया करून रात्रभर राहण्या[illegible] कशी विनवणी केली व आपण तिच्या बोलण्यानें कळवळून जाऊन तिला आश्रय कसा दिला वगैरे सर्व हकीकत तारेनें आपल्या यजमानास निवेदन केली.

रंगोपंत म्हणाले, 'ही नाशिककडून काशीकडे जाणारी यात्रेकरू बाई किती वयाची आहे?'

तारा म्हणाली, 'असेल पन्नास साठ वर्षांची! आपल्यास काय तिच्या वयाचें! म्हातारी आहे इतकं खरं!'

रंगोपंत म्हणाले, 'तुला माहित नाही. या नाशिक आणि काशीस जाऊन स्वतंत्रपणे राहणाऱ्या बायका फार भयंकर असतात. वर दिसायला कर्मठ पण कुठें जातील तिथें नसता उपद्व्याप करायच्या.'

तारा म्हणाली, 'तशातली नाही हो ही बाई! अगदी साधीभोळी आहे.'

रंगोपंत म्हणाले, 'तूं आहेस साधीभोळी. म्हणून तुला सारं जग दिसतं [illegible] भोळं. तिकीट हरवल्यामुळें ती इथें अडकून पडली हेच आधी मला खरं [illegible] न नाही. दिलीन तिनें एक थाप ठेऊन तुम्हाला काय! कोणी सांगेल [illegible] त्यावर पूर्ण विश्वास.'

तारा म्हणाली, 'आपणच नाही का त्या दिवशीं रात्री उशिरानं घरी आलां, [illegible] हां म्हणाला कीं संशयी स्वभाव असूं नये. कुंजविहारीलालच्या घरीं गप्पा [illegible] रीत बसल्यामुळें घरीं यायला उशीर झाला असं आपण सांगितलं, त्यावर मी [illegible] बडतोब विश्वास ठेवला. कीं खऱ्याखोट्याबद्दल वाद घातला? तेव्हां मात्र संशयीपणा वाईट होता आणि आता मात्र संशयीपणा टाकला तर भोळेपणा झाला लागलीच.'

तारा हे शब्द जरा उच्च स्वरांतच बोलली. मात्र हे शब्द ऐकून रंगोपंतांची नांगी खालीं पडल्यासारखीच झाली. थोडी उडवाउडव करण्याच्या हेतूनें तो म्हणाला, ' बरं, जा आतां जेवायची तयारी करा. मला भूक लागली आहे. कुठं विश्वास ठेवावा आणि कुठं संशयितपणा दाखवावा हें तुला अजून वळत नाहीं. जेवणाची तयारी करा ! '

तारा लागलीच स्वयंपाकघरांत गेली. तिने पाटपाणी मांडून भोजनाची तयारी केली. जेवतांना रंगोपंतांच्या प्रत्ययास आलें कीं, नेहमींच्या स्वयंपाकापेक्षां आजचा स्वयंपाक कोणी अनुभविक माणसानें केलेला असावा. कारण सर्व भाज्या, चटण्या वगैरेंमध्यें मीठ, तिखट वगैरे बेताचें असून प्रत्येक पदार्थ चवदार झाला होता. भातही फार फडफडीत किंवा फार मऊ नसून अगदीं उत्तम बनला होता.

जेवण झाल्यावर रंगोपंत तारेला म्हणाले, ' आजच्यासारखा स्वयंपाक तूं करायला शिकलीस तर अर्धकच्चे व फाजील तिखट किंवा अळणी पदार्थ खाण्याचा तरी प्रसंग टळेल ! '

तारा म्हणाली, ' मी त्या बाईला चार पांच दिवस राहवून घेतें,आणि तिच्या जवळ सर्व पदार्थ उत्तम करायला शिकतें ! '

रंगोपंत म्हणाले, ' कांहीं हरकत नाहीं. ती बाईही खरीच साधीभोळी दिसते आहे. मला प्रथम संशय आला तशांतली कांहीं ती नसावी. '

रंगोपंतांचें हें भाषण ऐकून तारेलाही आनंद झाला व दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्यावर तारा त्या यात्रेकरू बाईला म्हणाली:—

' बाई, तुम्ही इथें आणखी चांगल्या चार पांच दिवस रहा, म्हणजे मलाही थोडा विरंगुळा होईल आणि मी तुमच्याजवळून पुष्कळ गृहकृत्याच्या गोष्टी शिकेन ! '

यात्रेकरू बाई म्हणाली, ' पण बाई तुझे यजमान दिसताहेत जरा कठीण. मी राहीन इथें तूं म्हणशील तर. पण तुला होईल त्रास. '

तारा म्हणाली,' त्यांच्या संमतीनेच मी तुम्हांला रहायचा आग्रह करतें आहे

वृद्ध बाई म्हणाली, ' तसं असेल तर मग हरकत नाहीं. '

यानंतर ती बाई चार पांच दिवस रंगोपंतांच्या घरीं राहिली. तारेनें स्वयं- पाकांतील पुष्कळ खुब्या तिच्याजवळून शिकून घेतल्या व रंगोपंतांनाही चार पांच दिवस उत्तम प्रकारचें जेवण मिळालें. चार पांच दिवसांतच त्या यात्रेकरू बाईची तारेवर चांगली ममता बसली व तारेलाही ती कोणी परकी नसून जशी काय जवळची मावशी किंवा आत्या असावी अशी ती वाटूं लागली. घरांत तारेला

आतां एक चांगली पोक्त व उतारवयाची बाई सोबतीस असल्यामुळें रंगोपंतांना सायंकाळीं दिवे लागतांनाच कामावरून बिऱ्हाडीं परत येण्याचा लकडा राहिला नाहीं व कुंजबिहारीलाल, इषकप्रसाद वगैरे स्टेशनवरील त्यांच्या दोस्तांबरोबर ते सायंकाळचा बराच वेळ घालवूं लागले. एक दिवस रात्रीं रंगोपंतांची स्वारी घरीं परत आली ती एक रंगेल असें हिंदुस्थानी पद्य गुणगुणत आली, व तारेला जरी इतका चाणाक्षपणा आला नव्हता तरी, रंगोपंत स्वयंपाकघरांत जेवण्यास आले, आणि बोलूं लागले, तेव्हां हवेंत एका प्रकारचा उग्र व मादक भपकारा सुटल्यामुळें त्या बाईनें तेव्हांच ताडलें कीं, रंगोपंत थोडेबहुत तरी सुरादेवीच्या तडाक्यांत सांपडलें असावें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती बाई पुन्हा बनारसला जाण्यास निघाली, तेव्हां ती तारेला एकीकडे हळूच म्हणाली, 'तुझे यजमान उत्तम आहेत, सर्व कांहीं ठीक आहे. पण थोडे व्यसनाधीन झाले आहेत. तूं जर त्यांना लवकर ताळ्यावर आणणार नाहींस तर पुढें तुझी दशा कांहीं चांगली होईलसें दिसत नाहीं.'

तारा म्हणाली, 'या स्टेशनावर आल्यापासून पगार चांगला दुप्पट वाढला, शिवाय इतर प्राप्ति आहे. पण हल्लीं पहातें तों, घरांतल्या महिन्याच्या महिना खर्चाची ओढाताण होऊं लागली आहे. मी बोललें तर सांगायचें कीं, मी पैसे शिल्लक टाकतों. मला कांहीं तें खरें वाटत नाहीं. पण आता हें भलतंच व्यसन-बिसन लागलं असलं तर मी काय करणार ?'

यात्रेकरू बाई म्हणाली, 'मुली, हजारों रुपये मिळवणारांचा या मदिराबाईनें सत्यनाश केला आहे. तिच्या पुढें पन्नास पाऊणशें रुपये कमावणाऱ्या तुझ्या यज-मानांचा काय टिकाव लागणार. तूं आपल्याकडून जप. एकटीं राहायला भीति वाटते वगैरे सबबी सांगून संध्याकाळीं कचेरीच्या वेळानंतर त्यांना बाहेर राह-ण्याची संधिच येऊं दिली नाहींस, तर हें व्यसन कदाचित् सुटेल. तुझ्या बऱ्याचं म्हणून मी तरी हें सांगतें.' इतकें बोलल्यावर त्या बाईला गहींवरच आला.

अखेर गाडीची वेळ झाली तेव्हां तारा व रंगोपंत यांचा निरोप घेऊन ती बाई निघाली. रंगोपंतांनीं तिला स्वतः स्टेशनवर नेऊन गाडींत नीट बसवून वगैरे दिली. ती बाई गेल्यावर तारेला मात्र अगदीं चुकल्या चुकल्यासारखें झालें.

\+ + + +

ती बाई निघून गेल्याला वर्ष सहा महिने होऊन गेलेले आहेत. रंगोपंत व तारा हीं आतां चांगलीं सुस्थितीमध्यें आहेत किंवा निदान असावयास पाहिजेत

असें म्हटलें तर तें जास्त शोभेल. कारण रंगोपंतांचा पगार फिरून वाढला आहे. तथापि पगाराच्या बढतीबरोबर वारुणीबाईनें चालू केलेला रंगोपंतांवरील अम्मलही चढत्या प्रमाणावरच आहे. दौलतपूरच्या स्टेशनवरील केलनर आणि कं० च्या रिफ्रेशमेंट रूममधील गोआनीज मॅनेजरची ओळख झाल्यापासून कुंजबिहारीलाल, इषक प्रसाद व रंगोपंत यांचें व्हिस्कीचें बिल दरमहा वाढत चाललें, व रंगोपंतांच्या १०० रुपये पगारांतील ५०।६० रुपये दरमहा या त्रैतांच्या व्यसनाप्रीत्यर्थ खर्ची पडूं लागले. या व्यसनाच्या प्रभावाबरोबर घरामध्यें बिचाऱ्या तारेला जास्त त्रास होऊं लागला. रंगोपंतांची स्वारी रात्रीं दहादहा अकराअकरा वाजेपर्यंत घरीं येईनाशी झाली. मग आल्यावर बायकोवर विनाकारण जळफळण्याचा व आरडाओरड करण्याचा त्यांनीं उपक्रम करावा. अशा एखाद्या प्रसंगीं तारेला असें होऊन जाई कीं, कांहीं दिवस कोठें तरी निघून जावें. अशा प्रकारची स्थिति प्राप्त झाली असतां तारा एक दिवस सायंकाळीं त्रस्त व चिंताक्रांत मुद्रा करून, पडवीमध्यें बसली असतां ती यात्रेकरू बाई पुन्हा तारेच्या समोर येऊन उभी राहिली. तिला पाहिल्याबरोबर तारेला अवर्णनीय आनंद झाला, व तिचें तिनें पूर्वींच्याहीपेक्षां प्रेमानें स्वागत केलें. कांहीं वेळानें ती बाई म्हणाली, 'तारावाई! तुमच्या चेहऱ्यावरचा पूर्वींचा तजेला जाऊन तो आतां अगदीं काळवंडल्यासारखा दिसतो आहे. मी तर म्हणत होतें कीं, चांगल्या आनंदामध्यें मी तुम्हाला पाहीन!'

तारा म्हणाली, "आनंद बसला! तुम्ही जातांना ज्या व्यसनाबद्दल उडत उडत माझ्याजवळ बोलला होतां, त्याची आतां शिकस्त होत चालली आहे. त्यामुळें आमच्या घरांतला पूर्वींचा सगळा आनंद मावळत चालला आहे.'

अशा प्रकारें या दोघीजणींचें बोलणें चाललें आहे तोंच रंगोपंत ऑफिसांतून घरीं आले. आपली दौलतपूरहून बदली झाली आहे व दोनतीन दिवसांतच बदलीच्या ठिकाणीं जावयास निघालें पाहिजे, अशी बातमी त्यांनीं आपल्या पत्नीस सांगितली व दौलतपुराहून निघण्यापूर्वीं आपल्या मित्रमंडळीला एक चमचमीत मेजवानी द्यावयाची आहे असा त्यांनीं आपला बेत तारेला कळविला. ती वृद्ध बाई पुन्हा आलेली पाहून रंगोपंत तिच्याकडे वळून म्हणाले, 'कां बाई, पुन्हा कुठें इकडे तुम्ही?'

बाई म्हणाली, 'मी आतां डाकूर व द्वारकेच्या यात्रेला चाललें आहें. वाटेंत आतां आपली इतकी चांगली ओळख झाली होती म्हणून एकदां भेटून जावें म्हटलें.'

रंगोपंत म्हणाले, ' बरं केलंत. आतां माझी बदली झाली आहे. तर, परवां आम्ही निझामपुरच्या स्टेशनकडे जाण्यास निघूं, तेव्हांच तुम्ही डाकूरजींकडे जाण्यास आमच्याबरोबर निघा. '

इतकें बोलणें झाल्यावर त्यानें तारेला आपल्या बसावयाच्या खोलींत बोलावलें व उद्यां मेजवानीला दहा रुपयेपर्यंत खर्च झाला तरी चालेल, परंतु बेत उत्तम झाला पाहिजे अशी ताकीद दिली.

तारा म्हणाली, ' बेत उत्तम होईल. पण माझ्याजवळ पैसे कुठे आहेत? दरमहा घरखर्चाला पंचवीस रुपये मिळतात. ते या महिन्याला प्रथम आपण पंधराच दिले. शिवाय आता जायचं आलं तर मागल्या महिन्याचं दहापंधरा रुपये देणं आहे ते एकदम दिलं पाहिजे. '

रंगोपंत हा व्यसनाधीन झाल्यामुळें त्याला अलीकडे नीट स्मरण राहत नसे. मदिरेच्या धुंदीमध्यें आपण आपल्या पत्नीच्या हवाली किती रुपये केले याची त्याला आठवण राहत नसे व पैसे संपले अशी तक्रार तारेनें केली की, तिच्यावर तो वाटेल तसा चरफडत असे. या महिन्याच्या आरंभाला आपण खरोखरच फक्त १५ रु. पत्नीच्या हवाली केले ही गोष्ट तो विसरला होता. तारेचें वरील भाषण एकून तो एकदम उसळून म्हणाला:—

' मी तुझ्याजवळ सगळे पैसे देतों ते तूं वाटेल तसे खर्च करतेस आणि मीच कमी दिले म्हणून पुन्हा मलाच सतावतेस काय? चल, आमच्या मित्रांना मेजवानी नको नी काहीं नको. मी सांगतों त्यांना की बायको उधळी असल्यामुळें तुम्हांला मेजवानी वगैरे देण्याची माझी ऐपत नाहीं. '

या रागाच्या भाषणानें तारा लटपट कांपूंच लागली. रंगोपंत वरील रागाचे शब्द उच्चारतानाही सुरादेवीच्या प्रभावानें थोडा बेहोष झालेला होताच. तारेजवळ खरोखरच खर्चाला पैसे नव्हते. जेमतेम २।४ रुपये शिल्लक होते. पंधरावीस पानांची उत्तम मेजवानी इतक्या रकमेंत कशी होणार? मोलकरणी वगैरे पगारसुद्धां तिनें एक महिना अंगावर ठेवला होता तो या तीन चार रुपयांतूनच तिला द्यावयाचा होता.

' मेजवानी नको, ' असें रंगोपंत रागात पुटपुटला. पण प्रमोशनवर बदली झाल्यामुळें त्यानें मित्रमंडळींस मेजवानीचें निमंत्रणही दिलें होतें. तेव्हां मेजवानी देण्याचें टाळणें अशक्यच होतें. तो आपल्या बसावयाच्या खोलींतील एका पेटीत आपले पैसे निराळे ठेवित असे. या महिन्यांत त्यानें खरोखर १५ रुपयेच

पत्नीच्या हवालीं करून मागील महिन्याबद्दल पंचवीस तीस रुपये खर्चाचें देऊन राहिलेले पन्नास रुपये आपल्या पेटींत ठेविले होते. तारेजवळचे पैसे संपले असें पाहतांच आपल्या पेटींत कांहीं शिल्लक असली तर पहावी म्हणून त्यानें पेटी उघडली. परंतु पूर्वीच व्हिस्की व ब्रँडप्रीत्यर्थ ते पैसे केल्नरच्या रिफ्रेशमेंट-बारचा मॅनेजर पेड्रो यांच्या खिशांत गेले असल्यामुळें पेटींत त्याला एकही रुपया सांपडला नाहीं. तारेला वाटलें कांहीं तरी शिल्लक निघेल. पेटींत एक रुपयाही शिल्लक नाहीं, असें पाहून रंगोपंत फारच खवळले, व ' माझ्या पेटींत निदान दहा पंधरा रुपये तरी शिल्लक असावयास पाहिजे होते. तूंच माझी पेटी माझ्या न कळत उघडून हे पैसे लांबवलेस, आणि खर्चलेस, ' असा त्यांनीं निःशंकपणें तारेवर आळ घेतला. हा खोटा आळ आलेला ऐकून तारा खरोखरच रागानें लाल झाली, व आपण खुद्द आपल्या यजमानांशीं बोलत आहों, याचें भान न राहतां ती म्हणाली:—

' आपण दारूच्या पायीं करावयाचे सर्व रुपये खर्चे आणि चोरीचा आळ घालायचा माझ्यासारख्या निरपराधी गाईवर. हाच का अलीकडचा पुरुषार्थ ! आग लावा असल्या पुरुषार्थाला ! '

तारेचें हें निर्वाणीचें भाषण ऐकून रंगोपंताची निशाही थोडी उतरली व तो चूप बसला. तारा तशीच तडक स्वयंपाकघरांत जाऊन ओक्साबोक्शीं रडत बसली. नवराबायकोचें वरील रागाचें संभाषण किंवा भांडण मोठमोठ्यानेंच झालें होतें व यात्रेकरू बाईलाही तें इत्थंभूत ऐकूं गेलें होतें. तिला मेल्यापेक्षां वाईट वाटायला लागलें. नवराबायकोचें हे खडाजंगी भांडण पहाण्याला आपण आज इथें कशाला व्यर्थ उतरलों असें ती आपल्या मनाशींच म्हणूं लागली. तारेचें तें रडणें ऐकून तर तिच्या काळजाचें पाणीच झालें. अखेर तारा जरा शांत झाल्यावर ती बाई म्हणाली, ' मुली, मीं तुमचं भाषण सगळं ऐकलं. हें पहा अशी एकसारखी रडूं नको. माझ्याजवळ प्रवासखर्चासाठीं घेतलेले २५।३० रुपये आहेत. मी त्यांच्यांतले तुला १५ रुपये उसने देतें. नवऱ्याला कांहीं न कळवतां उद्यां मेजवानीचा खर्च या रकमेंतून तूं कर. मेजवानीच्या तयारीला मी तुला मदत करतें. मेजवानी पार पडली आणि तुझ्या यजमानांचें मन जरा सुप्रसन्न झालें म्हणजे मग तूं त्यांची नीट समजूत घाल. आता ते फार गरम झाले आहेत. रडतबिडत बसलेली तुला त्यांनीं पाहिली तर आणखीच आकाश कोसळेल. '

वृद्ध बाईच्या सांगण्याप्रमाणें तारेनें दुसऱ्या दिवशीं मेजवानीची तयारी केली.

मेजवानी वगैरे थाटानें व समाधानकारक रीतीनें पार पडली. रंगोपंतांचाही राग थोडा शांत झाला, त्या दिवशीं सायंकाळीं परगांवीं जाण्याची तयारी करण्याच्या खटपटीस तो लागल्यामुळें पेट्रोच्या व्हिस्कीला फार सढळ हाताने उदार आश्रय द्यावयास त्याला संधिच मिळाली नाहीं. त्यानें त्या दिवशी घशाची कोरड घरींच एखाद् दुसरा पेग घेऊन शमविली.

दुसऱ्या दिवशीं निझामपूरला निघण्याच्या वेळीं तीं पांथस्थ बाईही त्याच्या बरोबरच निघाली. तिने डाकूरजीचें तिकीट घेतलें. वाटेंत एका जंक्शनवर त्या बाईला गाडी बदलावयाची होती. तेथें तिने तारेचा मोठ्या प्रेमाने निरोप घेतला. तिने जातांना रंगोपंतांनाही थोडे कानउघाडणीचे शब्द सांगितले.

' आपल्या तरुण पत्नीला व्यसनाच्या भरामध्यें आपण दोन दिवसापूर्वीं बोललां तसे बोलत रहाल तर दोघांच्याही सुखाचें मातेरें होईल. हलके हलके प्रयत्न करून व्यसनमुक्त व्हाल तर त्यात दोघांचें जन्माचें कल्याण होईल, ' वगैरे सामोपचाराचे चार शब्द तिनें कळवळ्यानें सांगितले व ती डाकूरजीकडे जाणाऱ्या गाडींत बसली.

रंगोपंत व तारा निझामपुरास पोहोंचलीं व त्यांनीं या नवीन ठिकाणीं बिऱ्हाड मांडलें. बिऱ्हाड लावतांना तारेने आपल्या दागिन्यांचा डबा उघडून पाहिला. तिचे दागिने फारसे नव्हतेच. पगार वगैरे वाढल्यापासून रंगोपंतानें पांचसातशें रुपयांचे तीनचार दागिने तिच्या अंगावर घातले होते. या दागिन्यांतला मुख्य दागिना म्हणजे नथ. तीच २५० रुपये किंमतीची होती. तारेनें डबा उघडला तों त्यांतील नथीची डबीच तिला सांपडेना. तिनें सर्व गांठोडीं तपासलीं पण कोठें पत्ता नाहीं. अखेर तिनें नथ हरवल्याची गोष्ट रंगोपंतांच्या कानावर घातली. तारा म्हणाली, ' दौलतपुराहून निघायच्या आदल्या दिवशीं मी नथ डबींत घालून मोठ्या डब्यांत ठेवल्याचें मला पक्कें स्मरतें. डब्याच्या बारक्या कुलपाची किल्ली माझ्या गळ्यांतच आहे. मग नथ गेली कशी ? '

क्षणाचा विचार न करतां रंगोपंत म्हणाले, ' त्या म्हाताऱ्या ढोंगी यात्रेकरू बाईनेंच ती चोरली असावी. '

तारेला हें खरें वाटेना. ज्या बाईने आपल्याला खर्चासाठीं अडचणीच्या वेळीं पंधरा रुपये दिले ती आपली नथ चोरील असें मानण्यास तिचें मनच धजावेना. रुपये त्या बाईने दिल्याची गोष्ट रंगोपंताला कळली नव्हती म्हणून त्या बाईचा संशय त्याला आला असावा असें तिला वाटलें म्हणून ती म्हणाली, ' परवां

मेजवानीस आपल्या घरांत पैसे नसतांना ज्या बाईने पदरचे पंधरा रुपये काढून दिले ती बाई माझी नथ चोरील काय ?'

रंगोपंत म्हणाले, 'अग, विश्वास बसण्याकरितां तिनें तुला रुपये दिले. आणि वीस रुपयांबद्दल अडीचशें रुपयांच्या नथेवर डल्ला मारुन दोन दिवसांत तिने दाम पंचवीसपट केली हें तुला काय कळणार. गाडीत तूं गाढ निजलीस तेव्हां तुझ्या गळ्यांतील किल्ली काढून तिने डबा उघडला व तुझी नथेची डबी लांबविली. नथ तिनेंच चोरली. मी डाकूरच्या पोलिसाला ताबडतोब तार देतों म्हणजे त्या थेरडीला ते पकडतील व नथ आपल्याला परत मिळेल. या यात्रेकरु ढोंगी बायांची गय करुन उपयोगी नाहीं.'

तारा म्हणाली, 'पोलिसबिलिसला कळवूं नका. त्या बिचाऱ्या म्हातारीला निरर्थक त्रास सोसावा लागेल ! एखाद्या मावशी किंवा आतेसारखी मला ती वाटूं लागली होती; आपण कांहीं तिच्यावर संकट आणूं नये.'

रंगोपंत म्हणाले, तुम्हा बायकांना या बाबतीत कांही कळत नाहीं. तिची गय केली तर आज आपले अडीचशें जातील; तर, उद्यां कोणाला अडीच हजाराला ती बुचाडील. तूं बस गप्प. आते कसली आणि मावशी कसली.'

रंगोपंताने म्हटल्याप्रमाणें डाकूरच्या पोलिसला तार केली. ती बाई तेथे उतरते तोंच तिला पोलिसने पकडलें, परंतु तिची झडती घेतली तरी, त्यात नथ कांहीं निघाली नाहीं. तथापि तिला पोलिसने फिर्याद ज्या ठिकाणाहून आली, त्या ठिकाणीं म्हणजे निझामपूरला रवाना केलें.

दोन दिवसांनी ती बाई पोलिसच्या अटकेत अशी निझामपूरला पोंचली व फिर्यादी रंगोपंत याजकडे पोलिस त्या बाईला घेऊन आले. झडतींत तिच्याजवळ चोरीच्या नथीची डबी सांपडली नाहीं. असें पोलिसने सांगितलें; तेव्हां रंगोपंत म्हणाला:—

'अहो, हिनें ती डबी एखाद्या साथीदाराजवळ दिली असेल!' हा सर्व प्रकार रंगोपंतांच्या बिऱ्हाडाच्या पडवींतच चालला होता. रंगोपंताच्या तोंडचे हे शब्द ऐकून ती म्हातारी फारच संतप्त झाली व म्हणाली, 'माझेच नष्टचर्य बाबा म्हणून मी तुमच्या घरांत उतरल्यें. माझ्या पदरचे पंधरा रुपये तुमच्या बायकोला खर्चाला दिले, त्याचा मोबदला म्हणून माझी ही अशी धिंडका व शोभा सर्व जगासमोर चालली आहे. कुठून मला बुद्धि झाली तुमच्याकडे पुन्हा येण्याची कोण जाणे ? असो विश्वेश्वराची मर्जी !'

त्या यात्रेकरू बाईचे हे शब्द तारेने ऐकल्याबरोबर तिलाही फार वाईट वाटलें व तीही हळूहळू अश्रु ढाळूं लागली.

पोलिसानें त्यास विचारलें, ' रंगोपंत ' तुमच्या बायकोचा वहीम या बाईवर आहे काय ?,

हा सवाल ऐकून धिटाई करून परंतु कांपत कांपत तारा पुढें झाली व म्हणाली, माझी खात्री आहे कीं नथ कांही या बाईने चोरली नाहीं. म इयावर दया करा व त्या बाईला सोडा. '

रंगोपंत म्हणाले, ' बायकांना काय समजतें या बाबतींत ! अहो हिनेच चोरली असेल. '

पोलीस ऑफिसर तिकडे पाहून म्हणाला, ' तुमच्या घरांत दागिन्यांच्या डब्याला हात लावणारें चाकरमाणूस कोणी दौलतपूरला होतें काय ? '

तारा म्हणाली. ' मोलकरीण रामप्यारी हिला मी कधीं कधीं डबा उघडण्यास सांगत असे. '

इतकें ऐकून पोलीस अंमलदार म्हणाला. ' बस्स. सध्या या यात्रेकरू बाईला. रंगोपंत तुम्ही आपल्या घरीं राहूं द्या. दोन दिवसांत पुढें काय करावयाचें हे मी तुम्हांला कळविनों. '

यानंतर पोलीस ऑफिसरनें दौलतपूरच्या पोलीसला तार केली कीं. रंगोपंत गुडरूकार यांच्या घरीं पूर्वी असणारी मोलकरीण रामप्यारी इचा झाडा घ्यावा. ही तार गेल्याप्रमाणे दौलतापुरच्या पोलीसनें रामप्यारीच्या रहाण्याच्या खोलीची झडती घेतली तेव्हां तिच्या सामानांत नथ अशी नव्हे पण तोडलेल्या नथेचीं पांचदहा मोत्यें सांपडलीं. त्या ठिकाणच्या पोलीसचा तारेनें निझामपूरला रिपोर्ट आला कीं, नथेचीं मोत्यें सांपडलीं. हे उत्तर येतांच निझामपूरचा पोलीस अंमलदार दुसऱ्या दिवशीं दहा वाजतां रंगोपंताकडे आला व म्हणाला, ' महाराज, आपण त्या म्हाताऱ्या यात्रेकरू बाईला उगाच त्रास दिलात. ती निरापराधी आहे. तुमची नथ दौलतपूर येथील तुमच्या मोलकरणीनें चोरली. ही पहा तिकडची तार. '

तार पहाताच रंगोपंतालाही त्या निरापराधी बाईला आपण छळल्याबद्दल अतोनात वाईट वाटलें. ती बाई तारेशीं बोलत स्वयंपाकघरांत बसली होती. रंगोपंतानें जाऊन तिला साष्टांग नमस्कार घातला व तो म्हणाला, ' बाई ! मी भलताच आळ घालून आपणाला छळलें याबद्दल मला क्षमा करा. '



बाई ! मी भलताच आळ घालून आपणाला छळलें याबद्दल मला क्षमा करा.

तारा म्हणाली, ' मीं प्रथम सांगितलेंच कीं, यांच्या हातून अशी चोरी याची नाहीं. पण आम्हां बायकांचें ऐकतें कोण ? '

रंगोपंत त्या बाईसमोर तसाच पडला होता. अखेर ती म्हणाली, ' उठा ! रंगोपंत तुमच्या हांतून चूक झाली व मला त्रास झाला खरा ! पण मी तें सर्व क्षमा करत्यें. '

' क्षमा करत्यें ' असे शब्द ऐकतांच रंगोपंत उठून उभा राहिला. ती बाई पुढें म्हणाली, ' क्षमा करण्याचा माझा अधिकारही आहे. आणि तुम्हीं माझ्या पायां पडला ही गोष्ट सुद्धां कांहीं अस्थानीं झाली नाहीं. मी तुमची सासू म्हणजे तारेची आई आहें. आजपर्यंत ही गोष्ट कांहीं मीं सांगितली नाहीं, पण तुमच्या-कडून खोटा आळ येऊन माझी शोभा झाल्यावर माझा तारेकडे ओढा कां लागला आणि कांहीं तरी प्रसंग साधून मी तुमच्याकडे कां उतरल्यें, याचा खुलासा मला आतां करणें जरूर झालें आहे. तारेला तुम्हीं त्या दिवशीं पैशां-बद्दल बोललांत तें माझ्यानें ऐकवलें नाहीं म्हणून मी तिला पदरचे रुपये दिले. उगीच वाटसरू कोणी असे पैसे देईल काय ? '

तारा म्हणाली, ' नाहीं हो आई ! कोणी देणार नाहीं. तुला प्रथम पाहिलें तेव्हांपासूनच ' तूं माझी आई ' अशी भावना माझ्या मनांत झाली. माझी आई कोठें तरी जिवंत आहे, असें लग्न होईपर्यंत माझा मामा म्हणे. पण अशा विलक्षण रीतीनें तूं मला भेटशील हें मला तरी काय स्वप्न पडणार ? ' असें म्हणून तारेनें आपल्या वृद्ध मातेच्या गळ्याला जाऊन मिठी मारली.

रंगोपंत पुन्हा म्हणाला, ' मातोश्री, माझ्या चुका व अपराध क्षमा करा. '

येणेंप्रमाणें तारेची आई तारेला लाधली. यापुढें तिनें यात्रा करण्याचें सोडून जांवयाच्या व मुलीच्या आग्रहानें ती त्यांच्याजवळच राहूं लागली व तिच्या सद्बोधानें रंगोपंतांचें मदिराव्यसन जवळ जवळ अजीबात सुटलें, व तारा आणि रंगोपंत यांचा संसार मोठ्या सुखासमाधानानें पुन्हा चालूं लागला.

---

# मागून आणलेली सरी.





कांहीं वर्षांमागें मुंबई शहरांत गिरगांवांतील एका चाळींत गोपीनाथपंत आठवले, ह्या नावाचा एक बत्तीस वर्षांच्या वयाचा इसम राहात असे. त्याचा बाप भिक्षुक असल्या-कारणानें त्याचा अभ्यास मराठी शाळेंत जितका होण्या-जोगा होता, त्याहून जास्ती झालेला नव्हता. त्याची मराठी सहाव्या इयत्तेची परीक्षा पसार होऊन त्याला भायखळ्यावरील एका शाळेंत एक लहानशी नोकरी लागली होती. परंतु शाळेंत पगार थोडा मिळत असल्याकारणाने त्याने ती नोकरी सोडून दिली होती. व हल्लीं तो गणपतराव किरकिरे ह्या व्यापाऱ्याच्या दुकानावर कारकून ह्या नात्यानें सोळा रुपये पगारावर राहिला होता. तो रोज सकाळीं दहा वाजतां जेवून आपल्या नोकरीवर जाई, तो संध्याकाळीं सहा [illegible] व जता आपल्या बिऱ्हाडी परत येई. हा त्याचा क्रम अलीकडे तीन वर्षें अव्याहत चाललेला होता.

गोपीनाथपंताची बायको सगुणाबाई ही त्यांच्याच मु[illegible]ग रुपांची होती, व ती मूळची सुरेख असून हल्लीं ऐन तारुण्याच्या [illegible]ल्याकारणानें ती अतोनात मोहक दिसत असे. तसेंच ती स्वभावानें [illegible]ल व उपकारी अस-ल्याकारणानें ती त्या चाळींतील सर्व माणसास [illegible]वीशी वाटे. थोडक्या पैशांत संसार चालविण्याची तिची हातोटी [illegible]. पतीच्या पगाराचे जे सोळा रुपये, त्यांत ती काटकसरीनें प्रपंचाच्या सर्व [illegible]जा भागवून एकाद् दुसरा रुपया शिलकीस देखील टाकीत असे.

गोपीनाथपंत व सगुणाबाई ह्या दोघांमध्यें कधीं तंटा, बखेडा झालेला कोणी पाहिला नव्हता; गुण्यागोविंदानें व सुखासमाधानानें राहणाऱ्या पतिपत्नींसंबं-धाची बोलणी चालली असतां गोपीनाथपंत व त्यांची बायको यांची प्रशंसा कर-ण्यांत येत असे. रागीटपणाचें वर्णन करावयाचें असतां जसें जमदग्नीचें किंवा दातृत्वाचें वर्णन करावयाचें असतां जसें कर्णाचें नांव निघावयाचेंच, त्याप्रमाणें

पतिपत्नी प्रेमाविषयीं बोलणें चाललेलें असतां त्यांत गोपीनाथपंत व त्यांची बायको यांचें उदाहरण देण्यांत येत असे.

परंतु शिवशिव !! बाह्य देखावा आणि अंतःस्वरूप ह्याच्यामध्यें कितीं तरी प्रसंगीं विसंवाद असतो ! हें जोडपें बाहेरून दिसावयास सुखी असे दिसत असे; परंतु हीं माणसें खरोखरीं सुखी नव्हतीं. आपण सुरेख आहों, हें सगुणाबाई जाणून होती. ती आपल्या वेणीफणीवर अतोनात मेहनत घेत असे. नेसलेल्या लुगड्याची ठेवण न बिघडावी, म्हणून ती गृहकृत्यें फार फार जपून करीत असे. वेणीफणींत किंवा नेसण्यासवरण्यांत कांहीं विस्कळीतपणा झाल्याचा तिला संशय आल्याबरोबर ती आरशांत पाहून सर्व कांहीं यथास्थित करी, आणि नंतर ती हातचें काम पुरतें करीत असे. झाडसारव करतांना आपल्या तोंडावर, केंसावर, किंवा लुगड्यावर धुराळा उडाला असतां आधीं ती तें काम बंद ठेवून सर्व कांहीं यथास्थित करून, नंतर ती आपलें काम पुरतें करीत असे. स्वच्छता व नीटनेटकेपणा हा गुण वाईट नाहीं; परंतु तो सगुणाबाईच्या अंगीं जरासा बाजवीपेक्षां अधिक होता असें म्हणणें प्राप्त आहे. परंतु ह्या गुणाकडे आपण दुर्लक्ष केलें, तरी तिच्या अंगांत आणखीही एक दुर्गुण होता. ती भारी महत्त्वाकांक्षी होती, आणि तिची महत्त्वाकांक्षा सफळ होण्याजोगी नसल्या कारणानें ती अंतःकरणांत फार कष्टी झालेली असे. आपल्या सौंदर्यास अनुरूप असे दागिने आपणास असावे, आपल्या गोंडस शरीरास अनुरूप अशीं उंची लुगडीं आपणास नेसावयास असावीं, जरीकाठी चोळ्या असाव्या, इतरांच्या घरीं जसे गृहकृत्यासाठीं नोकर असतात, तसे आपल्याही घरीं असावे, असें तिला वाटत असे. ह्या तिच्या इच्छा सफळ होत नव्हत्या, म्हणून तिला अतोनात खेद होत असे. तिचा महत्त्वाकांक्षीपणा गोपीनाथपंतांस पूर्णपणें ठाऊक होता; परंतु तो बिचारा काय करणार ! त्याचा पगार अवघा सोळा रुपये. ह्या एवढ्याशा पगारानें संसार करून बायकोच्या इच्छा तो कशा भागवणार ! सोलापुरी बाड घेण्याची ज्याला ऐपत नव्हती, तो धनवडी लुगडी कशीं घेणार !

एके दिवशीं गोपीनाथपंत नित्याप्रमाणें नोकरी करून संध्याकाळीं घरीं आला, तेव्हां सगुणाबाई त्याची पत्नी त्याच्या तोंडाकडे टक लावून म्हणाली, " आज स्वारीचा चेहरा आनंदित दिसत आहे ! माझ्या नथेसाठीं जोडीचीं मोतीं गोवर्धनराम जवाहिऱ्याकडून आणावयाचीं होतीं, तीं आज आणणें झालें आहे वाटतें ! "

त्यावर गोपीनाथपंत म्हणाला, " छे: ! नथेसाठीं [illegible] कसचीं आणतों! पण आनंद वाटण्याजोगी गोष्ट झाली आहे, हें खरें आहे ! " त्यावर सगुणाबाई म्हणाली, " ती कोणची ?" गोपीनाथपंत म्हणाला, ' माझे यजमान गणपतराव किरकिरे, यांच्या घरीं मी आज तीन वर्षें नोकरीस आहें, परंतु त्यांच्या घरचें आपणास कधींच आमंत्रण आलें नाहीं. पण आश्चर्य हें कीं, उद्यां त्यांच्या घरीं सत्यनारायण आहे. त्यांनीं मला, आणि त्यांच्या बायकोनें तुला, उद्यां प्रसादासाठीं आणि फराळासाठीं बोलाविलें आहे ! आपणां दोघांसही गेलें पाहिजे. '

सगुणाबाई, आपल्या पतीनें नथेच्या जोडासाठीं मोतीं आणिलीं नाहींत हें पाहून निराश झाली. तिला गणपतराव किरकिरे यांच्या घरचें आपणास सत्यनारायणासाठीं आमंत्रण आलें, ह्या गोष्टीबद्दल कांहीं आनंद झाला नाहीं. ती आपल्या पतीस म्हणाली, " सत्यनारायणाठीं आमंत्रण आलें, त्यांत आनंद मानण्याजोगें काय आहे ? मला नेसावयाला लुगडें देखील नाहीं! मी जाऊं तरी कशी? हें विटकें लुगडें नेसूनच त्यांच्या घरीं जावयाचें कीं काय? "

गोपीनाथपंत:—" तुझें एकादें लुगडें बासनांत नाहीं काय? "

सगुणाबाई:—" कोठून असणार ! श्रावणाच्या महिन्यांत आपल्याजवळ लुगडें आणावयापुरते पैसे नव्हते, तेव्हां आपण ' बासनांतील लुगडें नेसावयास काढ. ' म्हणून मला सांगितलें, त्यावरून मी हें नेसावयास काढलें. आतां बासनांत आणखी कोठलें लुगडें असणार ? "

गोपीनाथपंत म्हणाला, " खरेंच. आतां बासनांत लुगडें नसणारच ! मग कसें करावयाचें ? कधीं येत नाहीं तें आमंत्रण आलें आहे. आपणांस गेलें पाहिजे ! "

सगुणाबाई:—आपण पाहिजे तर जावें, मी तर कांहीं येणार नाहीं ! किरकिऱ्यांच्या घरीं जुनेरें नेसून कां जावयाचें ? "

गोपीनाथपंत बुचकळ्यांत पडला. किरकिऱ्यांच्या आमंत्रणाचा अव्हेर करणें त्याला बरोबर वाटेना. बायकोचीं दोन्हीं लुगडीं घरांत नेसावयाला योग्य असलीं, तरी सत्यनारायणाच्या प्रसंगासाठीं योग्य अशीं नव्हतीं. आतां काय करावयाचें ? अशी त्यांस चिंता येऊन पडली. त्यानें बायकोस विचारलें, " ह्या प्रसंगीं किती रुपये किंमतीचें लुगडें तुला जरूर आहे ? "

सगुणाबाई:—" चंद्रकळा, किंवा शेलारी, किंवा दुसरें असेंच कोणतें तरी लुगडें नसलें पाहिजे आणि त्यांना अठरा, वीस रुपये किंमत पडते. "

हें ऐकून गोपीनाथपंत— " मी मला सखलादीचा अंगरखा करावयासाठीं वीस रुपये जमविले आहेत. त्या वीस रुपयांचें तूं लुगडें घे. मी सखलादीचा अंगरखा पेस्तर साली करवीन. "

हें ऐकून सगुणाबाईस आनंद झाला. आपल्या सौंदर्यास शोभेल असें लुगडें आपणांस नेसावयाला मिळेल हें मनांत येऊन तिला फार आनंद झाला. तेव्हां ती म्हणाली. " पुरुषांचा पोशाख कसलाही असला तरी कोणी बोलत नाहीं. परंतु बायकांची लुगडीं, चोळ्या वगैरे यथास्थित नसल्या तर टीका होते. बरें, मला लुगडीं दाखवावयास केव्हां आणावयाचीं ? उद्यांच सकाळीं आणिलीं पाहिजेत! लुगड्याची घडी मोडावयास उद्यांचा दिवस चांगला आहे. "

त्या दिवशीं रात्रीं सगुणाबाई निजली असतां तिला एकसारखीं लुगड्यांचींच स्वप्नें पडत होतीं !

दुसऱ्या दिवशीं सकाळीं गोपीनाथपंतानें कापडवाल्याकडून नानाप्रकारचीं लुगडीं आपल्या बायकोस दाखवावयासाठीं आणिलीं. तीं पाहून सगुणाबाईनें साडे अठरा रुपयांची एक शेलारी पसंत केली. ती ठेवून घेऊन बाकीचीं लुगडीं गोपीनाथपंतानें दुकानदारास परत नेऊन दिलीं. आपल्यासाठीं सखलादीचा अंगरखा न करविता आपल्या बायकोस आपण शेलारी घेऊन देऊन तिची हौस पुरविली, म्हणून गोपीनाथपंतास आनंद झाला.

दुपारीं जेवण झाल्यावर गोपीनाथपंत आपल्या बायकोस म्हणाला, " लाडके, [illegible] नसून कशी दिसतेस पाहूं तर खरी ! " आपण सुंदर आहों, हें सगुणा[illegible] जाणून होती. शेलारी नेसल्यानें आपल्या सौंदर्यांत भर पडेल, हेंही ती जाणून होती; परंतु साधेभोळेपणाचा बहाणा करून ती म्हणाली, " शेलारी नेसून मी आणखी कशी दिसणार ? दहा जणींसारखी दिसेन ! "

गोपीनाथपंत:—" नेस तर खरी ! मग दहाजणींसारखी दिसतेस कीं शंभर जणींसारखी दिसतेस तें पाहूं ! "

सगुणाबाईला मी शेलारी केव्हां एकदाची नेसेन असें झालें होतें. तेव्हां ती [illegible] " आपला आग्रहच असेल तर नेसतें बापडी ! "

[illegible] म्हणून ती स्वयंपा[illegible] गेली. आपल्या अंगीं होती नव्हती तितकी सारी करामत खर्च करून [illegible] शेलारी नेसून बाहेर आली. ती मूळचीच सुंदर होती, आणि तशांत कोरी [illegible] नेसलेली, मग ती खरोखरीच अत्यंत सुंदर दिसत होती हें सांगावयास [illegible] काय ? तिच्या पतीनें तिच्याकडे विलास-

भरित दृष्टि फेंकून हंसत हंसत म्हटलें, " लाडके, तूं तर स्वर्गीय अप्सराच दिसतेस ! "

आपण सुंदर दिसतों हें सगुणाबाई जाणून होती. आपला पति आपलें सौंदर्य पाहून खूष झाला म्हणून तिला अंतःकरणांत अतोनात आनंद झाला; तो झांकावयाचा तिनें प्रयत्न केला, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. तो आनंद तिच्या हंसण्याच्या रूपानें बाहेर फुटत होता ! ती मुरका मारून म्हणाली, " इश्श बाई ! मी आपली दहा जणींसारखी दिसतें. मी कसची अप्सरा !! आजचें सर्व कांहीं ठीक आहे. परंतु माझ्या गळ्यांत सरी नाहीं, येवढीच कायती उणीव आहे. खरोखरी एका सरीनें काय होणार ? गोंठ, तोडे, चंद्रहार, वगैरे दागिने तर पाहिजेतच. परंतु घटकाभर त्यांची गोष्ट बाजूला ठेविली, तरी निदान सरी तरी पाहिजे ! "

गोपीनाथपंत—" तुला सरी कशाला पाहिजे ! तूं मूळचीच सुंदर आहेस. दागिन्यांची ती कृत्रिम शोभा तुला कशाला पाहिजे ! कुरूप माणसाचा कुरूपपणा झांकावयासाठीं दागिने ! तुझ्यासारख्या अप्सरेला दागिन्यांची जरूरी नाहीं ! "

सगुणाबाई आपल्या सौंदर्याची प्रशंसा ऐकून अतोनात खूष झाली, परंतु ती महत्त्वाकांक्षी होती. आपल्या अंगावर दागिने असावे, असें तिला वाटत होतें. ती म्हणाली, " गणपतराव किरकिऱ्यांच्या घरीं जावयाचें आहे. गोंठ, तोडे, वाकी, चंद्रहार वगैरे दागिने नसले तरी एकवेळ चालेल, परंतु निदान सरी तरी पाहिजे. सरीशिवाय मी कांहीं बाई घरातून हालावयाची नाहीं ! "

याप्रमाणें सगुणाबाईचें निग्रहात्मक भाषण ऐकून गोपीनाथपंतास भारी खेद वाटला. आपल्या पत्नीची हौस पुरवावयासाठीं त्यानें सखलादी अंगरख्याची आपली स्वतांची हौस बाजूला ठेविली होती. तिला शलारी घेऊन द्यावयासाठीं त्यानें साडेआठरा रुपये खर्चिले होते, आणि इतकें करूनसुद्धा ती असंतुष्ट असलेली पाहून त्याला खेद कां वरें वाटणार नाहीं ! तो तिला म्हणाला, " सरी हा दागिना इतका जरूरीचा आहे काय ! तुला सरी नसली तर चालणार नाहीं काय ! "

सगुणाबाई:—" अगदीं चालणार नाहीं ! जसें मंगळसूत्र जरूर आहे, तशीच सरीही जरूर आहे. आपल्याहून कमी दर्जाच्या लोकांच्या बायकांसही सऱ्या असतात. ती पहा गोपिकाबाई ! नुसती भटाभिक्षुकाची बायको. पण तिच्या

देखील गळ्यांत सरी आहे ! तशीच ती चंद्रिकाबाई ! ती यःकश्चित् पुराणिकाची बायको ! तिची सरी आहे. तशीच ती रुक्मिणीबाई ! ती तर काय ? तिचा नवरा धंदा बडव्या आहे, पण त्या रुक्मिणीबाईची सरी आहे ! ती बाळंभट ! ह्या इथल्या देवळांत पुजारी आहे. पण त्याच्या बायकोच्या देखील गळ्यांत सरी आहे ! आणखी अशी किती उदाहरणें सांगूं ? सरीशिवाय आम्हां बायकांचें चालत नाहीं. मी आज किती तरी दिवस सरीसाठीं आपल्या पाठीस लागलें आहे. पण आपण मनावरच घेत नाहीं. सरी नसली म्हणजे अशी पंचाईत होते ! "

गोपीनाथपंतः—" आता कसें करावें ? ह्याला तोड ? किरकिऱ्यांचें आमंत्रण अव्हेरणें, हें सभ्यपणाचें होणार नाहीं ? कांहीं तरी तोड काढली पाहिजे ! "

त्यावर सगुणाबाई.—" तोड काय काढायची ? कोणाची तरी सरी आजच्या दिवसापुरती मागून आणिली पाहिजे. "

गोपीनाथपंतः—" लोकांची जिन्नस मागून आणून थाटमाट करणें हें मला अगदीं पसंत नाहीं ! "

सगुणाबाईः—" तर मग कसें करावयाचें ? जायला तर पाहिजे; आणि कोणाची सरी तर मागून आणावयाची नाहीं. ह्या दोन गोष्टी होणार कशा ? ( आठवलेंसें करून, ) हां हां ! मला एक तोड सुचतें आहे. सांगूं का ? "

गोपीनाथपंतः—" सांग पाहूं ! "

सगुणाबाईः—" सांगतें. माझी मावसबहीण आहे की नाहीं, ती फणसवाडींत राहात असते. तिची सरी मी आजच्या दिवसापुरती मागून आणतें. उद्यां तिची तिला परत करूं. तिच्याकडून ही जिन्नस मागून आणावयास हरकत नाहीं. ती टमाबाई आपली नातलग म्हटली, तर नातलग आहे. नातलग नाहीं म्हटली, तर नातलग नाहीं. जवळची म्हटली तर जवळची. दूरची म्हटली तर दूरची आहे. तिची जिन्नस मागून आणून आजचा दिवस साजरा करावयास कांहीं देखील हरकत नाहीं. "

गोपीनाथपंतः—" तुला बरें वाटत असल्यास तसें कर ! मी आतां आपल्या नोकरीवर जातों. मी परत आल्यावर आपण दोघे किरकिऱ्यांचे घरीं जाऊं. " असें म्हणून गोपीनाथपंत डोकीवर पागोटें ठेवून बिऱ्हाडांतून बाहेर पडला.

त्याच्या पाठोपाठ सगुणाबाई देखील टमाबाईच्या घरीं जावयासाठीं आपल्या गाहाळ्यास कुलूप लावून बाहेर पडली.

संध्याकाळचे सात वाजले. गोपीनाथपंत आपल्या नोकरीच्या ठिकाणाहून परत आला, तेव्हां त्याची स्त्री सर्व तयारी करून त्याची वाट पाहात होती. ह्या वेळीं तिच्या हातांत एक सरी होती, तिच्याकडे ती टक लावून पाहात बसलेली होती. गोपीनाथपंतानें तिला विचारलें, “ तुझी तयारी आहे ? ”

ती:—“ हो ! अगदीं तयारी आहे. ”

तो:—“ सरी मागून आणिलीस काय ? ”

ती:—“ हो ! ही पाहा. ” असें म्हणून तिनें आपल्या हातांतील सरी वर उचलून धरून ती हलवून आपल्या पतीस दाखविली.

गोपीनाथपंत:—“ अग, ही सरी कांहीं चमत्कारिकच दिसते ! तिच्या मानेवर कोयंड्यासारखें काय दिसतें आहे ? ”

सगुणाबाई:—“ अलीकडे ही नवीन तऱ्हा निघाली आहे. सऱ्या नेहमीं मानेवर मोडतात, म्हणून ही युक्ति केलेली असते. सरीचे मानेजवळ दोन तुकडे करून त्याच्या टोंकाला दोन कोयंडे केलेले असून ते एकमेकांत अडकावलेले असतात. ह्या कोयंड्याच्या ठिकाणीं सरी फाकटून गळ्यांत घालतां येते. व गळ्यांतून काढता येते. ”

हें ऐकून गोपीनाथपंतानें ती सरी आपल्या स्त्रीच्या हातून आपल्या हातांत घेऊन पाहिली आणि म्हटलें, “ ही अजब युक्ति आहे खरी ! बिजागरीवर जसें दार उघडतां मिटतां येतें, तसे ह्या कोयंड्यावर सरीचे दोन तुकडे फाकटतां येतात. ह्या सरीचा हा कोयंडा अगदीं अधू आहे. तो मोडणारबिडणार तर नाहीं ना ? ”

सगुणाबाई ( हंसून ):—“ मोडायाला काय झालें आहे ? तो इकडेतिकडे लागणार आहे कीं काय ? ”

गोपीनाथपंत:—“ तुला आपले मी बजावून ठेवितों. ”

सगुणाबाई:—“ तें बजावावयाला कशाला पाहिजे ? मी कां निष्काळजीपणा करीन ? आणि दुसऱ्याच्या सरीशीं ? ह्या सरीची आणखी एक खुबी पाहिली काय ? तिच्या एका एका बाजूस चवदा गजरे आणि बारा वाकी आहेत. आणि दर एक गजरा आणि वाक, त्यांच्यामध्यें तीन तीन पीळ आहेत. नेहमीं सऱ्यांना दोन दोनच पीळ असतात. ”

गोपीनाथपंतः—" ही सरी मानेवर फारच बारीक आहे."

सगुणाबाई:—" ज्या सऱ्यांना मानेवर कायंड नसतात, त्या सऱ्या मानेवर मोडण्याची भीति असते, म्हणून त्या त्या जागीं जाडी केलेल्या असतात. परंतु ह्या सरीला तशी कांहीं भीति नाहीं."

गोपीनाथपंतः—( टीच घालून ) " सरीचा आटा टीचभर आहे." ( न्याहाळून पाहून ) " सरी मोठी सुरेख आहे." ( हातावर तोलून ) " शेराची असेल नाहीं !"

सगुणाबाई:—" होय, ती शेराची आहे."

येणेंप्रमाणें सरीचें वर्णन झाल्यावर ती सगुणाबाईनें आपल्या गळ्यात घातली. आणि ती यथास्थित बसली किंवा नाहीं हें तिनें आपल्या पतीस विचारलें. त्यावर तो म्हणाला, " होय ! ठीक बसली आहे. चल आता, आपणास उशीर होत आहे."

सगुणाबाई:—" हीं मी तयार आहें."

आपल्या बायकोचा हा थाटमाट पाहून गोपीनाथपंतास थोडेंसें हसूं आलें; परंतु तिचा उल्हास खचेल असें तो कांहीं बोलला नाहीं.

असो; हीं दोघेजण आपल्या गाहाळ्याला कुलूप लावून रस्त्यांत आलीं, आणि तेथें एक रेकला भाड्यानें ठरवून किरकिऱ्यांच्या घराकडे रवाना झालीं.

किरकिऱ्यांच्या घरीं ह्या दोघांही माणसांचा योग्य पाहुणचार झाला. सत्यनारायणाची पूजा समाप्त झाली. फराळाचीं पानें मांडण्यांत आलीं, सर्वांचे फराळ आटोपले. विडा पानसुपारी वाटण्यांत आली. बायकांच्या मंडळींमध्यें सगुणाबाईनें आपल्या सौंदर्यानें सर्व स्त्रियांचे डोळे दिपवून सोडिले, व सर्व स्त्रियांनीं ती कोण, कोणाची, कोठली, वगैरे चौकशी केली. ज्या स्त्रियांना तिच्याशीं बोलण्याची संधि मिळाली, त्यांनीं आपणास धन्य मानिलें. आपला आदरसत्कार, आपली विचारपूस, वगैरे करण्यांत आलेली पाहून सगुणाबाई-जी महत्त्वाकांक्षी होती ती-अंतःकरणांत अत्यंत संतोष पावली !

किरकिऱ्यांच्या घरचा सर्व समारंभ आटोपला. मंडळींचें विसर्जन करण्यांत आलें. तेव्हां रात्रीचे साडे दहा वाजले होते. गोपीनाथपंत व सगुणाबाई हीं दोघेजण एकमेकांचे हात धरून घराचे बाहेर पडलीं, व एक रेकला भाड्यानें ठरवून आपल्या बिऱ्हाडीं परत आलीं.

रात्रीं निजावयाचें आर्धी शेलारी सोडून साधें लुगडें नेसावयाच्या अगोदर व अंगावरील दागिने काढून ठेवावयाच्या अगोदर, सगुणाबाई आरशापुढें उभी राहून आपलें सौंदर्य निरखून पाहूं लागली. आपलें सौंदर्य पाहून ती अंतःकरणांत अत्यंत आनंद पावत होती, असें तिचे चमकणारे नेत्र व किंचित् स्मितयुक्त ओष्ठ सांगत होते. गोपीनाथपंत तिच्या पाठीमागें कांहीं अंतरावर उभा राहून तिचा शरीरसौंदर्यासंबंधाचा गर्व पाहून गालांतल्या गालांत हसत होता. येणें-प्रमाणें सगुणाबाई आरशापुढें उभी राहून आपल्याच स्वतांच्या सौंदर्याच्या देखाव्याचा आस्वाद घेण्यांत तल्लीन होऊन गेली असता ती एकदम दचकली. व तिच्या तोंडून "अग बाईग !" असा आश्चर्यसूचक शब्द बाहेर पडला. ह्या उद्गारांत भीतीचाही फार मोठा भाग होता. हा आकस्मिक उद्गार ऐकून तिचा पति-जो तिच्या पाठीमागें उभा होता तो-पुढें होऊन म्हणाला, "काय झालें ? तूं इतकी कशानें घाबरलीस ?"

आपला पति आपल्या जवळच होता, व आपण आत्मसौंदर्यनिरीक्षण करीत असतां तो आपणाकडे पाहात होता, हें मनात येऊन सगुणाबाई पुन्हा दचकली. तिला लाज वाटली. परंतु ही लाजेची भावना क्षणार्धांत नष्ट होऊन तिच्या जागीं भयंकर भीतीची भावना प्रादुर्भूत झाली. ह्या भीतीच्या अतिरेकामुळें तिच्या तोंडून शब्दही निघेना. तेव्हां तिला तिच्या पतीनें पुन्हा विचारलें, "काय झालें ? सांग तर खरी !"

त्यावर ती तोतऱ्या आणि घाबरलेल्या स्वरानें म्हणाली, "कोठें गळून पडली कोण जाणे !"

गोपीनाथपंतानें विचारलें, "काय गळून पडली ?"

सगुणाबाई उत्तर न देतां स्तब्ध राहिली. पुन्हा गोपीनाथपंतानें विचारलें, "काय गळून पडली ?"

तेव्हां सगुणाबाई भीत भीत भीत म्हणाली, "माझ्या गळ्यांत सरी नाहीं ! ती कोठें गळून पडली कोण जाणे !"

हे स्त्रीच्या तोंडचे शब्द ऐकतांच गोपीनाथपंत अंगावर वीज पडल्याप्रमाणें दचकला आणि म्हणाला, "सरी गळून पडली ?"

ती:—"होय !"

नंतर गोपीनाथपंतानें स्वतां पाहून आपली खातरी करून घेतली. त्याच्या

स्त्रीच्या गळ्यांत सरी नव्हती ! तेव्हां तो म्हणाला, " तुझ्या ओंच्याला अडकली असेल ? "

त्यानंतर त्या पतिपत्नींनीं सर्व लुगड्यांत कोठे अडकली असेल म्हणून तें शोधिलें. परंतु सरी कोठेंहीं दिसेना !

गोपीनाथपंताने विचारलें, " किरकिऱ्यांच्या घरांत सरी पडली असेल काय ? "

ती:—" छेः ! मी किरकिऱ्याच्या घराच्या पायऱ्या उतरून रस्त्यांत येतांना ती चाचपून पाहिली, तेव्हा ती गळ्यांतच होती. मी तिचा फांसा बरोबर बसला आहे किंवा नाहीं, हें पदरावरून नीट चाचपून पाहिलें ! "

तो:—" तर मग ती सरी रेकल्यांत पडली असेल काय ? रेकल्यांत बसल्यावर ती तूं चाचपून पाहिली होतीस काय ? "

ती:—" रेकल्यांत बसल्यावर मात्र मी ती चाचपून पाहिली नाहीं ! "

तो:—" सरी रेकल्यांत तर पडली नसेल ? "

ती:—" मी काय सांगूं ? कदाचित त्या बिनपायऱ्याच्या रेकल्यांत आपण मला उचलून चढविलें, तेव्हां कदाचित सरीचा फांसा निघाला असेल, आणि ती रस्त्यांत पडली असेल, किंवा रेकल्यांत पडली असेल ! "

तो:—" ती कोठेंही पडली असली, तरी तिचा आवाज व्हावयास पाहिजे होता ! मी तर आवाज ऐकिला नाहीं. तूं ऐकिलास काय ? "

ती:—" नाहीं ! "

यानंतर गोपीनाथपंत दुःखाकुल अंतःकरणाने डोक्यावर पागोटें ठेवून पुन्हा आपल्या बिऱ्हाडाच्या बाहेर पडला. किरकिऱ्यांच्या घरापर्यंत तो काळजीपूर्वक निरीक्षण करीत करीत गेला, व तसाच पुन्हा निरीक्षण करीत करीत परत आला. रेकल्याचा नंबर त्याने पाहून ठेविलेला नव्हता. तथापि त्याला वाटेवर जे जे रेकले आढळले, त्यांपैकीं तो ज्या रेकल्यांत बसून आपल्या बिऱ्हाडीं परत आला होता त्याच्याप्रमाणें रंगविलेल्या सर्व रेकल्यांमध्यें त्याने डोकावून पाहिलें, परंतु त्याला सरी कोठेंहीं सांपडली नाहीं. शरीराने श्रांत आणि मनाने विषण्ण होत्साता तो निष्फळ शोधाअंतीं पहांटेच्या चार वाजतां आपल्या बिऱ्हाडीं परत आला. त्याची स्त्री त्याच्या आगमनाची मार्गप्रतीक्षा करीत जागत बसली होती. त्याला खिन्नवदन पाहून ती मनात चरकली. सरी सांपडली नाहीं हें तिनें तर्किलें, तथापि शब्दांनीं तिनें प्रश्न विचारिला, " का ? सांपडली का ? "

पतिः—" नाहीं ! "

ह्यानंतर ह्या पतिपत्नींचें विशेष संभाषण झालें नाहीं. ती बिचारी खिन्न अंतःकरणानें बिछान्यावर जाऊन पडली. आपल्या नटण्याच्या हौसेमुळें हा केवढा अनर्थ झाला, म्हणून सगुणाबाईस फार दुःख झालें. तिची तिला चांगली शिक्षा झाली, व तिला कृतकर्माबद्दल पश्चात्ताप होत आहे, हें पाहून तिला घडलेल्या गोष्टीबद्दल तिचा पति निर्भर्त्सनेच्या रूपानें अवाक्षरही बोलला नाहीं !

असो; दुसऱ्या दिवशीं सकाळीं गोपीनाथपंत शौचमुखमार्जनानंतर पोलिस इन्स्पेक्टराच्या ऑफिसांत गेला, आणि त्यानें त्याला झालेली हकीकत सांगून सर्व रेकलेवाल्यांचे नंबर, नांवें, व राहण्याचीं ठिकाणें उतरून घेतलीं; नंतर प्रत्येक रेकलेवाल्यास भेटून, " आमची सरी तुम्हांस मिळाली असल्यास द्या, तुम्हांला इनाम देऊं, " वगैरे प्रकारचें आश्वासन दिलें; परंतु सर्व रेकलेवाल्यांनीं " सरी आम्हांस मिळाली नाहीं, " असें उत्तर दिलें. हें सर्व व्हावयास आठ दिवस लागले. सरी कोठेंही मिळाली नाहीं. आतां कसें करावें, हा मोठा बिकट प्रश्न त्या हतभागी पतिपत्नींच्या पुढें येऊन उभा राहिला !

त्यांनीं सरीचें वजन शेराचें असावें असें एकमेकांच्या विचारानें ठरवून गमावलेल्या सरीचा मोबदला मुकाट्यानें त्याच सरीसारखी सरी घडवून ठमाबाईला द्यावी, असा निश्चय केला. हा दागिना तयार करावयास सातशें रुपये पाहिजेत, असा त्यांनीं अजमास केला. गोपीनाथपंत हा एका भिक्षुकाचा मुलगा असल्याकारणानें त्याच्याजवळ वडिलोपार्जित जिंदगीच्या नांवानें आंवळ्यायेवढें होतें. तसेंच गोपीनाथपंतास दरमहा सोळाच रुपये पगार असल्याकारणानें, त्याच्याजवळ त्याच्या स्वतःच्या कमाईचा पैसादेखील मुळींच काहीं नव्हता. सातशें रुपये कर्ज काढून ठमाबाईची सरी भरून द्यावयाची, असा त्यांनीं निश्चय केला. दुसरा इलाजच नव्हता. मग गोपीनाथपंतानें आपल्या मित्रमंडळीकडे जाऊन सातशें रुपयांची रक्कम उभी केली. त्याला एकानें दहा रुपये दिले, एकानें सवापांच दिले, एकानें आठ दिले, एकानें साडे अकरा रुपये दिले, अशा रीतीनें सुमारें शंभर असामींकडून लहानमोठ्या रकमा घेऊन त्यानें एकदाची सातशें रुपयांची भरती केली, आणि नंतर सोनें विकत घेऊन एका खातरीच्या सोनाराजवळ बसून त्यानें ठमाबाईच्या सरीसारखी सरी घडवून आणिली. ही सरी घेऊन सगुणाबाई ठमाबाईच्या घरीं गेली. त्यावेळीं ठमाबाई स्वयंपाक करीत बसली होती, तिला सगुणाबाई म्हणाली, " ठमाबाई, ही तुमची सरी आणिली;

आहे ती नीट पाहून घ्या." ठमाबाई म्हणाली, "पाहून काय घ्यावयाची आहे! ती त्या पाटावर ठेव. मी हात धुतले, म्हणजे ती पेटीत ठेवून देईन. इतके दिवस तूं मजकडे आली नाहीस हें कसें झालें?"

सगुणाबाई आपल्या हातून सरी हारवली, नंतर तिच्याबद्दल दुसरी सरी घडवून दिली; वगैरे कांहीं एक हकीगत न सांगतां ठमाबाईस म्हणाली, "मला किनई, फुरसूदच झाली नाहीं! नाहीं तर येणार होतें."

सरी पोंचविण्याचें काम करून सगुणाबाई परत आपल्या बिऱ्हाडीं आली.

कर्जाऊ काढिलेल्या सातशें रुपयांची फेड करण्यासाठीं ह्या पतिपत्नींनीं झटून मेहेनत करण्यास कंबर बांधिली. तीं दोघेंहीं प्रामाणिक माणसें होतीं, व कोणाहीं धनकोच्या हातावर तुरी देण्याचा विचार क्षणभरही त्यांच्या डोक्यांत आला नाहीं. सगुणाबाई महत्त्वाकांक्षी होती, मूर्ख होती, परंतु लबाड नव्हती. गोपीनाथपंतही शांत व कामसू असून अत्यंत प्रामाणिक होता. त्यानें ताबडतोब हल्लींची बिऱ्हाडाची जागा सोडून देऊन एक दोन रुपये भाड्याची जागा पतकरली. नव्या ठिकाणीं सामान सगुणाबाईनें स्वतः आपल्या डोक्यावरून वाहून नेलें. इतके दिवस खरकटीं भांडीं घासणें, दळण दळणें, वगैरे कामें मोलानें जात होतीं, तीं सगुणाबाईनें स्वतां करण्याचें पतकरिलें. तसेंच गोपीनाथपंत दिवसास नोकरी करून सोळा रुपये मिळवीत होता, त्यानें रात्रींहीं पांच तास दुसऱ्या एका व्यापाऱ्याच्या दुकानांत नोकरी करून आणखी सात रुपये ज्यास्ती मिळवावयास सुरवात केली. सगुणाबाई आपल्या घरचीं सारीं कामें उरकून शिवाय लोकांचेंही दळणकांडण, वगैरे कामें करून पैसे मिळवूं लागली. ह्या नवराबायकोंनीं अशा रीतीनें हाडाची काडें करून पैसा मिळविण्यास सुरवात केली, एकाच्याही तोंडून ह्या कष्टमय जीविताबद्दल खंती प्रदर्शित करणारा एकही शब्द कधीं निघाला नाहीं! अगदीं थोडी विश्रांति घेऊन दिवसाचा बहुतेक भाग तीं मेहेनत करण्यांत घालवीत असत. सुदैवानें असें झालें कीं, ह्या काबाडकष्टामुळें त्या दोघांपैकीं कोणीही आजारी पडलें नाहीं.

असो. अशा रीतीनें त्यांच्या आयुष्याचीं सहा वर्षें अत्यंत कष्टमय स्थितींत गेलीं. मानसिक चिंतेनें आणि शारीरिक कष्टामुळें सगुणाबाईचें सर्व सौंदर्य लुप्त झालें. तिच्या चेहेऱ्यावर म्हातारपणाची कळा आली! गोपीनाथपंतही बराच थकला; परंतु सगुणाबाईच्या इतका म्हातारा दिसूं लागला नाहीं. ह्या सहा वर्षांनीं एकदाचें कर्ज फिटलें! कर्जाच्या रकमेचा शेवटचा रुपया गोपीनाथपंतानें

ज्या दिवशीं शेवटच्या धनकोस नेऊन दिला, त्या दिवशीं त्या दोघां नवराबायकोंस शांतपणें झोंप लागली.

कर्जापासून मुक्तता झाल्यावर एके दिवशीं सगुणाबाई देवदर्शनासाठीं भुलेश्वराम गेली असतां तेथें देवदर्शनासाठीं आलेली ठमाबाई तिला दिसली. तेव्हां तिनें तिला म्हटलें, "बरें आहे ना ठमाबाई?"

सगुणाबाईच्या गेल्या सहा वर्षांत चिंतेमुळें अतोनात फेरफार झालेला होता, त्यामुळें ठमाबाईनें तिला अर्थात् ओळखिलें नाहीं. तेव्हां ती म्हणाली, "मी तुम्हांला ओळखिलें नाहीं. तुम्ही कोण, कोठल्या, तुमची व माझी पूर्वीं कोठें गांठ पडली होती, हें मला कांहीं आठवत नाहीं!"

सगुणाबाई:—"मी सगुणाई आठवले!"

हे शब्द ऐकतांच ठमाबाई आश्चर्यचकित झाली, आणि सगुणाबाईकडे निरखून पाहून म्हणाली, "आज सहा सात वर्षें तुम्ही कोठें होता. व तुम्ही इतक्या म्हाताऱ्याशा कशानें दिसू लागला?"

सगुणाबाई:—"अहो ठमाबाई, आम्हांला तुमची सरी भोंवली!"

ठमाबाई:—"माझी सरी भोंवली? माझ्या सरीनें तुमचें काय केलें?"

सगुणाबाई:—"अहो ठमाबाई, सहा वर्षांच्या मागें मला एकदां गणपतराव किरकिरे ह्यांच्या घरीं सत्यनारायणाचें आमंत्रण आलें होतें, म्हणून त्या दिवसापुरती तुमची सरी मी मागून आणिली होती."

ठमाबाई:—'होय! तें मला आठवतें. पुढें?"

सगुणाबाई:—"ती तुमची सरी मीं गळ्यांत घातली. किरकिऱ्यांच्या घरीं आम्ही उभयतां गेलों, आणि परत येतांना ती कोठें गळून पडली कोण जाणें!"

ठमाबाई:—"पण माझी सरी तुम्हीं मला परत दिली!"

सगुणाबाई:—"मीं जी सरी तुम्हांस दिली, ती तुमच्या सरीसारखी नवी घडवून दिली! तुमच्या जवळून जी सरी मीं परत आणली, ती कांहीं परत दिली नाहीं!"

ठमाबाई:—तुम्ही दुसरी सरी मला दिली ही गोष्ट माझ्या लक्षात आली नाहीं. एकदां मला वाटलें कीं, तुम्ही दिलेली सरी जराशी जड लागते. परंतु मी तिकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. पुढें ती गोष्ट माझ्या स्मरणांतही राहिली नाहीं!"



मथुराबाई:—" अहो ठमाबाई, आम्हांला तुमची सरी भोवली!"

सगुणाबाई:—"तुमची सरी शेरभर वजनाची असावी असें ठरवून आम्हीं सातशें रुपये कर्जाऊ काढिलें, आणि तुमच्या सरीसारखी दुसरी सरी घडवून तुम्हाला तुमची म्हणून परत दिली. हे कर्जाचे सातशें रुपये आम्हीं कालच फेडले. सातशें रुपये मिळवावयासाठीं आम्हीं भारी शरीरकष्ट सोशिले. चिंतेनें, आणि काबाडकष्टामुळें, मी इतकी थकलें!"

हें ऐकून ठमाबाई कपाळावर हात मारून देऊन दुःखाच्या स्वरानें म्हणाली "कर्म माझें!"

सगुणाबाई आश्चर्यानें तिच्या तोंडाकडे पाहात राहिली नंतर कांहीं वेळानें म्हणाली, "असें कां म्हणतां?"

ठमाबाई म्हणाली, "माझी सरी तुमच्या हातून सांडली, हें तुम्हीं मला तेव्हांच कळविलें असतें तर तुमच्या हालअपेष्टा साऱ्या वांचल्या असत्या!"

सगुणाबाई:—"त्या कशा!"

ठमाबाई:—"कशा म्हणजे? माझी सरी सत्तर रुपये किंमतीची देखील नव्हती. आणि ती भरून द्यावयासाठीं तुम्हांला सातशें रुपये कमवावे लागले!"

सगुणाबाई:—"तुमची सरी शेरभर वजनाची होती ना?"

ठमाबाई:—"होय, पण ती बांधीव होती!"

सगुणाबाई:—बांधीव म्हणजे काय?"

ठमाबाई:—"गर्भांत चांदी घालून वर सोन्याचा पातळ पत्रा बसवून जो दागीना करतात, त्याला बांधीव दागिना म्हणतात. आम्ही ती सरी सोलापुराहून करवून आणिली होती!"

सगुणाबाई:—"तुमची सरी सत्तरच रुपये किंमतीची होती काय?"

ठमाबाई:—"होय, मी खरें आहे तें तुम्हाला सांगतें. आम्हाला कोणाचा हरामचा पैसा घेणें नाहीं. हरामाचा पैसा घेतला असतां पुढच्या जन्मीं नरकयातना भोगाव्या लागतात! आज तुमच्या यजमानांना आमच्याकडे पाठवून द्या. म्हणजे ते दोघेजण बाजारांत जाऊन ती सरी विकून येतील. आमचे सत्तर रुपये काढून घेऊन बाकीचे जे राहतील ते तुम्ही आपले परत घ्या!"

सगुणाबाई आपल्या बिऱ्हाडीं परत आली, आणि तिनें ठमाबाईच्या बांधीव सरीबद्दलची हकीगत आपल्या पतीस सांगितली. तेव्हां त्याला आनंद वाटला.

# तुमचा सोन्या मोठा मेड्यालिस्ट झाला !



गणपतराव सारंगपूर येथील एका सरकारी ऑफिसांत नोकर होते. त्यांना पगार पन्नास रुपये मिळत होता. ते नुकतेच पदवीधर झाले होते. व या जागेवर लागलेच त्यांची नेमणूक झाली होती.

गणपतराव विवाहित होते. त्यांनी आपली पत्नी शांता हिला आपलेबरोबर आणलें होतें. घरांत शांतेखेरीज वडील माणूस वगैरे कोणी नव्हते. गणपतरावांना आई वगैरे कोणी नव्हती. शांतेची आई होती; पण ती आपले मुलाजवळ राहात असे. याप्रमाणें वडील माणसाचा अभाव असल्यामुळें एकट्या शांतेवरच तिच्या नूतन संसाराचा भार पडला, तरी शांतेनें थोड्याच वेळांत आपला संसार उत्तम रीतीनें थाटला.

शांतेचें माहेर एके काळीं चांगलें श्रीमंत आणि नावालौकिकाचें घराणें होतें. परंतु हल्लीं तें कालाच्या तडाक्यात सापडून अगदीं मोडकळीस आलें होतें. नाहीं म्हटल्यास, पूर्ववैभवाचें द्योतक काय तो थोडासा जमीनजुमला शिल्लक राहिला होता. पण हां ! दुसरेंही एक चिन्ह अजून कायम होते. ते कोणते म्हणाल, तर शांतेचे विशाल आणि पाणीदार नेत्र. तिजकडे पाहणाऱ्याला तत्सूचक पोशाखाची वगैरे इतर कांहीं उपांगें नसतांही तिच्या त्या नेत्रांवरूनच ती कोणा थोरामोठ्याची मुलगी असावी असें वाटत असे. शांतेला माहेरचें घरगुती शिक्षण चांगलें मिळाल्यामुळें, गणपतरावांच्या घरची व्यवस्था सुरेख आणि टापटिपीची राहूं लागली. आधींच तिला काम करण्याची हौस, आणि त्यात नवीन संसाराच्या हौसेची आणि आनंदाची भर पडली. मग काय विचारता ! तें गृह स्वच्छतेचें, व्यवस्थेचें आणि सौंदर्याचें माहेर घरच होऊन बसलें होतें, यांत नवल नाहीं.

गणपतराव घरखर्चाकरितां म्हणून पगारापैकीं कांहीं एक रक्कम दर महिन्यास शांतेच्या हवालीं करीत असत. घरांत काय खर्च होत असतो आणि तो कसा होत असतो, याविषयीं ते कधींही विचारपूस करीत नसत. किंबहुना त्यांना घरच्या कोणत्याच बाबतींत चिकित्सा करणें आवडत नसे. एखादे वेळेस शांतेनें

हें सांगावयास नकोच! परंतु आनंदापेक्षां त्याला ठमाबाईच्या प्रामाणिकपणाबद्दल आणि पापभीरुतेबद्दल अधिक साश्चर्य कौतुक वाटलें!

पुढील हकीगत तपशीलवार न देतां आम्ही इतकेंच सांगतों कीं, गोपीनाथपंत ठमाबाईच्या घरीं गेला. तिचा नवरा दत्तोपंत व तो, असे दोघे मिळून ती सरी घेऊन बाजारांत गेले. सोन्याचा भाव ह्या वेळीं वाढलेला असल्याकारणानें त्या सरीची किंमत नऊशें रुपये आली; त्यांपैकीं सत्तर रुपये दत्तोपंतानें ठेवून घेतले, व बाकीचे आठशें तीस रुपये गोपीनाथपंतास दिले.

येवढी मोठी अनपेक्षित रक्कम आपल्या घरीं चालून आली, हें पाहून सगुणाबाई आणि गोपीनाथपंत ह्यांस किती आनंद झाला असेल ह्याची कल्पना आम्हीं वाचकांवरच सोंपवितों!

ही आठशें तीस रुपयांची रक्कम गोपीनाथपंतास एकदम मिळाली, तेव्हां त्यानें ह्या भांडवलानें बेळगांवास देशी कापडाचें दुकान काढिलें. सहा वर्षांच्या लांबलचक दारिद्र्य स्थितींतील जीवनक्रमानें त्याला व त्याच्या स्त्रीला नियमितपणा, उद्योगीपणा, अल्पसंतोषीपणा, काटकसरीपणा, ह्या अमूल्य गुणांची संवय लागली होती ती पुढेंही कायम राहिली!

गोपीनाथपंताला धंद्यांत बरकत येऊन तो आज पंधरा हजारांचा मालक होऊन श्रीमंत लोकांत मोडत आहे. सगुणाबाईला लहानपणीं दागिन्यांचा अपरंपार हव्यास होता. आज सर्व दागिने तिला अंगावर घालण्याची ऐपत आहे, परंतु तिचा हव्यास आतां अगदीं नाहींसा झाल्याकारणानें तिनें कोणताही नवा दागिना करविला नाहीं! काबाडकष्टाच्या सहा वर्षांत जे दागिने तिच्या अंगावर होते, तेच दागिने ती अजूनही वापरीत आहे!

---

मोठ्या उत्सुकतेनें एखादा आवडीचा पदार्थ तयार करावा, परंतु तो चांगला बनला किंवा बिघडला याविषयीं गणपतराव कधींच चर्चा करीत नसत, त्यामुळें अशा प्रसंगीं शांतेचा फार हिरमोड होत असे; 'आपण अशा संबंधानें कांहींच बोलणार नाहीं तर माझा स्वयंपाक सुधारणार तरी कसा' असें शांतेनें म्हणावें. त्यावर गणपतराव म्हणत असत कीं, "आपल्याला जेवणासंबंधानें आवडनिवड पूर्वींपासूनच नाहीं आणि असली तरी, तुझे स्वयंपाकांत कांहीं न्यून असेल तर तिचा काहीं उपयोग; सगळें कांहीं उत्तमच असतें." यावर शांता काय बोलणार?

तरुण वय आणि मनमिळाऊ स्वभाव यामुळें गणपतरावांची मित्रमंडळी हां हां म्हणतां वाढत चालली. ख्यालीखुशाली आणि गाणेबजावणें यांमध्यें गणपतरावाचे दिवस जाऊं लागले. यावरून 'हें कांहीं लक्षण चांगलें नव्हे' असें शांतेच्या मनानें घेतलें, पण त्यासंबंधानें तिनें एक चकार शब्द देखील कधीं आपल्या नवऱ्याजवळ काढला नाहीं. जें कांहीं होईल तें मुकाट्यानें पहावयाचें व आपलेकडून शक्य ती खबरदारी घ्यावयाची असा तिनें निश्चय केला. तिनें विचार केला कीं, "आपल्याला सर्व प्रकारचें सुख मिळत असतां दुसऱ्याच्या सुखांत आपण कशाला व्यत्यय आणावा? ते शहाणेसुर्ते आहेत; त्यांना जग हें कसें आहे याचा लवकर अनुभव येईलच; असें असतां आपण उगीच मध्यें तोंड तरी कशाला घाला? शिवाय कोणत्याच प्रकारचें दुराचरण आपले नवऱ्याकडून होण्याचा संभव नाहीं; कारण ते फार समजदार आणि पापभीरु आहेत. त्यांना जगाचा अनुभव आला नाहीं इतकीच कायती गोष्ट आहे. परंतु हा अनुभव येतां येतां येत असतो; एकदम कांहीं येत नाहीं. जगाशीं संबंध येण्यापूर्वीं बहुतेक सर्व मनुष्यें चांगलीं असतात, वाईट माणसें असलीं तरी फार थोडीं आहेत, असा बहुतेक प्रत्येक तरुण मनुष्याचा ग्रह असतो. आणि अशा प्रकारचा आपल्या नवऱ्याचा ग्रह असावा, यांत कांहीं नवल नाहीं."

अशा रीतीनें बरेच दिवस लोटले. या जोडप्याच्या सुखांत आणि आनंदांत कोणत्याच रीतीचा व्यत्यय आला नाहीं. ईश्वरकृपेंकरून सर्व ठीक चाललें होतें. किंबहुना हें सुख द्विगुणित होण्याचा प्रसंग येऊन ठेपला. दुधात साखर पडली! गरोदरपणाचीं चिन्हें दिसूं लागलीं. मग आनंदास काय पारावार!!

पण या आनंदांत लौकरच विरजण पडलें. अलीकडे गणपतरावांच्या चेहऱ्यावर थोडी उदासपणाची छाया दिसूं लागली होती. त्याचीं कारणें काय असावीत याचा शांतेला तर्क बांधतां येईना. एकदां तिनें यासंबंधानें गणपतरावाजवळ चर्चा

काढलीच, परंतु " कांहीं नाहीं. ऑफिसच्या कामासंबंधाच्या विचारामध्ये असेन कदाचित्. त्यामुळें तुझा तसा ग्रह झाला असेल. बाकी कांहीं नाहीं. " परंतु हें कारण सांगतांना त्याचे मुद्रेवर जो फरक पडला होता त्यावरून हे कारण खरें नव्हें असें शांतेनें लागलेंच ताडलें. तरी यापलीकडे तिला जास्त विचारपूस करणें अशक्य होतें

रविवारचा दिवस. दुपारची वेळ. शांता ओटीवर डाळ निवडीत बसली होती. माडीवर गणपतराव कांहीं स्नेह्यांबरोबर गप्पा मारीत बसले होते. थोडे दिवसापूर्वी तिची आई आजारी असल्यासंबंधानें पत्र आलें होतें, त्यामुळें तिचें जिवास बरें वाटत नव्हतें. म्हणून तिचें डाळ निवडण्याकडे देखील लक्ष म्हणजे जेमतेमच होतें. अशा स्थितींत मन कोठेंना कोठें तरी भटकत असावयाचें. त्यामुळें तिचें लक्ष सहजगत्या माडीवर होणाऱ्या गप्पांकडे गेलें. माडीवर गणपतरावांसुद्धां चौघेजण होते. गणपतरावांजवळ त्यांचे डावे बाजूकडे खुर्चीवर एक गृहस्थ बसले होते. त्यांचें वय सुमारें चोवीस असावें; वर्ण गोरा असून चेहरा बराच मोहक होता; डोळे घाऱ्या रंगाचे होते; त्यांत कावेबाजपणाची छटा मारित होती. परंतु ती मार्मिक रीतीनें पाहाणाऱ्यांच्याच लक्षांत येण्याजोगी होती. यांचें नांव माधवराव माधवराव हे बी. ए. पर्यंत शिकले होते. त्या परीक्षेत तीन वेळा नापास झाल्यामुळें त्यांनीं परीक्षेचा नाद सोडून देऊन, तेथील हायस्कुलांत मास्तरची नौकरी धरली होती. ते फार खुशालचेंडू आणि चैनी गृहस्थ होते. यांचा सारंगपूर येथें मित्रवर्ग फार दांडगा होता. यांच्याच साह्यानें गणपतरावांची मित्रमंडळी इतक्या झपाट्यानें वाढली होती. स्वतः त्यांना गाण्याचा शोक होता; आणि त्यांचा आवाज बराच मधुर होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. या मंडळीपैकीं दुसरे गृहस्थ गणपतरावांपासून थोडेसे दूर--टेबलाजवळच्या खुर्चीवर—बसले होते. त्याचें वय सुमारें पंचेचाळीस वर्षांचें असावें. त्यांची शेंडी बरीच लांब असून ती ते मुद्दाम शोभेकरितां म्हणून टोपी बाहेर मागें लोंबत ठेवीत असत. ते जिल्हा-कचेरींत दास रुपयांवर नौकर होते. यांचें नांव हरीपंत. हरीपंत जरी वयस्क होते तरी त्यांचें हृदय अगदीं तरणेबांड होतें.

हरीपंतांचे स्नेही म्हणजे बहुतेक सगळी तरुण मंडळी! गाण्याबजावण्याच्या शोकामध्यें अगदीं त्यांचा पहिला नंबर! त्याचे येथें सकाळीं आ-संध्याकाळीं ते घरीं फार क्वचित् सांपडावयाचे–कोठें तरी गप्पा मारीत बसलेले असावयाचे; किंबहुना कधीं कधीं स्नान, जेवण वगैरेसुद्धां एखाद्या मित्राच्या येथेंच होत

दिली ! आणि इतकें असूनहीं स्वतः धर्माभिमानाची दिवटी लोकांपुढें पाजळायला आणि आपल्या कंगोरेबाज, नखरेबाज, आणि ऐटबाज, जुनाट चनोड्याची तरफदारी करावयाला तयार. काय खुमारी आहे पण खुमारी !

हरीपंत ( हंसून आपले नेत्र मिचकाविते, मिचकावित ):--अहो, आम्हां जुन्यांची बरोबरी तुम्ही नव गोमटे लोक काय करणार ! आम्ही जुने लोक वाटेल तें करूं. परंतु एक गोष्ट बाहेर फुटेल तर शपथ ! नाहीं तर तुम्ही नवीन लोक; चारी दरवाजे मोकळे. सगळा कारभार एका घटकेंत उघडा होतो. खरा मुत्सद्दीपणा तो तुम्हांस माहीतच नसतो. हो मुक्ताफळें ऐकल्याबरोबर सगळी मंडळी खों, खों, हासत सुटली.

**गणपतराव**:--वाहवारे ! मुत्सद्दीपणा ! तुमचा हा जुनाट मुत्सद्दीपणा आपलेपाशींच ठेवण्याजोगता आहे. नवीन लोकांस हा मुत्सद्दीपणा ऊर्फ लुच्चेपणा मुळींच नको.

**वामनराव** ( खों खों हंसत ):—काय ! मुत्सद्दीपणा पण मुत्सद्दीपणा ! अगदीं मिथळतो आहे पहा. जणूं काय, लोकांस माहीतच नाहीं, कीं हरीपंत अट्टल दर्ज्याचे बाटलीभक्त आहेत म्हणून; जणूं काय लोकांस माहीतच नाहीं, कीं हरीपंत कधीं कधीं-कधीं हो ! नहमी नाहीं--त्या आवडाजीच्या येथे जात असतात. अरे हो ! बरी आठवण झाली. परवां तीं आवडाजी म्हणत होती कीं, तिच्याही डोक्यावरून तुम्हीं आपला मुत्सद्दी हात फिरवला आणि चागला ५०-७५ रुपयांचा चट्टा बसावेला म्हणून.

हरीपंत किंचित् शरमून पण लागलेंच हास्यवदन करून म्हणतातः—काय पण सोदी आहे ? माझेच तिजकडे शंभर रुपये आहेत शंभर. अहो वामनराव, तिने तुमच्या जवळ ही निव्वळ गप्प झोकून दिली आहे. आणखी कांहीं नाहीं ! मोठी बिलंदर.

**माधव०**:—आण आपण सवाई बिलंदर.

यावर हरीपंत मोठ्याने हंसत हंसत, खुर्चीवरून उठले आणि माधवरावांच्या गळ्यांत हात टाकून म्हणतातः—क्यंव मेरे जान माधव, रागबिग आला काय ?

**माधवराव** ( गळ्यांतील हात काढित काढित म्हणतात ):—हरीपंताशिवाय आपल्याला तर बुवा एक दिवस देखील करमायचें नाहीं. मोठा गमती आणि रंगेल मनुष्य.

**वामनराव** ( सतरंजीवरून उठून म्हणतात ):—काय म्हणू आतां ? शुभमंगल सावधान !

**गणपतराव**—नाहीं नाहीं गंगायमुनांचा संगम म्हणा. कारण, माधवरावांच्या गौरवर्णास आणि हरीपंतांच्या कृष्णवर्णास ही उपमा फार चांगली खुलतें !

इतक्यांत हरीपंत जरा रंगांत येऊन एक लावणी म्हणूं लागले; आणि माधवरावही त्याना साथ देऊं लागले. केशवरावांनी जवळच पडलेलें एक पुस्तक घेऊन त्याचा तबला बनविला. वामनराव " क्या बात है ! वहावा ! वा ! मेरी जान ! " इत्यादि शब्दांनीं प्रोत्साहन देऊं लागले. गणपतराव काहीं गुणगुणत जामनीकडे पाहत ती लावणी लक्ष देऊन ऐकूं लागले. आणि आमच्या शांतिचें डाळ वगैरे निवडणें संपून ती सचितसुंद्रेने आरामखुर्चीवर एक पुस्तक वाचित पडली. पण ती नुसती पुस्तकाचीं पानें मात्र चाळीत होती; वाचण्याकडे म्हणाल तर तिचें लक्ष मुळीच नव्हतें.

लावणी संपल्यावर वामनराव जांभई देत देत " जावें आतां घरीं ! बरीच वेळ झाली आहे. " असें म्हणत म्हणत उठले आणि घरीं चालते झाले. त्याच पाठीमागून हरीपंत आणि माधवराव हेही खालीं उतरले. फक्त केशवराव आणि गणपतराव माडीवर राहिले. या दोघाचें हलक्या आवाजात बराच वेळ काहीं संभाषण चाललें होतें. तें संपल्यावर केशवराव खालीं उतरले आणि त्यानंतर थोड्याच वेळानें गणपतराव फिरण्याकरितां म्हणून घराचे बाहेर पडले.

माडीवरील भाषणें ऐकून शांतिच्या मनाला जोराचा धक्का बसला. बरीचशी रक्कम बाहेरच्या खर्चाच्या आणि लोकांस उसनेपासनें देण्याचे पायीं खर्च झाली आहे असें तिला समजून आलें. शिवाय केशवरावाच्या मालकाकडून आपले नवऱ्यानें काहीं तरी कर्जाऊ रक्कम घेतली असावी असा तिला पक्का संशय आला. गणपतरावाना बाटलीबाईची देखील दीक्षा मिळाली असें ऐकून तर तिचें काळीजच चर झालें. तरी आताच कोठें सुरवात झाली आहे आणि तीही अगदीं मर्जीविरुद्ध आणि निवळ मित्रांचे भिडस्तपणानें, या विचारानें तिला थोडेस दुःखात सुख वाटूं लागलें. ' आपण आतां बिलकुल हयगय करणें उपयोगी नाहीं. या वेळेसच काहीं आपल्या नवऱ्याचें या मार्गापासून मन वळविण्याचा प्रयत्न केल्यास ठीक ! नाहीं तर पुढें प्रसंग कठीण आहे ' असें तिला वाटूं लागलें. पण पुन्हां तिचे मनांत विचार आला कीं, ही गोष्ट म्हणण्यास फारच

सोपी दिसते, पण करण्यास फारच कठीण आहे. कारण, यासंबंधानें आपले नवऱ्याजवळ गोष्ट तरी कशी काढावयाची. चांगलें निभल्यास ठीक. नाहीं तर उगीच ढवळाढवळ केल्याबद्दल वाईट वाटावयाचें. पुरुषाची जात ! कोणत्याच गोष्टीचा कांहीं नियम नाहीं; भलतेंच कांहीं तरी एखादें शेपूट फुटण्याचा संभव. ' जें कांहीं होईल, तें होईल ' असें म्हणून स्वस्थ बसावें, तर प्रकरण विकोपास जाण्याच्या बेतांत ! तर अशा स्थितींत करावें तरी काय ? आपले भावाला यासंबंधानें पत्र लिहावें म्हणजे तो आपले नवऱ्याशीं समवयस्क असल्यामुळें त्याला त्याची कानउघाडणी करतां येईल. ' पण हा विचार शांतेच्या मनांत उगीच क्षणभर मात्र टिकला. कारण ' ही आपले भावाजवळ माझ्या कागाळ्याच करते ' हा ठपका यावयाचा आणि त्यामुळें भलतेंच कांहीं व्हावयाचें असें तिला वाटलें !

अशा प्रकारच्या विचारांत शांता बराच वेळ अगदीं गढून गेली होती. विचारांनीं मन शांत होऊन कांहीं वेळानें ती आरामखुर्चीवरच झोंपी गेली. सुमारें अर्धपाऊणतास ती अशी झोंपेत होती. इतक्यांत गड्यानें " बाईसाब आंज कसली भाजी बाजारांतून आणूं " अशी हाक मारल्यावरून ती जागी झाली. आणि ती लागलीच गडबडीनें उठून किंचित् धावऱ्या आवाजानें गड्यास विचारूं लागली:—" कायरे आलेत का बाहेरून ? "

गडी:—नाहीं बाईसाब, इतक्यामंधीं येतील बाहेरून ! "

या गोष्टीला बरेच दिवस लोटले. एके दिवशीं सकाळीं शांता शेजारच्या एका बाईकडून आपली वेणी घालवीत होती. इतक्यांत शेजारची दुसरी एक बाई " अहो, शांताबाई, काय चाललें आहे " असें म्हणत तेथें आली. तिचे हातांत एक लहानसें तेलाचें भांडें होतें.

गंगूबाई ( त्या बाईचें नांव ):—" कसं काय शांताबाई वेणी चालली आहे काय ? थोडंसं तेल उसनं हवं आहे. द्याल काय ? "

शांता:—होय बसा जरा असमळसें, वेणी संपली म्हणजे देते तेल !

वेणी घालणारी बाई म्हणते:—पण कायहो गंगूबाई, तुमच्या बांगड्या वाढलेल्या का दिसतात ? घरीं कांहीं—

गंगूबाई जरा रागीट मुद्रा करून म्हणतात:—" अहो, दररोजचच आहे. मेलं. रोज मरे त्याला कोण रडे ! मेलं आपला जीव तोडून काम करतें, तरी त्याचें चीज नाहीं तें नाहींच. आणि वरून उठल्याबसल्या मार ठेवलेलाच असतो. आज म्हणे ' मेलं भाजी अळणीच झाली, ' बरं, तिखट थोडं जास्त घातलं

म्हणजे ' शिंचीला तिखट जास्त घालण्याची संवयच आहे. ' असें नेहमी उठल्या-पासून निजेपर्यंत सारखं ' शिंची शिंची ' चाललं असतं. तोंडास खीळ म्हणून नाहींच कधीं मेली.

**सखूबाई**:—पण, कायहो, गंगूबाई, तुमचेकडची नागपुरास बदली व्हावयाची आहे म्हणून ऐकतें. खरी गोष्ट आहे काय ?

**गंगूबाई**:—आणखी पंधरा दिवसांनीं नागपुरास जावं लागेल असं बाई तिकडे म्हणत होते. नागपुरास मेल प्रदर्शन कीं सुदर्शन जें भरणार आहे, त्याचे कामावर बदली झाली आहे. येथच्या साहेबानें तिकडची शिफारस केली कीं ' हे फार हुशार कारकून आहेत म्हणून; ' त्यामुळे तीन महिन्याकरिता कामावर नेमलें आहे.

**शांता**:—कांहीं बढती वगैरे झाली कीं काय ?

**गंगूबाई** ( थोड्या स्मित वदन होऊन ):—होय. घरीं म्हणत होते बाई वीस रुपये बढती झाली म्हणून.

**सखूबाई** ( थट्टेच्या स्वरानें ):—आतां काय विचारता शांताबाई ? गंगूबाईच्या हातांत चांगले ठोकळ ठोकळ गोठ पडलेच म्हणून समजा !

**गंगूबाई** ( एक दीर्घ सुस्कारा सोडून ):—कसचे गोठ नी कसचं काय !

**शांता**:—कां, इतक्या हताश का होता गंगूबाई ?

**गंगूबाई** ( पुन्हा एक सुस्कारा टाकून )—" अहो, गोटबीठ तर राहो, नुसता एक सुखाचा शब्द मिळाला म्हणजे मिळविलें. पण तेंही माझे कपाळीं, नाहीं. काल संध्याकाळीं म्हणूं लागलें, " हें पहा आज मी कांही कामाकरितां म्हणून साहेबाचे बंगल्यावर गेलों होतो. तेथें येथील कांही मोठ्या लोकांच्या बायकांकडून नागपूर येथील प्रदर्शनांत पाठविण्याकरितां कांहीं नकशीं काम आमचे साहेबाकडे आलें आहे, तें मी पाहिलें. तें किती सुरेख होतें म्हणून सांगूं. " मला वाटलें कीं, आज स्वारी खरोखरच आनंदांत आहे. पण, काय सांगूं शांताबाई ! इतक्यांत स्वारी माझेवर उलटली. तेव्हां नाहीं नाहीं तें बोलणं झालं. म्हणे ' बायका असाव्यात तर अशा हुशार असाव्यात; नाहीं तर ही आमचे घरची घोरपड ! धड स्वयंपाक येत नाहीं, धड शिवणें येत नाहीं, धड बोलणें येत नाहीं, ' झालं आतां काय सांगूं बाई ! माझा बाप, आजा, पणजा या सगळ्यांचा एकदम उद्धार झाला. इतर बायकांनीं नकशी चांगली काढली त्याचें उट्टें माझ्यावर ! ! तुम्ही कांहीं म्हणा शांताबाई, पुरुषांना परक्या बायका

कशाही असल्या तरी अप्सरा वाटतात; आणि घरच्या बायका अप्सरा असल्या तरी राक्षसी दिसतात. आतां तुमच्या इकडच्यासंबंधानें मी बोलत नाहीं. त्यांच्यासारखा निर्मल स्वभावाचा मनुष्य विरळा.

यावर शांता कांहींच बोलली नाहीं. पण थोडा वेळ तिचे चेहऱ्यावर चिंतेची किंचित् छाया पसरली; पण ती कोणाचे लक्षांत येण्याजोगी नव्हती. याचें कारण चाणाक्ष वाचकाच्या लक्षात आल्यावांचून राहिलें नसेल. कारण वर सांगितलेल्या माडीवरील संभाषणामध्यें आवडाजीचें नांव येऊन गेलें होतें. व त्यामुळें तिचें मन अलीकडे गणपतरावासंबंधानें शंकित होण्यास बरीच जागा होती हें सांगणें नकोच. या वेळपर्यंत वेणी संपली होती. म्हणून ती गंगूबाईस तेल देण्याकरितां उठली. तेल देता देतां ती गंगूबाईस म्हणाली:—गंगूबाई तें प्रदर्शन केव्हा सुरू होणार आहे हें तुम्हास माहीत आहे काय ?

**गंगूबाई:**—तिकडे म्हणत होते कीं दोन महिन्यांनीं भरणार आहे म्हणून.

या गोष्टीला पंधरा वीस दिवस गेले. गणपतराव रात्रीं किर्लोस्कर मंडळीचें नाटक पहावयास गेले होते. नाटक तीन साडेतीन वाजता संपलें. ते नाटकाहून परत घरीं येत असता सहज त्यांचें लक्ष त्यांच्या घराच्या माडीच्या उघड्या असलेल्या खिडकींत गेलें, तों खिडकींतून आत जळत असलेल्या दिव्याचा स्वच्छ उजेड बाहेर पडला आहे, असें त्यांना दिसलें.

अजूनपर्यंत खोलींत दिवा जळतो आहे याचें त्यांना थोडेंसें आश्चर्य वाटलें. परंतु कदाचित् आपलेकरितां शांतेनें एवढा वेळपर्यंत दिवा जळत ठेवला असेल, असा त्यांनीं तर्क बांधिला. परंतु इतक्यात शांतेची आकृति खिडकींतून दिव्याच्या प्रकाशांत स्वच्छ दिसूं लागली. ' काय शांता आपलेकरिता एवढा वेळपर्यंत जागी देखील राहिली आहे, ' असें त्यांनीं आपले मनाशीं म्हटलें. तें आतां अगदीं आपले घराचे दाराजवळ आले आणि तें जोरानें ठाठावून त्यांनीं आंत हांक मारिली. ' आलें, आलें. असें शांतेनें त्या हांकेस वरून उत्तर दिलें. इतक्यांत त्यांना हळूच माडीवरची कोणती तरी पेटी उघडल्याचा आणि नंतर हळूच बंद झाल्याचा भास झाला; पण तो अगदीं क्षणिक होता. लागलीच शांता खालीं आली आणि दार उघडलें.

गणपतराव वर गेले. पाठीमागून दार पुन्हा बंद करून शांता वर आली. तिची किंचितशी तारांबळ उडाल्यासारखी दिसत होती; पण ती गणपतरावाचे ध्यानांत आली नाहीं.

**गणपतराव**:--" काय माझेकरितां इतका वेळ आपण जागत होतां ? थोडी घाबरून पण लागलीच आपल्याला सांवरून शांता म्हणाली:-" थोडे वेळापूर्वी मी जागी झालें म्हणून उठलें आणि किती वेळ झाला म्हणून घड्याळ पाहिलें इतकेंच." "होय ! पण अशानें आपले सुंदर डोळे बिघडतीलना ?" गणपतराव हांसत हांसत कपडे काढीत म्हणाले, त्यावर " मेले ते इतके कांहीं वाखाणण्याजोगे नाहीत. आहेत कांहीं तरी झालं." असे शांता लाजत म्हणाली.

या गोष्टीस कांहीं दिवस लोटले. बुधवारचा दिवस होता. संध्याकाळीं गणपतराव ऑफिसांतून आले. त्यांच्या भिवया चढल्या होत्या आणि मुद्रा फार चिंताग्रस्त दिसत होती. ऑफिसातून आल्यावर ते शांतेशीं थोडा वेळ बोलत असत आणि नंतर कपडे वगैरे काढण्याकरिता वर जात असत. पण आज ते तसे कांहीं न करतां एकदम तडक वरती गेले आणि कपडे वगैरे काढून, एक पुस्तक वाचित पलंगावर पडले. नित्याप्रमाणें खालून चहा वगैरे देखील मागविण्याचें त्यांना आज भान राहिलें नाहीं. 'आज कांहीं तरी काळेंबेरें आहे.' असें शांतेनें लागलेच ताडलें. 'कांहीं असो; रागें भरले तरी चिंता नाहीं. पण या गोष्टीचा आज पक्का छडा लावावयाचा' असा तिनें निश्चय केला. तिनें लागलाच थोडासा चहा आणि थोडेसे फराळाचें तयार केलें. आणि ते घेऊन ती वर गेली, तों " काय ? फराळाचें आणलें आहेस ! मला आज भूक वगैरे कांहीं नाहीं." गणपतराव थोडेसें ओरडून म्हणाले.

"हें काय बाई ! होतें तरी काय आपणाला. मला सांगायचें नाहीं काय ? आपल्या सुखाची तेवढी वाटेकरीण मी आणि दुःखाची नाहीं काय ?" असें म्हणतांच शांतेच्या नेत्रकमलांत अश्रुबिंदू उभे राहिले.

**गणपतराव** (प्रेम स्वरांत म्हणाले ).—" हे पहा. अशी इकडे ये. आजपर्यंत मी आपले मनास थोपवून धरिलें. परंतु आज तुला सगळें सांगण्याचा मी निश्चयच केला आहे. इतके दिवस तुला ह्यांपैकीं कांहींच कळविलें नाहीं, ही माझी मोठी चूक झाली असें मला वाटतें. बायका पुरुषांपेक्षां व्यवहारज्ञानात जास्त हुशार असतात असें म्हणतात आणि मलाही तसेंच वाटतें. तुझी सल्ला अगोदरच घेतली असती तर ती मला फार फायदेशीर झाली असती. पण आतां त्याचा काय उपयोग. जें झालें तें झालें. तें कांहीं आतां परत येत नाहीं.

" आता थोडक्यात सांगावयाचें म्हणजे माझ्या मित्र म्हणविणाऱ्यांनीं मला

ागलें तीन चारशें रुपयांस फशीं पाडलें आहे. ह्या माधवरावानें तीन वर्षांपूर्वी केशवरावाचा मालक रतनशेट मारवाडी याजकडून शंभर रुपये कर्जाऊ काढले आणि मला म्हणूं लागला कीं, ' हें पहा, गणपतराव, तो बेटा रतनशेट मला कोणाची तरी जमानत मागतो आहे. तर, तुम्ही टाकाल काय आपली जमानत ? कांहीं भीति बाळगावयाची गरज नाहीं. आता चार पांच महिन्यात फैसला करून टाकतों. कांहीं जरूर नव्हती जमानतीची. पण तो बेटा रतनशेट ऐकतच नाहीं. ही मारवाडी लोकांची जात म्हणजे निवळ सैतान असते सैतान ! ' मी मूर्ख. त्याचें म्हणणें कबूल केलें झालें. शंभराचे व्याज वगैरे धरून तीनशें रुपये आजपर्यंत झाले, माधवरावांनी आता खावा वर केल्या आहेत. त्याचें घर तर त्याचे चुलत्याचेंच आहे आणि नौकरीही कांहीं सरकारी नाहीं. झालें, त्या मारवाड्यास मी चांगला सापडलों. त्याचा माझे पाठीमागें सारखा तगादा चालू आहे. आज तर तो माझे आफिसात येऊन मला रुपयेच मागूं लागला. साहेबाचे कानावर गोष्ट जावयाची; पण टळलें. मला त्याचा फार संताप आला. पण करावयाचें काय ? एक दोन दिवसात तो फिर्याद देखील करणार आहे. त्या लुच्चा आणि हरामखोर माधवरावानें दोन महिन्यापासूनच आपलें घरीं येणें टाकिलें आहे. मला पक्कें कळून चुकलें आहे कीं, त्याच्या मनात मारवाड्यास एक छदाम देखील द्यावयाचा नाहीं. शिवाय त्या हरामखोरानें चार दिवसाच्या करारानें माझेपासून पन्नास रुपये उसने घेतले त्याला एक वर्ष झालें. तरी त्यांचा अजून ठिकाण नाहीं. ' आज देतो, उद्या देतो, परवा देतो ' असें चाललें आहे, आता पुढे कसें काय करावें ह्या विचारात मी पडलों आहे. मला तर कांहीं सुचत नाहीं. तुला कांहीं युक्ति सुचते काय ? "

या प्रश्नानें शांता थोडा वेळ विचारात गढल्यासारखी दिसली. नंतर ती एकाएकीं म्हणाली:—होय, मला एक युक्ति सुचते आहे. मला बाळंतपणाकरितां माहेरीं पाठविण्याचा आपला विचार झालाच आहे. बाळंतपणाला अजून अवधि आहे; तरी पण तुम्ही आताच मला माहेरी पाठवून द्या. तेथें गेल्यावर ही सगळी हकीकत मी भाऊला कळविते. तो चांगला खटपटी आहे आणि गांवांत त्याची पतही चांगली आहे. तर तो कोठूनही थोडे व्याजानें तीनशें रुपयांची रक्कम कर्जाऊ काढून देईल. ती रक्कम मी येथें पाठवितें. म्हणजे तुम्ही रतनशेटाचे रुपये देऊन टाका. तुम्ही सरकारी नौकर आहां. तुम्हांला ही कर्जाची व्याद असणें चांगलें नाहीं. एखादें साहेबाचे कानावर गेले तर भलतेंच व्हावयाचें.

आतां तुम्ही येथें एकटेच रहाल तर गड्याला वगैरे रजा द्या. आणि पंधरा रुपये आपले खर्चाकरितां ठेवून बाकीचा पगार दर महिन्यास भाऊकडे पाठवीत जा. अशा रीतीनें सगळे रुपये फिटून जातील. आपल्याला पसंत आहे काय ही युक्ति ?

**गणपतराव** (थोडेसें आनंदांत होऊन म्हणतात):—युक्ति काय पण युक्ति आहे! आम्ही पुरुष बायकांना अगदीं मद्द आणि मूर्ख समजत असतो. पण तुम्ही आमचे पेक्षा सवाई हुशार असतां यांत कांहीं संशय नाहीं. किंवा असें तर नसेल. तूं एकदा सांगत होतीस कीं, तुझा पणजा भोसलेशाहींत एका मोठ्या हुद्यावर नौकर होता. त्याचें डोकें तर त्याच्या पणतींत उतरलें नाहीं. मला असेंच दिसतें" यावर शांता हंसत म्हणाली, "हरभऱ्याचे झाडावर कोणाला कसें चढवावें हें किनई पुरुषांना चांगलें अवगत असतें. मग करायचं ना याप्रमाणें."

**गणपतराव**:—अग, तुझी ही व्यर्थ स्तुति नाहीं. ही खरीच गोष्ट आहे. करायचें म्हणजे ! अगदीं ठरलेंच ! आतां परवा शनिवार आहे, रात्रीचे गाडीनें तुला सोनपुरास पोंचतें करतो म्हणजे झालें.

**शांता**:—ठीक आहे ! तर मीही आतांपासून थोडीशी सामानाच्या बांधाबांधीला सुरवात्त करितें ! पण हां, चहा देखील निवत आला आहे बोलण्याचे भरांत. घ्या हा चहा आणि फराळाचें. मी अंमळ खालीं जातें. दिव्याची तजवीज केली पाहिजे, अंधार पडला" असें म्हणत शांता खालीं उतरली.

ठरल्याप्रमाणें गणपतरावांनीं शांतेला शनिवारीं सोनापुरास पोंचतें केलें. पंधरा दिवसांनीं शंकररावाकडून ( शांतेच्या भावाचें नांव ) तीनशें रुपयांची मनीऑर्डर आली. लागलीच गणपतरावांनीं मारवाड्याची रक्कम पटवून दिली. आणि पुनः त्या फंदांत पडायचें नाहीं, म्हणून कानास खडा लाविला.

नागपूरच्या प्रदर्शनानिमित्त सगळ्या ऑफिस-कचेऱ्यांना चार दिवसांची सुटी मिळाली होती, म्हणून गणपतराव नागपूरचें प्रदर्शन पाहावयास गेले सगळ्यात स्त्रियांच्या कामाचा भाग फार प्रेक्षणीय होता. तेथें एक युरोपिअन बाई व्यवस्थापक म्हणून नेमली होती. गणपतराव मोठ्या उत्सुकतेनें एक एक वस्तू लक्ष लावून पाहूं लागले. पहातां पहातां, ती युरोपिअन बाई म्हणाली:—" हें पहा, पहिलें बक्षीस ज्या कामाला मिळालें आहे तें हें काम. हें काम ज्या बाईनें पाठविलें तेला साडेतीनशें रुपये किंमतीचें सोन्याचें पदक देण्याचें कमेटीनें ठरविलें आहे. शिवाय येथील एका श्रीमान् सद्गृहस्थांनीं ह्या प्रदर्शनांत स्त्रियांचे कामांत जींचें

काम उत्तम ठरेल तिला ३०० रुपये रोख बक्षीस देण्याचें ठरविलें आहे, तीही रक्कम या बाईनाच मिळेल. हें काम फारच प्रेक्षणीय वाटलें आहे."

गणपतराव लक्षपूर्वक तें नकशी काम पाहूं लागले. खरोखरच तें काम फारच अप्रतिम होतें. नांव ठेवण्यास म्हणून कांहीं जागाच नव्हती. पहाता पहाता त्यावर लावलेल्या चिठ्ठीकडे त्यांचें लक्ष गेलें, तों, तिच्यावर गांवाचें नांव 'सारंपूर' हें होतें. तें पाहून गणपतरावांना थोडासा अभिमान वाटला आणि त्यांनीं थोडेस गर्वानें त्या बाईला सांगितलें कीं, 'मी देखील सारंगपूरचा राहणारा आहे; पण ही बाई कोण असावी बरें? हिचें तर नांव मुळींच दिसत नाहीं?' ती बाई म्हणाली 'हें काम रा० ब० आनंदराव डिस्ट्रिक्ट जज्ज नागपूर यांजकडून आमचेकडे आलें आहे.' त्यांनीं आम्हास कळविलें आहे कीं, 'काम पाठविणाऱ्या बाईची आपलें नाव कळविण्याची इच्छा नाहीं. तिला जर एखादें बक्षीस मिळालें तर तें माझेकडे पाठवावें म्हणजे तें मी तिला पोचतें करीन.' यापेक्षा जास्त आम्हांला त्या बाईची कांहीं माहिती नाहीं.

**गणपतराव** (थोडे चकित होऊन):—"काय! आनंदराव कुमठे यांजकडून हें सामान आलें आहे!

**युरोपिअन बाई**:—होय! त्यांजकडूनच हें सामान आलें आहे.

गणपतराव चकित होण्याचें कारण कीं, आनंदराव कुमठे हे शांतेचे सख्खे मामा होते. सारंगपूर येथें आनंदरावांचे ओळखीची कोण बाई असावी, याचा त्यांना कांहींच तर्क होईना. त्यांच्या कोणा मित्राचे बायकोकडून हें काम आलें असेल, असें त्यांनीं शेवटीं ठरविलें.

डिसेंबरचा महिना. कधीं सुट्टी सुरु होते आणि आपण सोनपुरास आपल्या प्रिय पत्नीच्या आणि आपल्या नूतन बालकाच्या कधीं भेटीस जातों असें, गणपतरावांना होऊन गेलें. एक एक दिवस एक एक वर्षाप्रमाणें जाऊं लागला. अखेर एकदाची सुट्टी झाली. गणपतराव सोनपुरास जाण्याकरिता रेलगाडींत बसले. गाडी केव्हा मुक्कामास जाऊन पोहोंचते असें त्यांना होऊन गेलें. देवदूताप्रमाणें आपल्यास पंख असते तर किती उत्तम झालें असतें, असेंही त्यांना वाटूं लागलें. गाडी जसजशी मुक्कामाजवळ येत चालली तसतशी त्यांची उत्कंठा जास्त जास्त वाढत गेली. एकदांचे मुक्काम आलें. लागलीच तांगा वगैरे ठरवून गणपतराव घरीं निघाले तों शंकरराव आपले घराचे दारांत त्यांची मार्गप्रतीक्षा करीत उभे होतेच. शंकरराव हर्षयुक्त स्वरानें म्हणतात:—"या गणपतराव, गडी तुमचें सामान वगैरे आंत आणील. दिवाणखान्यांत कपडे वगैरे उतरून ठेवा. आई,

जांवईबुवा आले! सोन्या कुठें आहे. मोठा खेळकर झाला आहे. गणपतराव, तुमचा सोन्या हांसतो काय, हातपाय काय हालवितो? त्याचा मुका वगैरे कोणी घेतला म्हणजे मग काय विचारतां? असा कांहीं चिडतो आणि ओरबडे घेतो, कीं कांहीं विचारूं नका. पण हें बघा, आमची शांता मुके घेऊं लागली म्हणजे पटापट मोठ्या खुशीनें मुके देतो, असा तो सोदा आहे. आई, शाने, काय करतोय तो सोन्या? त्याला आणा इकडे." इतक्यात राधाबाई (शंकररावाची पत्नी) सोन्याला घेऊन बाहेर आल्या.

**राधाबाई:**—घ्या गणपतराव. घ्या आपल्या सोन्याला. अगदीं आईसारखा आहे हुबेहुब! पण मोठा वस्ताद आहे, हो! तुमचे जवळ यावयाचाच नाहीं. घरच्या सर्व माणसांना किनई अगदीं ओळखतो.

इतक्यात शंकरराव सोन्याला आपले कडेवर घेऊन म्हणतातः—गणपतराव, सोन्याला जपून हात लावा बरं. हा मोठा थोरला मेड्यालिस्ट झाला आहे मेड्यालिस्ट!

गणपतराव अगदीं आश्चर्यचकित होऊन गेले. त्यांना ह्याचा कांहींच अर्थ समजेना. ते म्हणतातः—शंकरराव. तुमचे बोलण्याचा कांहींच अर्थ आपल्याला समजत नाहीं बुवा!

**शंकररावः**—वा! वा! गणपतराव तुमचाच सोन्या! आणि तो कसा मेड्यालिस्ट झाला, हें तुम्हालाच माहित नाहीं, तर आम्हास तरी कसें माहित असणार? हा सोन्याच तुम्हांला सांगेल सर्व. जा रे सोन्या आपल्या बाबाजवळ जा आणि त्यांना सांग कीं तूं कसा थोरला मेड्यालिस्ट झालास! गणपतरावांनीं आश्चर्ययुक्त मुद्रेनें सोन्याला आपले कडेवर घेतले. तों सहज पहातां पहातां त्यांची नजर सोन्याचे गळ्याकडे गेली. मग काय विचारतां! गणपतरावांच्या अंतःकरणांत एकदम चक्क प्रकाश पडला! सर्व गोष्टी एकदम जुळल्या. शांताबाईनीं आपले भावामार्फत कर्ज काढलेली ३०० रुपयांचे रकमेचीही आपले बक्षिसांतून फेड केली ही गोष्टही गणपतराव यांना पुढें हळुहळू समजली. प्रदर्शनांत प्रसिद्धीस आलेली सारंगपूरची बाई कोण, याबद्दल आतां त्यांना संशयच उरला नाहीं.

इतक्यांत शांतेनें ओटीवरून गणपतरावाकडे डोकावून पाहिलें. दोघांची दृष्टि एक झाली. त्या वेळेस उभयतांच्या चेहऱ्यांवर जे अनेक प्रकारचे विकारतरंग उमटले होते, त्यांचें वर्णन करण्यास आमची गरीब लेखणी असमर्थ आहे!

---

# प्रतिज्ञा कीं प्रेम ?



( लेखिका—सौ० ताराबाई तर्खड. )



सायंकाळची वेळ. दिवसाच्या तापानें त्रस्त झालेला भगवान् सहस्ररश्मि आतां अस्तास जाण्याच्या विचारांत होता. शेतकरी लोक आपआपल्या गुरांना घराकडे वळवीत होते. उदयपूरच्या राजरस्त्यावर मात्र यावेळीं फारच गडबड होती. यावेळीं सरदार हुसेनअली नावाचा सुभा उदयपुरीं होता. याचा स्वभाव फारच जुलमी, खुनशी व घातकी होता.

उदयपुराजवळच असलेल्या डोंगराच्या पायथ्याशीं एका किर्र झाडींत एक झोपडी दिसत होती. झोपडीच्या आंगणांत थोडींबहुत फुलझाडें व्यवस्थेनें लावलेलीं होतीं. पण त्यांपैकीं बहुतेक बरेच दिवस पाणी न मिळाल्यानें सुकलेलीं दिसत होतीं. त्याचप्रमाणें बरेच दिवस न झाडल्यानें त्याच्याखालीं पुष्कळ केरही साचला होता. अंगणाच्या आतल्या बाजूला एक लहानशी पडवी असून तिच्या पलीकडे एक मधलें घर होतें. या मधल्या घरात कुडाजवळ असलेल्या खाटेवर एक रुग्णावस्थीं वृद्ध पडला होता. वृद्धाच्या पायथ्याशीं एक मनोहर बालिका बसली होती. खाटेखालीं एक पिकदाणी असून खोलीच्या एका कोपऱ्यांत एक चूल व जवळच थाळी, पातेली व दुसरा थोडासा स्वयंपाकाचा सरंजाम होता. वृद्धाच्या डोक्याच्या बाजूशी एक तलवार, बंदूक, बिचवा, पिस्तूल वगैरें हत्यारें टांगलेलीं होतीं. असो.

खाटेवर पडलेल्या वृद्धाचा चेहरा अत्यंत काळवंडलेला दिसत होता, तरी तो एक वेळ तेजस्वी असावा खास. त्याचे डोळे अत्यंत खोल गेले होते, चेहऱ्यावर सुरकुत्या पडलेल्या होत्या. जणूं मृत्यूनें आपला पाश त्यावर टाकला होता. त्याच्याजवळ बसलेल्या बालिकेचा चेहरा अत्यंत मनोहर होता, पण त्यांत एक प्रकारच्या करारी तेजस्वीपणाची झांक मारित होती. तिचे पाणीदार नेत्र रडण्यानें व जागरणानें निस्तेज झालेले दिसत होते, तिचे गुलाबी गाल अश्रूंनीं मलिन होऊन गेले होते. तिच्या सुंदर केसांच्या जटा दबून गेल्या असून बपडे

फाटून गेले होते. " विमल " तो वृद्ध अत्यंत क्षीण स्वरानें म्हणाला, " ..लनें ( हें त्या बालेचें नांव ) आपला कान अगदीं त्याच्या तोंडाशीं नेला. ' मला थोडें पाणी दे " तो पुढें म्हणाला. सुहास्यवदन विमलनें जवळच्या झारींतलें थोडें पाणी पळीनें त्याच्या तोंडांत घातलें. " विमळ बाळे " तो वृद्ध जरा आतां तकवा येऊन म्हणाला.

" बाबा आतां तुम्ही विनाकारण श्रम करूं नका; नाहीं तर पुन्हा दुखणें उलटेल " विमलनें मंजूळ स्वरानें विनंति केली.

" बाळ, आतां कसलें दुखणें आणि कसले काय घेऊन बसलीस. " वृद्धाचा कंठ भरून आला. " बाळ विमल, माझी आतां शेवटची वेळ आली आहे. " हतभागिनी विमलच्या मस्तकावर आघात झाला.

" बाबा नका हो असें बोलूं " विमलेच्यानें आतां रडें सांवरेना.

" हं विमल, आतां रडूं नकोस मी काय सांगतों तें ऐक व मला वचन दे. "

" सांगा बाबा, ही मी तयार आहें तुमच्या आज्ञेशिवाय मला काय जास्त आहे. "

" ऐक तर विजापुराच्या उत्तरेस असलेल्या हरिपूर गांवीं रणजितसिंह ठाकोर नांवाचे रजपूत सरदार होते. यांना दयाळसिंह नांवाचा मुलगा होता. रणजितसिंहासारखा एकहीं सरदार त्यावेळीं विजापूरच्या आसपास नव्हता. आजला जरी हरिपूर अगदीं नामशेष होऊन गेलें असेल, पण त्यावेळीं हरिपूरचें नांव ऐकून एकही सरदार मान डोलाविल्याखेरीज राहिला नसेल. सरदार दयाळसिंहाचा स्वभावही अगदीं बापाप्रमाणें होता. तीव्रता, तेजस्विता, व करारीपणा हे रणजितसिंहाचे गुण दयाळसिंहामध्यें तंतोतंत उतरले होते. शिवाय दयाळसिंहाच्या अंगीं एक विलक्षण सद्‌गुण होता तो दया हा होय. या [illegible] रेकामुळें कधीं कधीं त्यांचे इतर गुण लोपून जात. हाय ! [illegible] भोवली. विमल–लाडके पोरी, याच दयाळसिंहाचे पोटी ह[illegible] जन्म झाला. माझा जन्म झाला त्यावेळीं माझ्या आजाला, वडिला[illegible] सर्व हरिपूर-वासी जनांना केवढा आनंद झाला. पण हाय ! माझा शेवट अशा स्थितींत होईल अशी त्यावेळीं त्यांना कल्पना तरी आली असेल काय ! " बोलण्याच्या श्रमानें त्या वृद्धाला मूर्च्छना आली. विमलच्या नेत्रांतून पुन्हां अश्रुधारा स्रवूं लागल्या. तिनें त्याच्या तोंडांत पुन्हा पाणी घातलें. थोड्या वेळानें शुद्धीवर येऊन वृद्ध पुन्हा बोलूं लागला. " माझ्या जन्मानंतर थोड्याच वर्षांनीं आजोबा वारले,

पण माझ्या वडिलांनी माझ्या शिक्षणाची कधी अनास्था केली नाहीं. रजपूत कुमाराला योग्य तें धर्म व क्षात्र शिक्षण त्यांनी मला दिलें. क्षात्र शिक्षणांत माझी पारंगतता पाहून माझ्या वडिलांना फार हर्ष होई. यावेळीं हुसेन नांवाचा एक मुसलमानाचा मुलगा माझ्याबरोबरच शिकत होता. हा मुसलमानाचा, त्यांतूनही आमच्या कट्या शत्रूचा, मुलगा असूनही त्याला कोणी पालक नाहीं हें पाहून माझ्या वडिलांच्या दयेला पाझर फुटला व त्यांनी त्याला घरीं आणून ठेवलें. याच अधमाधम काळसर्पानें आमच्या वंशवृक्षास दंश केला. " संतापानें वृद्धाचा चेहरा लाल झाला; त्याच्या नेत्रांतून जणुं अग्नि पडूं लागला. " माझ्या वयाच्या विसाव्या वर्षी माझा विवाह झाला. " तो जरा शांत होऊन पुढें म्हणाला:—" माझी पत्नी–विमल अहा ! तुझी ती सद्गुणी माता आतां कोठें असेल ! "

" काय ? माझी आई अद्याप जिवंत आहे ? " विमलनें आश्चर्यानें विचारिलें.

" होय बाळे, पण आतां काय फायदा ? " तो वृद्ध थोडा वेळ सचिंत बसला. " विमल, आतां माझी वेळ भरत आली आहे. आतां मी सांगतों तें नीट ऐक व त्या माझ्या व तुझ्या परम साध्वी मातेच्या अपमानाबद्दल त्या चांडाळाचा सूड घे. आज माझा बाळ प्रताप असता तर तुला केवढी मदत झाली असती, पण काय करूं ! इलाज नाहीं. असो. विमल, आमच्या विवाहानंतर थोड्याच दिवसांनीं आम्हांला एक पुत्ररत्न झालें. अहा ! तें मनोहर बालक पाहून त्याच्या मातेला व सरदार दयाळसिंहाला केवढा आनंद झाला. पण हाय ! तें लाधण्याचें आमच्या नशिबीं नव्हतें. तें बालक सुमारें एक वर्षाचें झालें असेल. एके दिवशीं रात्रीं आम्ही निजलों होतों, सुमारें मध्यरात्र झाली असेल. एका हृत्कंपायमान करणाऱ्या कर्णकठोर किंकाळीनें मी जागृत झालों. हाय ! काय ती भयंकर रात्र ! ती रात्र पाहण्यापेक्षां माझे नेत्र फुटले असते तर बरें होतें. असो. मी जागृत होऊन पहातों, तर तुझी आई नाहीं, कदाचित् बाहेर गेली असेल या समजुतीनें मी मुलाकडे पाहिलें, तो काय भयंकर देखावा. त्याची आंतडीं बाहेर आलीं असून डोक्याच्या चिंधड्या झाल्या होत्या. विमल, त्यावेळीं मला काय वाटलें असेल याची तूच कल्पना कर. मी उठलों व बाहेर जाऊं लागलों तो पायाशीं कायसें लागलें. खालीं वांकून पाहातों तो सरदार दयाळसिंग ! माझे पूज्य वडील. त्यांचें सर्वांग रक्तानें माखलें गेलें होतें, शरि-

रांत किंचित् धुगधुगी होती. थोडेंसे पाणी पाजल्यावर व डोक्यावर शिंपडल्यावर ते जरा सावध झालेसे दिसले. त्याचे ओंठ किंचित् हलूं लागले. मी जवळ कान नेला. 'हु-से-न' येवढेच शब्द बोलून त्यांनीं डोळे मिटले. माझे लाडके विमले, तूंच सांग मीं त्यावेळीं काय केलें असेल. माझें मस्तक संतापानें भणाणलें, शरीर थरथरूं लागलें व माझ्या परमपूज्य पित्याचा खून, लहान बालकाचा भयंकर खून व पत्नीचें नाहींसें होणें वगैरे गोष्टींनीं मी वेडा झालों. वाड्यांत त्यावेळीं मज-खेरीज कोणी बातमी सांगण्यासही जिवंत नव्हता. माझ्या पत्नीच्या दासींचीं, माझ्या हुजऱ्या वगैरे माणसांचीं ठिकठिकाणीं प्रेतें पडलीं होतीं. आमच्या घरच्या या भयंकर कत्तलीची हकीकत समजल्यावर गांवांत मोठा हाहाकार झाला. प्रेतांची व्यवस्था लावून दुसरेच दिवशीं अंगाला राख फासून एक झोळी घेऊन मीं त्या भयानक घराला रामराम ठोकला. घरांतून बाहेर पडण्यांत माझा मुख्य उद्देश माझ्या पत्नीचा शोध करणें हा होता. पण तिचा पत्ता मला कसा कळावा? मी थेट विजापूरच्या बाजूनें निघालों. विजापूरचा सुल्तान फार दयाळू होता. ( शिवाजीचा जोर त्यावेळीं येवढा नव्हता. ) माझी स्थिति कळल्यावर त्यानें खून करणारांच्या शोधार्थ चोहोंकडे सांडणीस्वार पाठविले. विजापुरीं एक दिवस राहिल्यावर मी पुढें निघालों. सुमारें आठ दिवसांनीं मीं पंढरपुरास पोंचलों. एके दिवशीं संध्याकाळीं मीं श्रीविठ्ठलाचें दर्शन घेऊन परत येत असता रस्त्यांत एक भिकारीण कण्हत पडलेली पाहिली. गरीब बिचारी भुकेनें व्याकूळ झाली असेल असें समजून मी जवळ जाऊन पहातों तों काय आश्चर्य! ती माझी पत्नी-विमल, तुझी माता होती. श्रमानें व भुकेनें तिचे प्राण कासावीस झाले होते, धुळीनें सर्वांग भरलें होतें. मीं धांवत जाऊन थोडें चंद्रभागेचें पाणी आणलें व तें तिला पाजलें त्यामुळें तिला पुष्कळ बरें वाटलें. नंतर मी तिला उठतबसत तशीच बिऱ्हाडीं ( धर्मशाळेंत ) आणली. घरीं आल्यावर स्वयंपाक वगैरे करून जेवल्यावर तिला पुष्कळच बरें वाटलें. नंतर तिनें मला आपली हकीकत सांगितली. पण त्यांत विशेष कांहीं नव्हतें. मात्र त्यामुळें मला अधमाधम हुसेननेंच तिला पळवून नेलें व तिजवर जुलूम करण्याचा त्याचा बेत होता, पण त्याचा डोळा चुकवून ही निसटली, वगैरे गोष्टी कळल्या. मीं त्या चांडाळाचा सूड उगविण्याचा निश्चय केला. सर्व गोष्टी झाल्यावर तिनें मला आपल्या बालकाविषयीं, मामंजीविषयीं व माझ्याविषयीं प्रश्न केला. मी तिला काय जबाब देणार? असो. याप्रमाणें भिक्षा मागत व तीर्थयात्रा करीत आम्हीं १० वर्षें घालविलीं. १०

उदयपूरच्या राजवाड्यासमोर एक बाल संन्यासिनी आपल्या गायनालापानें जन-चित्त आकर्षण करीत होती. गाणारणीचा कंठ व तिचे मनोहर आलाप खरोखरच आल्हाददायक होते. संन्यासिनीचें वय सुमारें पंधरासोळा वर्षांचें असावें. तिच्या गौर कांतीला ती भगवी कफनी फारच खुलून दिसत होती. तिचे वाऱ्यानें इतस्ततः उडणारे भ्रमरवर्ण कुरळ केस त्या प्रफुल्ल मुखचंद्राला अधिकच शोभा आणीत होते. वाचकहो ! त्या काळीं असलीं बाल संन्यासिनी रस्त्यांत एकटी फिरणें किती धोक्याचें तुम्हांला वाटत असेल. पण आमच्या संन्यासिनीचा चेहेराच असा होता कीं तो पाहिल्याबरोबर कितीही वाईट मनुष्य असला तरी त्याची तिजबद्दल पूज्य बुद्धीच व्हावी.

**नहीं भुलूंगी मैं कभी नाम तेरा ॥**
**कभी नाम तेरा, कभी वचन तेरा ॥**

संन्यासिनी गाऊं लागली. या गायनांत काहीं जादु असल्यास नकळे. पण तें गाना गातां तिची चित्तवृत्ति अगदीं बेभान झाली. डोळ्यांतील अश्रूंने वीणा भिजून जाऊन भेसूर आवाज निघूं लागला, तरी पण सन्यासिनीची तंद्री गाण्याकडेच लागली होती. अखेरीस राजवाड्यांतून आलेल्या नोकरानें " बेगम-साहेब तुला बोलवताहेत " असें सांगून तिला जागृत केली. संन्यासिनीच्या मधुर गीतानें तल्लीन झालेल्या हुसेनच्या कन्येनेंच—सुलताना बेगमेनें—तिला बोलवणें पाठविलें होतें. वाचकहो ! तुम्ही या संन्यासिनीला ओळखिता काय ? ही आपली पूर्वपरिचित विमला. जयसिंहाच्या मृत्यूनंतर शत्रूचा सूड कशा रितीनें उगवावा हें विमलेला सुचेना. अखेरीस ती संन्यासिनीवेषांत भटकूं लागली. तिच्या गायननैपुण्यानें तिच्या या वेषास फार मदत केली होती व तिचा चरितार्थही यावर चाले. असो.

वेळ जवळ आली ! विमला त्या नोकरामागें चालती झाली. राजमंदिरात गेल्यावर तिनें बेगमेला लवून कुर्निसात केला. बेगम एका उच्च पर्यंकावर बसली होती. तिचा चेहेरा जरी स्वाभाविक सुंदर नव्हता तरी कृत्रिम उपायांनीं तो बराच मोहक बनविला होता. गुलाबी रंगाच्या एका तलम भरलेल्या झगझगीत ओढणीनें बेगमेचा गौर देह सुशोभित केला होता. बेगमेच्या जवळच एका उच्चासनावर एक तरुण युवक बसला होता. विमला त्याला पहातांच एकदम दचकली. त्याची ती मोहक मुद्रा, तें सुंदर शरीर, ते पाणीदार डोळे, सहजासहजीं

एखाद्याच्या नजरेंत भरण्यासारखे होतें. मग विमला त्याला पहातांच दचकली, यांत आश्चर्य नाहीं. त्याचा तो प्रशस्त भालप्रदेश त्याच्या बुद्धिवैभवाची, त्याचप्रमाणें त्याचें तें भव्य वक्षस्थल व सरल बाहु त्याच्या वीरत्वाची पूर्ण साक्ष पटवीत होते.

" हाच तर माझा शत्रू नाहींना ! अरेरे, हाच जर असला तर या सुंदर शरिराचा नाश माझ्या हातून कसा होईल ! " विमलेचा प्राण कासावीस होऊं लागला. त्या युवकाची दृष्टिही तिच्या मनोहर चेहऱ्यावर खिळली होती.

" नाहीं, नाहीं, या चांडाळाचा सूड घेतलाच पाहिजे. बाबा, बाबा, मघांच्या विचाराबद्दल मला क्षमा करा. विमलनें आपले ओठ किंचित् चावले.

" जोगीजी, आम्हांला एक चीज तर ऐकवा, " बेगमेनें आज्ञा केली.

" खरोखर आपला आवाज अगदीं स्वर्गीय आहे " तो युवक म्हणाला. स्मितवदनानें विमलनें पुन्हा कुर्निसात करून गाण्यास आरंभ केला. त्या अप्सरातुल्य गायनानें श्रवण करणाराची चित्तवृत्ति अगदीं तटस्थ होऊन गेली. गायन संपल्यावर शाहाजादीनें तिला हमेष आपल्या जवळ राहण्याविषयीं विनंती केली. विमलला तरी तेंच पाहिजे होतें. तिनें त्या विनंतीचा अव्हेर केला नाहीं.

× × × × ×

निशाकालीन संध्यासमयीं भगवान् रजनीपति आपल्या ज्योत्स्नेनें वसुंधरेस न्हाणीत होता. रजनीनाथाच्या आगमनानें प्रफुल्ल झालेल्या वसुंधरेनें आज शुभ्र वस्त्रें परिधान केलीं होतीं. उदयपूरच्या राजवाड्याभोंवतीं असलेल्या बागेंत निशिगंध, जाई, जुई, चमेलीप्रभृति पुष्पांचा मधुर सुगंध इतस्ततः भरून राहिला होता. अशा वेळीं सौंदर्यवती विमला ही आपला केशभार पाठीवर मोकळा सोडून आसमंत भागांतलें सौंदर्य निरीक्षण करीत गच्चीवर उभी होती. तिनें आपल्या नाजुक हातावर आपलें मुख टेकलें होतें. तेणेंकरून जणूं एका सुकुमार कमलांवर एक तेजस्वी कमल ठेवल्याचा भास होत होता. विमल जरी शांतपणानें सृष्टिसौंदर्य पहात होती तरी तिचें हृदय शांत नव्हतें खास. " हा भगवान् रजनीपति " ती आपल्याशीं बोलूं लागली, " हें सुंदर सृष्टिसौंदर्य, हा रम्य देखावा, पण मला कोठें शांति आहे. सूड—भयंकर सूड. जोंपर्यंत माझ्या हृदयांतील सुडाची प्रज्वलित ज्वाला तृप्त होणार नाहीं, जोंपर्यंत त्या चांडाळाचा नायनाट होणार नाहीं तोंपर्यंत मला कधींच शांति मिळणार नाहीं. पण तो सुंदर चेहरा मला किती मोह पाडतो, त्या प्रेमपूर्ण नेत्रांत कांहीं तरी जादु असावी



" जोगीजी, आम्हांला एक चीज तर ऐकवा "
बेगमेनें आज्ञा केली.

खास ! रजपुतांच्या राजोद्यानांतसुद्धां सहजासहजीं न फुलणारें सौंदर्यपुष्प या कुटील म्लेंच्छ रानांत कां उगवलें ! पण नाहीं, वर अमृतानें पूर्ण भरलेला कुंभ आंत विषमयसुद्धां असूं शकतो ! वरून सुंदर सुवर्णवर्ण धारण करणारे सर्प, दंशानें प्राण हरण करतात. तद्वतच या चांडाळाची स्थिति. तो माझा कोण, मी त्याबद्दल काय विचार करावा. माझी माता, माझी प्रिय माता याच चांडाळाच्या बापानें किती आर्जवें, किती विनवण्या केल्या तरी वश झाली नाहीं आणि मी-मी फक्त या नराधमाच्या स्मितहास्यानें त्याजवर मोहित होऊं लागलें. धिक्कार, धिक्कार असो मला. बाबा, तुम्ही स्वर्गांत माझा तिरस्कार करीत असाल. हे तारकांनो, हे वन देवतांनो तुम्ही मला हंसत असाल, हंसा. माझा तिरस्कार करा, माझ्या तोंडावर थुंकाही. मी हतभागिनी त्याला पात्रच आहे. रजपुतकुमारीच्या माझ्या मनांत अयोग्य विचार आल्याबद्दल तुम्ही माझी अवहेलना करा. विमलचे नेत्र अश्रूनें भरून त्यांतून अविरल अश्रुपात होऊं लागला.

"तुम्ही कां बरें दुःख करितां" विमलच्या स्कंधावर कोणी तरी ममतेने हात ठेवला. तिनें दचकून वळून पाहिलें..हा वेळ पावेतों तिच्या दुःखास कारण होणारी व्यक्तिच तिच्या समोर उभी होती. ती व्यक्ति पुन्हा म्हणाली "जोगीजी, आपण कां बरें दुःख करितां ? आपलें दुःख जर माझ्या हांतून थोडें तरी कमी होण्यासारखें असेल तर मी तें आनंदानें करीन."

"नाहीं, मी कोठें दुःख करितें ?" विमलनें बळेंच स्मितहास्य करून महंमदाचा हात ( कारण ती व्यक्ति महंमदच होती. ) दूर लोटला. "आताच जर या चांडाळाला झिडकारून टाकीन तर माझ्या बेताला अडथळा येईल. तेव्हां त्यांच्याच संधानानें घ्यावें हें बरें." ती मनांत म्हणाली. "पण युवराज आपण कोठें ?"

"नाहीं, मी तुम्हाला शोधण्याकरितांच इकडे आलों. पण आधीं मला सांगा, तुम्ही दुःख कां करीत होतां. हें सुंदर शरीर दुःख करण्यास योग्य नाहीं."

"एकूण शरिराच्या सुंदरतेवरूनच तुम्हांला मजबद्दल वाईट वाटतें तर ?"

"नाहीं बरें, सुंदरी नाहीं, ज्यावेळीं तुला प्रथम पाहिली त्या वेळेपासूनच माझी तुजबद्दल पवित्रप्रेमबुद्धी झाली आहे. आणि या जगांत जर मी कोणावर प्रेम करीत असेन तर तें तुझ्यावरच."

"चांडाळ पुन्हा मला मोह पाडूं लागला. देवा या निष्कपट दिसणाऱ्या मुखांतून निघालेलें भाषण असत्य असेल काय ? नाहीं. विमल मागे फीर. हा तुझा मार्ग नव्हे. ह्या काळसर्पाची वरून अमृतमय दिसणारी वाणी आंतून विषानें भरला आहे." ती स्वतःशी म्हणाली.

" युवराज आपल्याला आता बेगमसाहेबांना भेटावयास जावयाचे असेल ? शिवाय मलाही माझी सायंकाळची परमेश्वरप्रार्थना केली पाहिजे. तर मी आतां रजा घेतें." युवराजाच्या आर्जवांकडे लक्ष न देतां विमलनें आपला पाय तेथून काढला. यावेळी आणखी दोन व्यक्ति हे संभाषण लपून ऐकत होत्या.

" पाहिलेंस फातिमा शहाजाद्याचे वर्तन. ती सैतानीण आल्यापासून त्याचे माझ्याकडे कसें तें लक्षच नाहीं. कोठें मला त्यादिवशीं बुद्धि झाली व मी तिला ठेऊन घेतली कोण जाणे, मी घालवीन पण तिला आतां तें जाऊन तरि देतील कां ! मुसलमानी धर्मात जन्म घेतला मात्र, पण कधी मशीदीत जातील, का निमाज पडतील. फार कशाला—आमच्या हातचें खाणेंसुद्धा त्याना नको-आणि त्या हिंदु सैतानणीशीं कशा गुलगुल गोष्टी चालल्यात. तूं मला वचन दिलेंस त्याप्रमाणे जर तिला या जगांतून नाहींशी केलीस तर बरें; नाहीं तर मी आपला काहीं प्राण ठेवणार नाहीं."

" नाहीं, बाईसाहेब तुम्ही आपल्या सुकुमारशरीराला कशाला त्रास देतां ! तुमच्या वैरिणीला आज रात्रीच मी जगांतून नाहींशी करते "

× × × ×

मध्य रात्रींची वेळ, जिकडे तिकडे पूर्ण शांतता भासत होती. भगवान् रजनीपति आपल्या अतुल तेजानें गगनी विलसत होता. युवराज महंमद आपल्या महालांत खिडकीजवळ असलेल्या मृदु शय्येवर पूर्ण निद्रासुख अनुभवीत पडला होता. खिडकींतून आलेल्या हिमकराचें शांत किरण मुखावर पडल्यामुळें युवराजाचा चेहरा अधिकच शोभत होता. अरे ! पण हो पहा ! ही कोण काळी आकृति युवराजाच्या शय्येकडे चालली आहे. काय बरें इचा उद्देश असेल ! अरे, ही तर आपली विमला. तो पहा तिने आपला बुरखा बाजूला केला.

" अहाहा ! ! किती मनोहर हा चेहरा " विमला बोलूं लागली " बा विधात्या, हें सुंदर रूप तूं या चांडाळ म्लेंच्छाला कशाला दिलेंस. हा जर हिंदु असता तर मलाच काय पण एखाद्या राजकन्येला सुद्धा हा योग्य होता. पण म्लेंच्छ झाल्यामुळें बिचाऱ्याला या अल्पवयांत मृत्यु येत आहे. बाबा, इतकी अघोर प्रतिज्ञा तुम्ही माझ्या हातून कां करविलीत. या बिचाऱ्या निरपराधी युवकाने आपला काय अपराध केला. विमलेचे नेत्र अश्रूंनीं भरले. " पण नाहीं, नाहीं " तिचा विचार पालटला. " या चांडाळाच्या बापानें माझ्या प्रिय आईचा आणि पुण्य पित्याचा नाश केला, आमच्या समूळ घराण्याचा उच्छेद याच

काळसर्पाच्या जनकानें केला. याला मी कसा जिवंत ठेऊं ! हा जिवंत राहिल्यास हा आणखी कित्येकांचा नाश करील. विमले, सावध हो. तुझ्याजवळची याची वर्तणूक खऱ्या पूज्य बुद्धीची नसून कृत्रिम मायावीपणाची तुला भ्रष्ट करण्यापुरतीच आहे. " बाबा, बाबा मला धैर्य द्या. " ऊठ निर्लज्जा, अधमाधमा ऊठ. विमलेनें त्याला हातानें हालविलें. हतभागी महंमद पूर्ण जागृत होण्याच्या आधींच विमलेच्या तीक्ष्ण कट्यारीनें त्याचें हृदयच्छेदन केलें.

" धांवा धांवा खून " महंमद वेदनेनें तरफडत बोलला.

" हं, खबरदार एक शब्द बोलशील तर; दोन तुकडे करून टाकीन. "

" कोण विमल माझे लाडके विमल तूंच का ती ? "

" काय माझें नांवसुद्धां याला कळलें ? "

" होय, लाडके, राजा जयसिंहाची कन्या विमल ती तूंच. अरेरे, मला तूं व्यर्थ जखमी केलेंस. तूं म्लेंच्छ म्हणून मला जखमी केलें असशील पण मी म्लेंच्छ नाहीं. मी हिंदु असून रजपूत आहें. राजा जयसिंहाच्या बहिणीचा हतभागी पुत्र प्रताप तोच मी. "

" काय तुम्ही प्रताप. हायरे दैवा. मग हुसेनचा मुलगा असें लोक तुम्हांला कसें म्हणतात ? "

" हुसेनला त्याच्या दुष्टवृत्तीपासून परावृत्त करून आपल्या देशबांधवांना त्याच्या जुलमापासून सोडवावें म्हणून मी म्लेच्छ वेषानें त्याच्याजवळ राहिलो. म्हणून लोक मला तसें समजतात. जरी मी म्लेंच्छवेषानें आज इतके दिवस राहिलों तरी हिंदुत्वापासून यत्किंचित् सुद्धां ढळलों नाहीं. सध्यांच्या काळीं लढाई करून जय मिळणें रजपुतांना अशक्य झालें, म्हणून अशा रितीनें तरी आपल्या देशबांधवांना सुख होईल म्हणून मीं हा मार्ग पत्करिला. विमल तुझ्या परम साध्वी मातेला त्यापासून मींच सोडविली. पण सुटकेनंतर ती थोडेच दिवस जगली. मृत्यूसमयीं आपली कन्या भेटल्यास तिला अंतर देणार नाहीं, असें मजपासून वचन घेऊन त्या बिचारीनें प्राण सोडला. त्या दिवशीं तुला पाहिल्याबरोबर तूं तिची कन्या असावीस असें मला वाटलें. व पुढें कांहीं गोष्टीवरून खात्री झाली. विमल, राजा जयसिंह कोठें आहेत ?"

" ते वारल्याला आतां महिना होईल. येथल्या त्या नीच सुभेदारानें त्यांचा अपमान केल्यावर एक महिन्यानेंच ते या अभागिनीला सोडून गेले. पण तुम्ही

जर हिंदु, त्यांतून रजपूत मग या म्लेंच्छ कुमारीशीं कसें विवाह करणार होतां ? ”

“ नाहीं, मी तिच्याशीं मुळींच विवाह करणार नव्हतों. तिची व इतर लोकांची तशी समजूत. पण माझा मुळींच तसा बेत नव्हता. मी येथून निसटण्याची वाट पहात होतों. मरणसमयीं त्या हुसेननें मला या सुभेदाराजवळ राहण्यास सांगितलें. त्यामुळेंच मी राहिलों. ”

“ काय तो म्लेंच्छ मला ? ”

“ हो, तो मेल्याला आज बरींच वर्षें झालीं. विमल त्या झारींतलें मला थोडें पाणी पाज, माझा प्राण कासावीस होऊं लागला. ”

“ अरेरे ! ! प्रताप तुम्हीं मेला आधींच कां सांगितलें नाहीं ? ” कोमलहृदयी विमलचा प्राण व्याकूळ झाला. तिनें त्याचा हात आपल्या हातांत घेऊन ती निरखून पाहूं लागली. “ विमल काय पाहतेस माझी खूणना ? ही पहा, येथें आहे. काकांनीं ती तुला सांगितली असेल ? ”

“ मग तुम्ही मागेंचआम्हाला कां येऊन भेटला नाहीं. ”

“ ज्यावेळीं घरीं सर्व कत्तल झाली असें तूं म्हणालीस त्यावेळीं मी बाहेरगांवीं होतों. घरीं येऊन पहातों तों कोणी घरांत नाहीं. आसपास चौकशी केली; पण कोणी सांगेना. अरे माझा प्राण पुन्हा कासावीस होतो; ” प्रताप मूर्च्छित झाला.

“ हाय प्रताप ! आपल्या हातांनींच आपला नाश केला. जर तुम्ही मला आधींच ओळख दिल असतांत तर आजचा प्रसंग न येता. ” विमलनें आपलें मस्तक पलंगावर टेकं. विमल, आतां रडूं नको. माझ्या मृत्यूबद्दल मला वाईट वाटत नाहीं, पण तुला आतां आधार नाहीं याबद्दल वाईट वाटतें. परमेश्वर कृपेकरून तुला एकादां चांगला पती मिळाला म्हणजे तूं पुन्हा सुखी होशील. मग माझी आठवणसुद्धां होणार नाहीं. ”

“ नाहीं. असल्या कठोरतेनें मला ताडन करूं नका. आपल्या चरणाखेरीज या हृदयांत दुसऱ्या कोणा जागा नाहीं. मी आता खालीं जाऊन हकीमाला बोलावण्यास पाठवितें, तो आपली जखम आतां बरी करील. ”

" नाहीं. लाडके आतां ती आशा व्यर्थ आहे. तूं जवळ ये आणि मला एकदा हांक मार पाहूं ! " विमलेचा शोकहृदय रुदून जणूं बाहेर येऊं लागला. तिनें त्याचा हात आपल्या हातांत घेऊन त्यावर ती अविरल अश्रुपात करूं लागली.

" विमल अजूनही तूं निष्ठुरना ? इतकें जवळ ये म्हणून सांगतों पण अजूनही तुला दया येत नाहींना ! " वाचकहो, त्या प्रणयी जोडप्याचें मीलन झालें. ती हतभागी प्रतापाची प्राणज्योत त्याचक्षणीं विझाली.

यावेळीं राजवाड्यांत आणखी एक खून झाला. " सुलतान बेगलल. आज सिराजी जरा जास्त झाली होती. रात्रीं तलखी होऊं लागल्यामुळें कोणाला न उठवितां ती एकटीच बागेंत गेली. बागेंतून परत आल्यावर ती विमलच्या खोलींत जाऊन निजली. विमल अर्थात् तेथें नव्हती. सिराजच्या धुंदीत आपण आपल्या महालांत नसून दुसऱ्याच जागीं आहों अशी कल्पनासुद्धां सुलतानेला आली नाहीं. मालकिणीला वचन दिल्याप्रमाणें फातिमेनें विमलचा खून केला. पण दुर्दैवी विमल तेथें नसून हतभागी सुलतानच होती.

दुर्दैवी प्रतापाच्या हतभाग्यामुळें हिंदुरितीप्रमाणे त्याचें दहन न होता कबर झाली.

प्रतापाच्या मृत्यूनंतर बऱ्याच दिवसपर्यंत मध्यरात्रीं त्याच्या कबरीजवळून येत असलेल्या एका करुण संगीतानें उदयपुरवासी जनांचीं हृदयें विव्हल होऊन जात, व कबर अश्रूनें भिजून जाई. काळाच्या प्रचंड नद्यांत तें करुण संगीतही नष्ट झालें व ती कबरही नष्ट झाली.

वर्षांचे अखेरीस एका मुलीचा जन्म झाला.
हुसेनचा शोध करीत मी नानादेश माझ्या लहा.
घेऊन फिरलों, पण कोठें पत्ता लागला नाहीं. अखेरा.
रोजच्याप्रमाणें निजलों होतों; पहाटेच्या सुमारास मु
झालों, पहातों तों पत्नी माझ्या शेजारीं नाहीं व तें ल.
आक्रोश करीत होतें. त्याला पोटाशीं घेऊन मी समजावूं ल.
ऐकतें ! त्याचें ओरडणें आपलें चालूंच होतें. मी आसपास न्याहा.
तों, बर्फावर्शी पावलें उमटलेलीं ! " आला, आला, माझा शत्रु माझ्या .
आला. त्याचेंच हें काम. " मी मोठ्यानें उद्गारलों. हुसेनखेरीज इतक्या दमा.
पणानें असें काम करणारें दुसरें कोणी नाहीं. माझी पूर्ण खात्री झाली. या
बालकाचें काय करावें व शत्रूचा सूड कसा उगवावा याबद्दल मी मोठ्या विवंचनेंत
पडलों. अखेरीस तुझ्या दाईचें बऱ्हाण जवळच्याच गावीं रहात असल्याचें मला
आठवलें व त्याचदिवशीं तेथें जाऊन त्या बालकाला तिच्या हवालीं केलें.
सुमारें चार वर्षें मी फिरलों, पण पत्ता लागेना. अखेरीस त्या बालकाला घेऊन
मी येथें आलों. ती गोजिरवाणी कन्या त्यावेळीं पांच वर्षांची झाली होती.
माझे लाडके विमल, ती तूंच होय. त्याला आज अकरा वर्षें व एक महिना
ऊन गेला. तुला आठवत असेल कीं एक महिनाभर माझा पत्ता नव्हता व
दिवशीं मी परत आलों त्या दिवसापासूनच मी आजारी पडलों. त्याच
जारांत आतां माझा शेवट होणार. विमल, माझे लाडके विमल, तो महिना
कारागृहवासांत काढला. त्याच चांडाळ नराधमानें मला कारागृहवासांत
. ज्या दिवशीं मी परत आलों त्या दिवशीं—अहा ! त्या दिवशीं—त्या
ी आठवण मला सहन होत नाहीं. जो जयसिंह म्लेंच्छांचा एक शब्द-
न घेत नव्हता त्यानें--त्याच या जयसिंहानें--म्लेंच्छांचा पादाघात सहन
काय ? धिक्कार, धिक्कार असो मला ! विमले, जर तुला तुझ्या या
जळाय म बापाची थोडी तरी कींव असेल तर मजप्रमाणें माझ्या शत्रूचें रक्त
त्याचे ा लाव. त्याच्या कुळाचा नायनाट कर, माझ्याबद्दल सूड घे व मग
लीस त ल हाल करुन मार. मी तर आता मरणारच, पण जर पित्राज्ञा मान-
तर ! च मला स्वर्गांतसुद्धां संतोष होईल. अहा प्रताप ! प्रताप आजला असता
झाली, म ऊ, विमल चल पुढें ये; मला वचन दे ! आता माझी दृष्टि मंद
ाझ्या मस्तकावर पादाघात करणारा शत्रु,—माझा कट्टा दुश्मन—हुसेनच

ाहिसा एकतो. माझ्या लहान बालकाप्रमाणेंच
ुला दिलेल्या शस्त्रविद्येचा फायदा कर, खऱ्या रज-
नसत्या प्रेमजालांत पडूं नकोस. विमल, विमल, मला
करतेस, धिक्कार ! धिक्कार असो तुला ! " म्हातारा
ागला.

ा, मला असे धिक्कारूं नका. " विमल शांतपणाने म्हणाली:—
ाय व परमेश्वर स्मरुन मी प्रतिज्ञा करते की मी तुमच्या शत्रूचा सूड
ईन नाहीं तर तत्प्रीत्यर्थ आपले प्राण अर्पण करीन. मी जर माझें वचन
र न करीन तर परमेश्वर मला रौरवाधिकारी करो. मातृ–पितृ-गो–ब्राह्मणहत्येचे
पातक माझ्या मस्तकी पडो. "

" शाबास, शाबास, रजपूतकन्येला योग्य ते बोललीस. पहा त्याच्या पोराल,
या जगांत राहूं देऊं नको; नाहीं तर तो सुद्धां बापासारखा मजप्रमाणे किती
काची हृदये जाळील. हे काळसर्प जगांत राहून उपयोगी नाहीत. आणि जर तुल
प्रताप भेटला तर त्याच्याशीं विवाह कर. पण तो कोणाला माहित जिवंत अ
की नाहीं. त्याखेरीज कोणाला वरूं नकोस. एका ज्योतिष्याने तुजविषयीं भवि
वर्तविले आहे, कीं विवाहाचे सुख तुला केव्हांही लागणार नाहीं. ज्यावे
कोणाही तरुणावर तुझें मन जाईल, त्यावेळींच त्याला मृत्यु येईल. कोण ज
भविष्यें खरीं होतात कीं नाहीं. पण सांभाळ, ईश्वर तुझें कल्याण करो.
आता श्वास लागला, थोडे पाणी दे पाहूं ! प्रतिज्ञा विसरूं नकोस. विम
प्रतिज्ञा विसरूं नकोस. बरें येतों आता. राम–राम,--राम. " म्हाताऱ्याने
पणे देह ठेवला.

× × × × ×

संध्यासमय होता. उदयपूरचा सुभा हुसेनअली शिकारीवर सर्पदंशाने
आजच आठ दिवस झाले होते. त्यामुळें उदयपुरवासी जनाच्या मुखा
प्रकारच्या औदासिन्याची झांक मारीत होती. त्यावेळच्या रिवाजाप्रमा
शाहा अलमगीरकडून खलिता आल्यामुळें हुसेनअलीचा वारस त्याला
नसल्यामुळें, भावी जावई महंमदअलीच होता. महंमदाचा विव
महिन्यांत आपल्या कन्येबरोबर करून टाकण्याचें हुसेनच्या मनात हं
म्हणतातना, " मनसा चिन्तयेदेकं दैवमन्यत्तु चिंतयेत् " तद्वत् विचा
नला सर्प ... ाने नेले. असो. वर सांगितल्याप्रमाणें सायंकाळ

# गोष्ट सांगणारा मीर महबूब.



मुसल्मानी राज्याचे ऐन भरांत हिंदुस्थानांत बादशाही सुखविलासाची व ललितकलांची अभिवृद्धि झाली होती. मुसलमानी बादशहांच्या अमदानींत आग्र्याच्या ताजमहालासारखीं मूर्त काव्यें अगर गोलघुमटासारखीं मानवी कारागिरीचीं अचाट कामें अस्तित्वांत आलीं. गायनवादनादि कला व चित्रकला यांचा त्या वेळीं मोठा उत्कर्ष झाला. या काळांत बादशहांचे मन रिझवणाऱ्या गोष्टी सांगणारांचा धंदाही ऊर्जित दशेस आला होता. मिष्ट मिष्ट पक्वान्नांचें भोजन केल्यानंतर सुखशय्येवर पहुडण्यापूर्वी अगर मध्यंतरी कामकाजाचा कंटाळा आला असतां मन रिझवण्याकरितां विद्वान्, बहुश्रुत व रसिक असे इसम दरबारी मुद्दाम बादशहा आपले दिमतीस ठेवीत असत. श्रवण, वाचन व अवलोकन यांनी आलेल्या अनुभवाचें ज्ञान रसिकपणानें, गोष्टींच्या रूपानें हे इसम बादशहांस सांगत असत. तो काळ आतां गेला. त्याच्यासंबंधानें इतिहासांतरी जो उल्लेख आढळेल तेवढ्यावरूनच त्याच्याविषयींची कल्पना आपण करावयाची.

अशांपैकीं, राजांना गोष्टी सांगणारा मीर महबूब नांवाचा इसम राजपुतान्यांतील एका शहरांत रहात असे. जुन्या परंपरेपैकीं अवशिष्ट राहिलेल्या ज्या कांहीं गोष्टी अद्याप क्वचित् दृष्टीस पडतात त्यांतीलच हा इसम होता. मीर महबूब हा वयानें वृद्ध झालेला असून बादशहातीच्या अगदीं शेवटचा काळ—ऱ्हासाचा काळ—त्यानें पाहिला होता. तें पूर्वीचें वैभव त्याच्या दृष्टीसमोरून समूळ नाहींसें झालें होतें, तरी ज्या राजाच्या पदरीं त्याचें सर्व आयुष्य गेलें, त्या राजाविषयीं त्याला फार अभिमान वाटत होता—इतका कीं एका रजपूत संस्थानिकाकडून त्यांस आमंत्रण आलें असतांही त्यानें असें साफ उत्तर पाठविलें कीं, "माझ्या जिभेनें थोर मोंगल बादशहाचें निमक चाखलें आहे, ती दुसऱ्याचें निमक चाखण्यास केव्हांही तयार होणार नाहीं; आणि मी यापुढें कोणास गोष्टही सांगणार नाहीं." मीर महबूब दरिद्री होता; पण त्याचें 'मन' दरिद्री

ग वाटेल त्याला सुखविण्याकरितां आपल्या बुद्धीची किंवा "सभेची
ण्यापेक्षां दारिद्र्यांतच मरण आलें तरी पुरवलें, असें त्याला वाटत होतें.
। जुन्या काळच्या गोष्टी सांगणारा इसम आहे, हें कळल्यापासून, राजाचें
चित्त रंजविणाऱ्या मीर महबुबाच्या तोंडून आपल्यास गोष्ट ऐकावयास मिळेल तर किती बरें होईल, असें आम्हास वाटूं लागलें. "महालांतील दालनांत बसलेले राजे व मखमलीच्या पडद्याआड बसलेल्या राण्या हे माझे श्रोते होते," अशी बढाई मारणाऱ्या मीर महबूबाचे तोंडून गोष्ट ऐकण्यास आम्ही फार उत्सुक झालों; आणि राजे व राण्या यांना पूर्वी कोणत्या प्रकारच्या गोष्टी ऐकण्यांत आनंद होत असे, हें जाणण्याची आम्हास फार जिज्ञासा झाली. पण 'यापुढें मी कोणास गोष्ट सांगावयाचा नाही.' असा जो मीर महबुबचा निर्धार होता, तो मोडावा कसा, याचें आम्हांस मोठें गूढ पडलें. या बाबतींत आम्ही बहुतेक निराशच झालों होतों. तोंच, आमच्यातील एका कल्पक मनुष्याच्या डोक्यांत एक शक्कल आली. मीर महबुबास गोष्ट सांगावयास लावण्याची युक्ति त्यानें सुचविली; तेव्हां इतकी सोपी गोष्ट आमच्या लक्षांत कशी आली नाही, याचेंच आम्हांस आश्चर्य वाटलें; अशी ती सहज करतां येण्यासारखी होती.

मीर महबुबाचे अंतःकरणांत राजनिष्ठेच्या मनोवृत्तीइतकीच दुसरी एक जोरदार मनोवृत्ति होती. नजिया नामक एका तरुणीवर त्याची प्रीति जडली होती व आज सुमारें तीस वर्षें तिचा कोठें पत्ता नव्हता. ही त्याच्या प्रेमास पात्र झालेली सुंदरी एखाद्या राजाच्या गोशांतील विलासिनी असेल, अगर त्याच्या सुंदर व जनानी श्रोत्यांतील ती कोणी तरी मोठ्या घराण्यांत जन्म पावलेली रूपवती कन्या असेल असें कोणास वाटण्याचा संभव आहे, पण तसें मुळींच नव्हतें. राजदरबारीं गोष्टी सांगत असतां वायूच्या लहरीनें हाललेल्या पडद्यामागील एखाद्या लावण्यखाणी स्त्री-श्रोत्याचा मोहक मुखचंद्रमा दृष्टीस पडून तो "मवश झाला; अगर त्याच्या कथानकांतील प्रीतीच्या प्रसंगांच्या वर्णनांनी तल्लीन झालेल्या एखाद्या तरुणीच्या हृदयांत गोष्ट सांगणाराविषयींच प्रेमभाव वाटूं लागून तिनें आत्मभाव प्रगट केल्यानें तो मोहित झाला होता, अशांतलाही कांहीं प्रकार नव्हता. मीर महबुबाच्या प्रीतीस पात्र झालेली स्त्री राजकन्या नव्हती, खानदानीच्या घराण्यांतील नव्हती, एवढेंच काय, पण ती कुलीनही नव्हती. मीर महबूब हा ज्या राजाच्या पदरीं होता तो एक गतवैभव झालेला दरिद्री राजा होता. त्याचा दरबार होता, पण राज्य नव्हतें. त्याचप्रमाणें मीर

महबूब ज्या स्त्रीवर प्रेम करीत होता, तिच्यांत हीन विकार व तामसी कामवासना विपुल असली तरी सात्त्विक प्रेमाची ओळख तीस नव्हती. पण आपल्या धन्यात किंवा आपल्या प्रियपात्रांत असलेले दुर्गुण त्याच्या दृष्टीस दिसत नसत. त्याच्या राजाजवळ राज्य नसलें किंवा त्याच्या प्रियपात्राकडून नीतिशास्त्राच्या नियमाचें उल्लंघन झालें तरी तें त्यास चालत असे. "अंतःकरणाच्या नुसत्या चांगुलपणानें या सगळ्या उणिवा भरून निघत नाहींत काय? अर्थात् निघतात," असेंच त्यास वाटे. मीर महबुबाच्या नामधारी राजाचें अंतःकरण खरोखरच चांगलें होतें; पण नजियेचें अंतःकरण मात्र तसें नव्हतें. १८५७ साली ती मीर महबुबाचा आश्रय सोडून दुसऱ्याच्या आश्रयास जाऊन राहिली होती. नजियेच्या जातकुळीस व तिच्या पूर्वचरित्रास अनुरूपच हें झालें; पण त्यानें मीर महबुबाचें अंतःकरण मात्र विदीर्ण झालें! आधींच मीर महबूब हा भोळ्या मनाचा, तशांत उतार वयांत त्याचें नजियेवर प्रेम बसलें होतें, त्यामुळें नजियेचें पूर्व चरित्र पार विसरून जाऊन तिला त्यानें आपली म्हणून स्वतःचे पंचप्राण वाहिले होते. तेव्हां आतां मीर महबूब निष्कांचन, निराश्रित व विरक्तही झाला. "तुम्हीं माझी नजिया पाहिली होती काय? तिचे नेत्र कसे प्रेमपूर्ण होते! तिजशिवाय मी कसा जिवंत राहीन. पण ती मला सोडून दूर राहणारच नाहीं! ती मजकडे परत येईलच येईल," असें तो म्हणत असे. या बाबतींत तो इतका भ्रमिष्ट झाला होता कीं, त्यास लोक वेडा समजूं लागले होते.

नजियेच्या शोधार्थ मीर महबूब गांवोगांव हिंडूं लागला; आणि पुढें पुढें त्याला हिंडण्याचें व्यसनच जडलें. जिकडे वाट फुटेल तिकडे तो भटकूं लागला. त्याची ती हृदयद्रावक स्थिति पाहून त्याला जें कांहीं कोणी देई तें खाऊन तो आपली पुढली वाट चालत असे. एके दिवशीं बंगाल्यांतील एका खेड्यांत तो मरणोन्मुख होऊन पडला होता व तशा आवस्थेंत दिल्ली आणि दिल्लीचे राजे व विशेषतः नजियेचे चमकदार डोळे याविषयीं तो बरळत होता. हें त्याच्या एका आप्तास कळल्यावरून तो तेथें आला व त्यानें मीर महबुबाला आपल्या घरीं नेलें; आणि औषधपाणी देऊन व शुश्रूषा करून त्यास बरें केलें. काय असेल तें असो, आजाराबरोबर त्याचें वेडही नाहींसें झालें; आणि नजियेच्या शोधार्थ भटकण्याचें सोडून देऊन तो घरीं स्वस्थ राहिला. एक गोष्ट मात्र त्याच्या मनानें घेतली होती, आणि तापाच्या ऐन भरांत पडलेल्या स्वप्नांत भासलेल्या या एका गोष्टीवर त्याची दृढ श्रद्धा बसली होती. नजिया ही सांप्रत कोंकिझसची राणी झाली

आहे आणि तिजवरील प्रेम कायम ठेवल्यास ती आपल्यास अखंड तारुण्य प्राप्त करून देईल आणि आपण राजे व ती राणी मिळून कॉकेशसच्या राज्याचा सुखोपभोग घेऊं, असें एक नवीन वेड त्याच्या मनानें घेतलें होतें. इतर सर्व बाबींत त्याची विचारशक्ति शाबूत होती; पण नाजिया व तिनें दिलेलें अभिवचन यावरील त्याचा विश्वास मात्र कशानेंही ढळणें शक्य नव्हतें.

मीर महबुबाची मानसिक स्थिति अशी असतां त्याचे तोंडून गोष्ट ऐकण्याची युक्ति आम्हांपैकीं एकास वर लिहिल्याप्रमाणें सुचली. मीर महबुबाची जीभ पैशानें हालली नाहीं, तरी ती प्रेमानें हालेल असें वाटलें. तेव्हां, पूर्वी वापरीत असत तसला सुगंधित कागद घेऊन व त्यावर नाजियेचा म्हणून एक खुबीदार प्रेमाचा निरोप लिहून हें प्रेमपत्र एका जरतारी थैलींत घातलें व जेवण झाल्यावर मोठ्या थाटानें हुक्का ओढीत बसलेल्या मीर महबुबाच्या हातीं तें जाईल असें केलें. पत्रांत लिहिलें होतें कीं, ‘ पूर्वीप्रमाणें आपल्या मुखानें एकादी सुंदर गोष्ट ऐकावी अशा हेतूनें मी अमूक घरीं ( माझ्या घराचा पत्ता दिला होता ) गुरुवारीं रात्रीं येईल. घराचा मालक निवडक माणसेंच त्या वेळीं हजर राहूं देईल व त्याचे समक्ष आपण मला पूर्वीप्रमाणें गोष्ट सांगावी पण मजबरोबर बोलण्याचा प्रयत्न मात्र आपण या प्रसंगीं करूं नये. तसें कराल तर माझ्या कोपानलानें दग्ध व्हाल ! ह्या प्रसंगीं तुम्हीं मला खूष केल्यास मी पुन्हा तुम्हांकडे येईन; आणि तुमचें बरोबर विवाह करून तुम्हास कॉकेशस प्रांताचा राजा बनविण्याचें अभिवचन जें मीं दिलें आहे, तें तेव्हां मी बहुशः पूर्ण करीन. ’

हा निरोप पोहोंचल्यापासून मीर महबूब यास अगदीं चैन पडेनासें झालें आपल्या प्रियकरणीस केव्हां एकदा डोळे भरून पाहीन असें त्यास झालें होतें. मीर महबूब अलीकडे कोणाशीं विशेष बोलत नसे, त्याप्रमाणें ह्या संबंधानेंही तो दुसऱ्या कोणाजवळ कांहीं बोलला नाहीं, हे खरें; पण मला मात्र त्यानें नानाप्रकारें प्रश्न करून पुरेपुरेसें करून टाकलें. “ नाजिया खरोखरच येईल काय, मला ती चांगली दिसेल काय, ती बुरखा तर घेऊन येणार नाहींना ? आपलें अभिवचन तूं केव्हां परिपूर्ण करशील ’ असा प्रश्न देखील मी तिला करूं नये ! मी बोलण्याचें धारिष्ट केलें तर ती मला खरोखरच भस्म करील ? ” अशा प्रकारचे अनेक प्रश्न त्यानें मला केले. ह्या सर्व प्रश्नास मीं उत्तरें दिलीं, पण अमुकच होईल असें मी बिलकूल कांहीं त्याला सांगितलें नाहीं. ‘ हा अनुभव अगदीं

नवीन प्रकारचा आहे, कॉकेझसच्या दरबारच्या रीतीभाती मला काय बरें ठाऊक ? ' असें म्हणून मी या विकट प्रश्नातून निसटलों, पण मी त्यांस येवढें मात्र बजाविलें कीं, ' तिच्याशीं बोलण्याचा प्रयत्न करून तिचा क्रोध भडकविण्याचें धाडस तूं करूं नयेस. असें केल्यास ती तुझें भस्म केल्याशिवाय राहणार नाहीं. तसेंच तूं तिच्या आंगास स्पर्श करावयासही जाऊं नकोस. कारण नुसत्या एका रागाच्या झटक्यात जर तूं भस्म होणार, तर स्पर्शानें काय होईल हें कोणीं सांगावें ! '

मीर महबुबाचें वय साठ वर्षांचें होतें. नशात पेशावरपासून हैद्राबादपर्यंत नाजियेच्या शोधार्थ वणावणा हिंडण्यांत त्याचें शरीर अगदीं जर्जर झालें होतें. तेव्हा या नाजियेसंबंधीच्या अकल्पित व आकस्मिक वातमीचा त्याचे शरीरावर फार परिणाम झाला. निद्रेनें त्यास सोडिलें व त्याची अन्नदहनाची क्रियाही नीटशी चालेनाशी झाली. अखेरीस गुरुवारची रात्र आली. नित्यानियमाप्रमाणें त्यानें गुरुवारीं उपास केला होता, पण रात्रीही तो अन्नास शिवला नाहीं म्हटलें तरी चालेल. त्यानें सुगंधी तेल लावून स्नान केलें आणि कॉकेझसच्या राणीस आपण शक्य तितलें चांगलें दिसावें म्हणून काळजीपूर्वक नीटनेटका पोषाखही केला. त्याचा पोषाख नेहमीप्रमाणें शुभ्रच होता, परंतु त्याची तऱ्हा शंभर वर्षांपूर्वींच्या दरबारी थाटाची होती. त्याचा तो सैल व लांब जामा, तो कलाबतूचा कमरपट्टा व औरंगजेबाच्या काळची वंशपरंपरागत प्राप्त झालेली रत्नखचित कट्यारही त्यानें ऐटीत कमरपट्ट्यांत खोंचली होती–यामुळे त्यांस एक प्रकारची शोभा आली होती. नित्याप्रमाणें मीर महबुबानें परमेश्वराची प्रार्थना केली; पण ह्या वेळची त्याची प्रार्थना बरीच लांबली. मध्यें त्याची प्रार्थना संपल्यासारखी वाटले, पण पुन्हां एकदां आपलें शिर नमवून तो पंधरा मिनिटें ईशचिंतनांत निमग्न झाला. तारुण्यांत एक प्रकारचा हूडपणा असतो व तेव्हा दुसऱ्याची चेष्टा करण्यात एक प्रकारची विशेष मौज वाटत असते, पण आमच्या चेष्टेनें मीर महबुबाच्या मनावर झालेला परिणाम पाहून आम्हांस देखील ह्याची चेष्टा केली नसती तर बरें झालें असतें, असें वाटूं लागलें. पण आतां सगळाच प्रकार कह्याबाहेर गेला होता व हें प्रकरण एकदांचें शेवटास नेणें जरूर होतें. खरी गोष्ट काय आहे तें सांगितलें तर त्याचें अंतःकरण फाटून जाईल, असें वाटलें. असो, एखाद्या रंगभूमीच्या व्यवस्थापकानें केल्याप्रमाणें मी ज्या एका खोलींत सारी व्यवस्था पूर्वींच करून ठेवली होती, तीत त्यास घेऊन गेलों. खोलींतील बैठकीवर पांढरी चादर घातली असून जम-

णाऱ्या मंडळींकरितां भिंतींशीं लोड ठे तें. मध्यंतरीं जरतारी काम केलेल्या मखमालीची गादी घालून तीवर टेंका तशाच प्रकारचा उंची लोड ठेवला होता. त्याचप्रमाणें मऊ मऊ गिरद्याही बाजूंस होत्या. ही मसनद मीर महबुबाकरितांच तयार केली होती. खोलींत मेणबत्त्याचा प्रकाश पडला होता, ठिकठिकाणीं अगरबत्त्या जळत असल्यामुळें व मीर महबुबाच्या जागेसमोरील दरवाजाजवळ ठेवलेल्या धूपदाणींतून येणाऱ्या सुगंधामुळें खोलींतील वातावरण सुगंधित झालें होतें. मीर महबुबाच्या बैठकीसमोरील दरवाजावर एक झिरझिरित पडदा सोडला होता.

मीर महबूब मसनदीवर येऊन बसला व डोळे मिटून नाजियेच्या चिंतनांत निमग्न झाला, असें दिसलें. तोंच मीं पूर्वीं व्यवस्था केल्याप्रमाणें एक बार झाला; आणि ज्या बाजूला बार झाला तिकडे आम्ही दृष्टी वळविती तोंच मीर महबुबासमोरील झिरझिरीत पडद्याच्या मागचा भाग एकदम प्रकाशित झालेला दिसला, आणि अतिशय मौल्यवान् पोषाख केलेली, दोन्ही खांद्यांशीं रत्नभूषित पंख असलेली, व निरनिराळ्या प्रकारच्या व मोठ्या आकराच्या रत्नांनीं भूषित असा मुगूट शिरीं धारण केलेली एक परी पडद्यामागें उभी आहे असें दिसलें. पण इतक्यांत पडद्यामागें चमकणारा प्रकाश एकदम नाहींसा झाला, आणि आम्ही सर्व पुन्हां अंधारांत बसल्यासारखे झालों. कारण पडद्यामागचा प्रकाश इतका तेजस्वी होता कीं, त्यापुढें आम्ही बसलो होतों त्या खोलींतील शामदानांचा प्रकाश अगदींच लोपून गेला होता. पडद्यामागें दिसली ती कोकेझसची राणी नाजिया नसून तो एक आमचे कॉलेजांतील विद्यार्थी होता, हें बिचाऱ्या मीर महबुबास काय ठाऊक! शहरांतील नाटक कंपनीकडून मागून आणिलेल्या झकपक पोषाखानें, कागदी पंखांनीं व तकलुपी मुगुटानें एक कॉलेजांतील चेष्टेखोर विद्यार्थी आपल्या समोर उभा आहे हें मीर महबुबास तेव्हां समजलें नाहीं. जवळच्या खोलींत एकदम प्रकाश पाडून पुनः अंधार पाडण्याची व्यवस्थाही अर्थात् आम्हींच केली होती. असो.

खोलींतलि मंद प्रकाशाची कांहीं वेळानें डोळ्यांस संवय झाल्यावर आम्हांस खोलींतील सर्व कांहीं दिसूं लागलें. मीर महबूब आपले हात पुढें पसरून थोडा पुढें झुकला आहे, त्याचें तोंड थोडें उघडलेलें आहे, व पडद्यामागलि अंधःकारमय प्रदेशाकडे शक्य तितकी टक लावून पहात आहे, असें आम्हांस दिसून आलें. थोडा वेळ गेल्यावर कोकेझसची राणी बनलेल्या माझ्या मित्रानें आपला आवाज



ड्याच्या मागचा भाग एकदम प्रकाशित झालेला दिसला व एक परी पडद्यामागें उभी आहे असें दिसलें.

बदलवून राणीस शोभेशा गोड स्वरांत व अस्सल उर्दू भाषेंत मीर महबुबास गोष्टीस सुरवात करण्याविषयीं आज्ञा केली. तेव्हां नाजियामय झालेल्या मानसिक स्थितींतून बाहेर येऊन मीर महबूब गोष्ट सांगण्यास सिद्ध झाला.

प्रथम कुराणांतील वचनांनीं अल्लाची प्रार्थना करून कांपऱ्या कापऱ्या आवाजांत मीर महबूब गोष्ट सांगूं लागला. जुन्या काळच्या लेखकांच्या लेखांत असतात तसलीं लांबलचक वर्णनें त्याच्या गोष्टींत होतीं. बलाढ्य व थोर अशा एका राजास संतान नव्हतें; एका फकिराच्या आशीर्वादानें त्यास एक कन्यारत्न झालें; सूर्य, चंद्र किंवा तारे यापैकीं कोणास राजकन्येचें ती पंधरा वर्षांची होण्यापूर्वीं मुखावलोकन घडल्यास, यक्षाचा राजा तीस हरण करून नेईल असें भविष्य सांगण्यांत आलें होतें. तसबिरीवरून प्रेम जडून एका राजपुत्रानें राजकन्येकरितां मागणी घातली; राजपुत्राच्या घराण्याशीं राजकन्येच्या पित्याच्या घराण्याचें वैर असतांही लग्न ठरलें व लग्नाची सिद्धता झाली; पण एका रात्रीची चुकामूक झाली व वर्तविलेल्या भविष्याप्रमाणें भयंकर प्रकार घडला, वगैरे वगैरे प्रसंग गोष्टींत होते. पण मीर महबुबाची वाणी इतकी गोड, भाषा इतकी सुंदर व कल्पना इतकी उज्वल होती कीं, गोष्टीस फार रंग भरला; आपल्या राजच्या भाषेंत इतकें सामर्थ्य आहे, तींतील वर्णनानें आपल्या मनोवृत्ति इतक्या उचंबळतील, असें आम्हांला यापूर्वीं कधीं वाटलें नव्हतें. पण, मला वाटतें, भाषेपेक्षा रसनेचाच परिणाम आमच्यावर अधिक होत होता. गोष्ट सांगतांना मीर महबुबाच्या चेहेऱ्यावर स्पष्ट दिसणारे विकार व त्याचे ते चमकणारे डोळे, यामुळें आम्ही मंत्रानें भारल्यासारखे झालों. टीका करण्याची आमच्यांतील बुद्धि शब्दांच्या प्रवाहांत बुडून गेली. पर्वतांतून उगम पावणारा नदीचा प्रवाह जसा कधीं खडक व कपारी ह्यांशीं टकरा देत, गर्जत, तर कधीं मंद मधुर ध्वनि करीत, कधीं गंभीरपणानें तर कधीं आवेशानें वहात जातो त्याप्रमाणें मीर महबुबाच्या मुखातून शब्दप्रवाह वाहत होता. क्षुब्ध मनोविकार व प्रेमळ प्रसंग, प्रीतीचा मंजुरव व द्वेषाचा कर्कश ध्वनि हे त्याच्या गोष्टींत होते. मानवरूपी वाद्यांतील सर्व सूर मीर महबुबानें मोठ्या कुशलतेनें काढून दाखविले. खरोखर, आम्हांस तर वाटलें कीं, मीर महबुबाच्या कंठाची रचना ज्यानें केली त्यानें आमच्या कंठाची रचना केलेली नसावी.

मीर महबुबानें आपल्या गोष्टींत सांगितलें कीं, राजकन्येचें लग्न मोठ्या थाटानें व्हावयाचें म्हणून तिच्या मैत्रिणींनी ( पंधरा वर्षें अंधारात काळ कंठि-

त्यानंतर प्रकाशांत येऊन पतीस राजकन्येनें भेटावयाचें म्हणून ) मोठ्या थाटाची तयारी केली होती. शांत रात्रीचा समय असून चंद्र आकाशांगणांत चमकणाऱ्या तारकांसहवर्तमान क्रीडा करीत होता. एकंदर ती वेळच मनास अपूर्व आल्हादाचा लाभ करून देणारी होती. अशा वेळीं, पंधरा वर्षे बंदिवासांत कंठल्यानंतर सृष्टीच्या शोभेचा सुखानुभव घ्यावा, असें राजकन्येस वाटलें व साहजिकच ती तडक राजवाड्यांच्या उंच गच्चीवर धावत गेली; आणि नील-वर्ण आकाशातील चंद्रम्याच्या किरणवर्षावांत उभी राहिली. राजपुत्रानें नुकताच राजवाड्यात प्रवेश केला होता, व तोही आपल्या वधूस भेटावयास व तिचें पाणिग्रहण करावयास येत होता; तोंच यक्षांच्या राजानें राजकन्येवर झडप घालून तीस अचानक उचललें व आपल्या विमानात घालून तो अंतरिक्षातून उडून गेला ! राजास व राणीस कन्येच्या विरहानें अत्यंत दुःख झालें. जेथें उत्साहाचें साम्राज्य होतें, तेथें आक्रोशध्वनि ऐकूं येऊं लागला आणि सर्वत्र हाहाकार उडाला. पण राजकन्येच्या पतीनें आपलें दुःख गिळून अशी प्रतिज्ञा केली कीं, ‘ इतक्या अधमपणानें माझ्या प्रिय पत्नीस घेऊन जाणाऱ्या दुष्टाचे हातून तिला सोडवीन, तेव्हाच आपल्या पित्यास तोंड दाखवीन. ’ पुढें राज-पुत्र नाना देश फिरला; अनेक लोकांत त्यानें शोध केला; अखेरीस ज्या फकि-राच्या आशीर्वादानें राजकन्या जन्म पावली होती, त्या फकिराची गांठ पडली. खरें प्रेम करणारास यक्षांवर देखील जय कसा मिळविता येईल, याची माहिती त्यास फकिराकडून झाली. नंतर राजपुत्रानें यक्षांच्या प्रांतांत आपला प्रवेश करून घेतला. पण आपल्या राज्यात मानवानें केलेला प्रवेश यक्षाचे राजास दुःसह झाला. त्यानें राजपुत्रास युद्धात जिंकण्याचा प्रयत्न केला, पण फकिरानें त्यास एक परशु व एक कट्यार दिली होती, त्यांचें सामर्थ्य अपूर्व असल्यामुळें यक्षाच्या राजाचे सर्व प्रयत्न विफल झाले. यक्षराजातर्फे राजपुत्राबरोबर युद्ध करावयास जे जे आले त्यांचा त्याचा राजपुत्रानें पराभव केला. नंतर बाहुबलानें जी गोष्ट साध्य झाली नाहीं, ती गोष्ट बुद्धिबलाच्या जोरावर साध्य करण्याच्या आशेनें, यक्षराजानें नाना तऱ्हेच्या युक्त्याप्रयुक्त्या करून पाहिल्या. राजपुत्राचें पत्नीप्रेम ढळावें, तसें झालें म्हणजे त्याच्या हातां-तील शस्त्रें निरुपयोगी होतील, हें ठाऊक असल्यामुळें राजपुत्राकडे कित्येक मोहक पऱ्याही पाठविण्यांत आल्या. पण त्यास राजपुत्र वश झाला नाहीं. अखेरीस यक्षांचा राजा स्वतः युद्धास उभा ठाकला. या शत्रूचाही निःपात कर-

ण्याचें सामर्थ्य राजपुत्राजवळील शस्त्रांत होतें. त्यांचा उपयोग करून राजपुत्र यक्षांच्या राजास यमसदन दाखवणार, तोंच त्या धूर्त शत्रूनें राजपुत्रास म्हटलें कीं, " गुलनार सुरक्षित रहावी अशी इच्छा असेल तर माझे प्राण हरण करूं नकोस. मला जीवदान देशील तर अग्नीनें परिवेष्टित अशा या बिकट व धोक्याच्या राज्यांतून तुला राजकन्येसह सुखानें जातां यावें, अशी सोय मी करून देईन. पण माझी एक अट मात्र त्वां मान्य केली पाहिजेस. ' माझ्या प्रियकरणीचें मजवरील प्रेम कधींही ढळणें नाहीं, तें जसेंच्या तसें कायमच असलें पाहिजे, ' असा जर तुला भरंवसा वाटत असला तर यक्षांची राणी होऊन येथील दिव्य प्रदेशावर राज्य करावें कीं, मानव लोकीं परत जावें, याची निवड तिची तिलाच तूं करूं दे. " पादाक्रांत केलेल्या शत्रूची ही मागणी राजपुत्रानें मन मोठें करून मान्य केली. नंतर यक्षांच्या राजानें त्यास लागलीच आपल्या वाड्यांत नेलें. राजपुत्र हा राजकन्येस आपल्याबरोबर चलण्याविषयीं प्रार्थना करणार आहे, एक आपल्यास मानवी अंतःकरण दुसऱ्या मानवी अंतःकरणाजवळ प्रेमयाचना करणार असून आतां आपल्यास मानवी विश्वासाच्या व एकनिष्ठेचा मासला पहाण्यास मिळेल, अशा आशेनें दैदीप्यमान यक्ष राजवाड्यांत जमा झाले होते. येथपर्यंत गोष्ट आली. तेव्हां मीर महबुबाच्या चेहेऱ्यावर विलक्षण टवटवी आली, तो होता त्यापेक्षां वयानें कमी वाटूं लागला, त्याचे सर्व प्राण त्याच्या अर्थपूर्ण नेत्रांत व थरथर कांपणाऱ्या ओंठांत सांठवले आहेत, असें दिसूं लागलें. राजवाड्याच्या ज्या दालनांत प्रथम गुलनारची व राजपुत्राची भेट झाली त्या दालनाची अपूर्व शोभा वर्णून, मानवी व दैवी यांतील कोणता पक्ष करावा याचा निर्णय करावयास आलेल्या गुलनारचें वर्णन त्यानें केलें. नंतर गुलनारिस उद्देशून राजपुत्रानें केलेल्या भाषणास सुरवात झाली. ज्या पडद्याआड आपली प्रियकरीण नाजिया उभी आहे असा त्याचा समज होता त्या पडद्याकडे वर मान करून दृष्टि लावून मीर महबूब म्हणाला:—

"तुझी सत्ता व तुझें वैभव यांस साजेशा कोणत्या नांवानें तुला मी संबोधावें, हें मला ठाऊक नाहीं; पण ह्या प्रदेशाच्या पलीकडे असलेल्या मृत्युलोकांत तुला यक्षांची राणी या नात्यानें ओळखत नसत; तर मानवी अंतःकरणावर राज्य करणारी सामर्थ्यवान् राज्ञी व माझी वाग्दत्त वधू या नात्यानें, सर्व तुला ओळखत असत; आणि तेव्हां तुला गुलनार म्हणत असत. तेव्हां तुला मी आतां गुलनारच म्हणतों. तुझ्या व माझ्या घराण्यांत पूर्वी वैरभाव होता, तरी मी जशी

तुला प्रेमाची शपथ दिली, तशी तूंही मला दिलीस, याची आठवण मी तुला करून दिली पाहिजे काय! एका गोड चेहेऱ्याच्या लहानशा तसबिरीनें हें सारें केलें. तुझी तसबीर मला पहावयास मिळाली. ती निर्जीव होती तरी तुझ्याठायीं असलेलें स्वर्गीय सौंदर्य व दिव्य प्रेममय अंतःकरण हीं मला त्या तसबिरींत दिसलीं. तारुण्य व प्रीति ह्यांनीं केलेल्या मागणीपुढें वयोवृद्ध व धोरणी पित्यासही मान वांकवावी लागली; आणि ज्यानें युद्धास आव्हान करावयाचें त्यानेंच तुला प्रेमाचा व आशिर्वादाचा निरोप पाठवून द्वेषभाव व शत्रुत्व ह्यांच्या ऐवजीं सलोखा व शांति याचें साम्राज्य व्हावें, असें इच्छिलें. राजकार्य थाटानें गेलेला शिष्टाचाराचा दरबारी निरोप पुरेसा न वाटून मीं स्वतः तुला एक निराळा प्रेमाचा संदेश पाठविला आणि तुला देण्यालायक नव्हती तरी माझी एक तसबीरही तुजकडे पाठवून मीं तुला विनंती केली कीं, 'मी कांहीं सुंदर नाहीं. पण कवचीवरून फळाची किंमत तूं ठरवूं नकोस. बाह्यांगावरून अंतरंगाची परीक्षा करूं नकोस.' सखे! माझ्या स्वप्नांतही नव्हतें असें यश या कामीं मला आलें. माझ्या प्रेमसंदेशाचा तूं सन्मान केलास व प्रेमाची मागणी निष्ठुरपणानें झिडकारून न देता आपलें मधुर प्रेम मला देण्याचें ठरविलेस. माझ्या सुदैवानें तुझ्या पित्याचीही यास संमति मिळाली. गुलनार! प्रेम करणाराच्या अंतःकरणास शांत करील असाच प्रेमाचा निरोप तूं मला तेव्हां पाठविलास. तुझ्या वयाचीं पंधरा वर्षें पुरीं होऊन प्रीति व सौंदर्य ह्यांचा वसंत प्राप्त केव्हां होईल, आणि तूं व मीं विवाहग्रंथीनें एक होऊन मीं आनंदाचा उपभोग केव्हां घेईन, असें मला तेव्हांपासून झालें होतें. पण अखेरीस आंधळ्या प्रेमानें एका रात्रीची चूक केली! आणि त्या दुर्दैवमय रात्री ह्या निष्ठुर आकाशांतील सैतानी ताऱ्यांच्या व ज्याच्या पावित्र्याबद्दल उगीच डांगोरा पिटविला आहे, त्या अवाच्य चंद्राच्या संगनमतानें तुला ह्या यक्षानें मजपासून हिरावून येथें आणिलें

"तूं नाहींशी झालीस तेव्हां तुझ्या मातापितरांची काय स्थिति झाली, तुझ्या मैत्रिणींना किती दुःख झालें, तुझ्या पित्याच्या राजनिष्ठ प्रजेनें किती शोक केला, ह्याचें यथातथ्य वर्णन शब्दांनीं करतां येणें शक्य नाहीं. तूं मनांत आणशील तर तुला त्याची कल्पना करता येण्यासारखी आहे. पण आणखी एका इसमास जें दुःख झालें त्याचें शांतवन नेत्रांवाटे अश्रु गाळून किंवा दुःखावेगांत डोक्यांचे केस तोडून अगर कपडे फाडून होणें शक्य नव्हतें. अल्लाची त्याजवर मेहेरनजर होती व त्यानेंच त्यास वांचविलें. गुलनार! माझ्या हृदयात

दुःखाची संवेदना निरंतर होती; पण मला एक आशाही वाटत होती. ' प्रीति सर्वांवर जय मिळविते. माझ्या अंतःकरणांत आहे तसल्या प्रीतीला पंचमहाभूतेंही कोंडून ठेवूं शकणार नाहींत. ज्याच्या अंतःकरणात प्रेमाची दिव्य ज्योति जळत आहे, त्याच्या पुढें अग्नि व वायु यांच्यासारख्याचें सामर्थ्य काय चालणार ? मीं प्रेम करतों, माझ्या प्रियकरणीचा शोध मला केलाच पाहिजे, शोध केला असतां ती सापडेलच सापडेल, ' असें मला वाटलें. गुलनार! घोर निबिड अरण्यें, अफाट व भयाण प्रदेश, मानवी गतीस प्रतिबंध करणारे मोठाले प्रवाह व अनुल्लंघनीय पर्वत ओलांडून मी तुजकरितां पृथ्वीवर भटकत फिरलों. होकायंत्रांतील कांटा ज्याप्रमाणें नेमकी विवक्षित दिशाच पत्करितो त्याप्रमाणें माझ्या अंतःकरणांतील प्रेमानें तूं होतीस त्या प्रदेशाचा मार्ग मला अचुक दाखविला; आणि चुंबक जसा लोहास आकर्षितो, त्याप्रमाणें तुझ्या सौंदर्याच्या दैवी शक्तीनें मला तुजकडे अखेर खेंचून आणिलें. येथपर्यंतचा प्रवास करताना दरएक पावलागणिक मला युद्ध करावें लागलें व संकटास टक्कर द्यावी लागली. पण गुलनारसारख्या अमूल्य रत्नाच्या प्राप्तीपुढे ह्या संकटाचें मला कांहींच वाटलें नाहीं. सरतेशेवटीं मी ह्या नगरीस येऊन पोहोंचलों. ही नगरी दिव्य आहे; पण तींतील विलक्षण चमत्कारांनीं मला ती वैभवशाली वाटली नाहीं; तर जो सर्वांत मोठा चमत्कार ह्या नगरात गुप्त होता त्या चमत्कारानें ती मला वैभवशाली वाटली. प्यारी! तुजकरिता मी विस्तवावरून चालून आलों आहें. विस्तवानें मला भाजिलें नाहीं, असें नाहीं, पण माझें सर्व शरीर बुडे इतक्या विस्तवांतूनही मीं तुजकरिता चालून येईन.

"यक्षाच्या राजानें परमेश्वराची आज्ञा उल्लंघन करून, परराज्यात चोरून प्रवेश करून, आपल्या सामर्थ्याचा दुरुपयोग केला. क्षुधा किंवा कामवासना तृप्त करण्यापेक्षां पवित्रतर कार्याकरिता जें विशेष सामर्थ्य परमेश्वरानें त्यास दिलें होतें, त्याचा दुरुपयोग करून त्यानें तुला हरण करून नेलें. त्याचा मीं पाठलाग केला, त्याला मीं शोधून काढला आणि मी एक क्षुल्लक मानव असूनही त्याच्या बरोबर चार हात करण्यासही मागेंपुढें पाहिलें नाहीं. तुजवरील माझ्या प्रेमानें माझें अंतःकरण सबल झालें आणि त्या सबल झालेल्या अंतःकरणानें माझ्या मनगटांत नवीन जोर येऊन, मजमधील विश्वासानें माझ्या हातांतील परशूची धार तीव्रतर व कट्यारीचें अग्र तीक्ष्णतर झालें. एवढा मोठा यक्षांचा राजा पण त्याचा मी अखेर पाडाव केला.

"त्याला ठार करून, विजयी वीरांची लूट या नात्यानें मला तुजवर आपला हक्क सांगतां आला असतां, पण कोणत्या गोष्टीवर श्रद्धा अगर विश्वास ठेवावा, यासंबंधानें जशी कोणाची कोणावर सक्ति चालत नसते, त्याचप्रमाणें शक्तीच्या जोरानें प्रीति ही प्राप्त होत नसते. ह्या बाबतींत विजयी झालेल्यासच कित्येकदां पराजित झालेल्यापुढें मान लववावी लागत असते. हें मला माहित आहे. सध्यांच्या प्रसंगीं माझ्या स्थितींत दुसरा कोणी इसम असतां तर तो तलवारीचा खणखण नाद करीत व मोठ्या ऐटीनें पावलें टाकीतच तुजपुढें आला असता; पण मी प्रेमानें साशंक अशी पावलें टाकीत तुजपुढें गुडघे टेकून विनवणी करावयास आलों आहें. जेथें दुसऱ्यानें हुकूम केला असतां तेथें याचकाप्रमाणें याचना करण्यांतच—माझ्या तुजवरील प्रेमामुळें—मला अधिक भूषण वाटतें. तर गुलनार! मजकडे ये; आणि माझ्या अंतःकरणास विदीर्ण करणाऱ्या या प्रीतीच्या क्षुधेचें शमन कर. प्रिये! मजकडे परत येण्यास विलंब लावूं नकोस, आणि निरंतर टिकणाऱ्या तुझ्या दैवी प्रेमानें मला पावन करून टाक.

"काय? तूं उत्तर देत नाहींस: अपवित्र प्रेमाच्या चुंबनाची चटक लागल्या-मुळें तुझे ओठ बंद झाले आहेत काय? गुलनार! मला दिलेल्या शपथेची आठवण कर. मी कोणी प्रेमाची मागणी करावयास आलेला नवीन इसम नाहीं, आणि एखाद्या अल्लवयी कुमारिकेच्या अनुपभुक्त प्रेमाची मागणी मी करीत आहे, असेंही नाहीं. माझी मागणी तूं पूर्वींच कबूल केलेली आहेस. ज्या तऱ्हेच्या मागणीची, विनंतीची किंवा खुशामतीची अज्ञ कुमारिकांना वश करण्याचे कामीं जरुरी लागते, किंवा ज्याची पोकळ डौल करणाऱ्या कुमारिका इच्छा करीत असतात, अशा प्रकारच्या विनंतीची किंवा खुशामतीची अपेक्षा न करितां, त्वां मला आपला हात दिला होतास. तर मग गुलनार! सर्व शिष्टाचारास सलाम ठोकून तूं आपलें वचन आतां खोटें कां करूं पहातेस?

"पृथ्वीवरील राजपुत्रांत घराण्याच्या मोठेपणानें, राज्याच्या विस्तारानें किंवा संपत्तीच्या वैभवानें मी सर्वांत श्रेष्ठ आहें. पण जेथें पृथ्वीवरील वैभवापेक्षा अधिक वैभव तुझ्या दृष्टीसमोर आहे, तेथें तुजसमोर पृथ्वीवरील वैभवाची तारीफ करण्यानें, तुला कौतुक किंवा हेवा वाटण्यापेक्षां माझ्या वेडेपणाचें हसूंच अधिक येईल, हें मी जाणून आहें. पण गुलनार! जरी त्यापेक्षां अधिक वैभवशाली असें राज्य मी तुला देऊं शकलों नाहीं, तरी आपलें राज्य चालवण्यास मी

तुला एक मानवी अंतःकरण देऊं शकतों. मी तुझा अंकित राहीन. अत्यंत विस्तृत राज्यापेक्षां अधिक मोठी आणि मानव किंवा यक्ष जी सर्वांत अधिक मोठी ज्योत पेटवूं शकेल त्याहीपेक्षां अधिक तेजस्वी प्रीति मी तुला अर्पण करीन. प्रिये! राज्याचा मोबदला देऊन प्रीतीचा सौदा होत नसतो, आणि अंतःकरणाची विक्री ज्या पेठेंत होते अशी पेठ व्यावहारिक जगांत कोठेंही नाहीं. अंतःकरणें हीं शुद्ध प्रेमाच्या दिव्य नाण्याची किंमत देऊन मिळत असतात, त्याप्रमाणें तुझ्या अंतःकरणातील प्रेमानें माझें अंतःकरण केव्हांच आपलेसें करून घेतलें आहे, तूं आपलें अंतःकरण माझ्या स्वाधीन करण्याचें वचन केव्हांच देऊन चुकली आहेस, आणि तुझ्या अंतःकरणावरील आपला हक्क सांगण्यास मी आज आलों आहें. आपला करार प्रेमाचा आहे. तो ह्या आयुष्या-पुरताच नसून त्याची व्याप्ति ह्या जन्मापलीकडे आहे. तेव्हां मृत्युलोकीं दिलेलीं वचनें खोटीं करण्याचा विचार तूं आपल्या मनांत येऊं देऊं नकोस.

"अजून स्वस्थच! अजून बोलत नाहींस? तूं आपल्या शपथा व करार मोडण्यास जरी सिद्ध झाली असलीस तरी तूं व मी दोघेही मानव जातीतील असल्यामुळें मला तुजवर हक्क सांगण्याचा अधिकार येतो, हें तूं विसरूं नकोस. माती मातीसच मिळाली पाहिजे, असा परमेश्वरी नियम आहे. येथील यक्षांच्या बाह्य तेजस्वितेनें तूं मोहित झाली असलीस तरी त्यांचीं अंतःकरणें तशीं नाहींत. हजारों यक्षांचे प्रेम एकवटलें तरी त्याच्यानें माझ्या प्रेमाची बरोबरी होणार नाहीं. तेव्हां फसून आडमार्गाला लागलेल्या कुमारिके! तुला, आंत कवडी-मोल किंमतीचें अंतःकरण असलेलें देदीप्यमान शरीर पाहिजे किंवा बाहेरून तेजस्वी न दिसणारें पण अंतरीं प्रेमज्योतीनें सुप्रकाशित झालेलें शरीर पाहिजे?

"गुलनार! तूं उत्तर देत नाहींस! तुला कोणी मंत्रानें तर भारून टाकलें नाहींना? पण माझें अंतःकरण खोटें कधींही सांगणार नाहीं, तें मला सांगत आहे कीं, हीन वृत्तीस मोह पाडूं शकणाऱ्या गोष्टींमुळें तुझें अंतःकरण सुविचार किंवा प्रेम ह्यांपासून कदापि परावृत्त होणें नाहीं. तुझे नेत्र तुला फसवतील. बाह्यतः सुंदर दिसणाऱ्या हलक्या वस्तु खरोखर थोर आहेत, असें ते तुला सांगतील. तर त्यांचा सल्ला घेऊं नकोस. तूं आपल्या प्रेममय अंतःकरणाची सल्ला या वेळीं घे, तुझें अंतःकरण काय सांगतें तें तूं ऐक. तुझ्या भोंवताली दिसणाऱ्या वस्तूंनीं तूं भुलून जाऊं नकोस. येथील कावेबाज चेटकानें मानवी नेत्र फसत असतात; पण प्रीतीपुढें त्याचें कांहीं चालत नाहीं. सर्व वस्तूंस जरा व विनाश

हीं आहेत, आणि सर्व वस्तूंची कालांतरानें विस्मृतिही पडते, पण प्रीति ही एक अशी चीज आहे कीं, तीस जरा नाहीं, मृत्यु नाहीं, आणि तिची कधीं विस्मृतिही होणें नाहीं."

विरही व एकाकी पडलेल्या अंतःकरणाचा हृदयद्रावक आक्रोश वरीलप्रमाणें ऐकत असतांना आम्हाला आपोआप वाटूं लागलें कीं, आम्हीं ऐकत असलेल्या गोष्टीस मीरमहबुबाच्या आत्मचरित्राचें स्वरूप प्राप्त झालें असून, ही केवळ एखाद्या कल्पकाची कल्पना नाहीं. प्रीति व विरह, दुःख व आशा, विरहानंतर झालेली भेट व साशंक मानसिक स्थिति ह्यांची खरीखुरी गोष्ट आम्ही ऐकत आहों, असें आम्हांस वाटूं लागलें; आणि एका स्त्रीच्या खरोखर 'होय' किंवा 'नाहीं' ह्या उत्तरावर सर्व कांहीं आतां अवलंबून राहिलें आहे, असें आम्हास दिसूं लागलें. ही गोष्ट सर्वांच्या ध्यानांत एकदमच आली नाहीं. पण हळूहळू सर्वांस समजून आलें कीं, मीर महबूब हा स्वतःच्या विरहाचेंच वर्णन करीत असून नजियेच्या प्रेमाची याचना प्रत्यक्ष करून पहात आहे. पण, पुढें जो प्रकार घडला, तो घडेल, असें मात्र कोणासही वाटलें नाहीं. एखाद्या नागाच्या दृष्टीमुळें भारून गेलेला एखादा पक्षी जसा हालचाल विसरून एका जागीं बद्ध झाल्यासारखा होतो, त्याप्रमाणें आम्ही प्रेममंत्रानें भारले गेलों होतों. तोंच एक चमत्कार झाला. मीर महबूब एकाएकीं आपल्या आसनावरून उठला आणि कॉकेझसच्या राणीनें, कोपानलानें दग्ध करीन, असा जो इशारा त्यास दिला होता तो विसरून पडद्याचे बाजूला घुसला. नेत्र पडद्याकडे लावून व दोन्ही हात पडद्याकडे करून प्रीतीनें बेहोष झालेला मीर महबूब तडक पडद्याकडे जाऊं लागला. पण तसें करतांना एक शामदान त्याच्या पायानें उलथून पडलें. तें जळतें असून पडद्याच्या जवळ होतें; तेव्हां तें पडतांच मेणबत्तीची ज्योत पडद्यास लागली आणि तो झिरझिरित असल्यामुळें आम्ही तेथें जाण्यापूर्वींच त्यानें भरकन पेट घेतला. कॉकेझसच्या राणीच्या दरबाराचे नियम न पाळल्याबद्दल खरोखरच शासन झालें, असें म्हणण्यासारखाच हा प्रकार घडला. पडद्यानें पेट घेतला तेव्हां हा कॉकेझसच्या राणीचा कोपानल होय असें मीर महबुबाच्या प्रेमविकल व मृदु मनास तात्काळ विद्युद्वेगानें वाटलें; आणि पडदा जळून गेल्यामुळें उघड्या पडलेल्या दरवाजातून पलीकडच्या खोलीकडे वेड्यासारखा पहातच तो उभा राहिला. इकडे पऱ्यांची राणी आपल्या पंखांचा तोल

संभाळून केव्हांच अंतर्धान पावली! मीर महबुबाच्या डोळ्यापुढें लगेच अंधारी आल्यासारखें झालें, त्याचा तोल त्याला संभाळवेनासा झाला व तो एकदम मागील गिर्यावर धाड्दिशीं मूर्च्छित होऊन पडला.

आणखी कांहीं पेटलें नाहीं ना, पेटत होतें तें नीट विझलें कीं नाहीं, हें पाहण्यांत इतर मंडळी गुंतली असतां, उघड्या हवेंत नेल्यानें गार वारा लागून मीर महबूब सावध होईल या आशेनें त्यास मीं अंगणांत नेलें. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. एवढेंच काय, पण दुसरे सारे उपायही विफल झाले. मीर महबुबाच्या नाडीचे ठोके बंद झाले व त्याच्या अंतःकरणाची क्रिया विराम पावली. मीर महबुबाचे प्राण निघून गेले! मीर महबूब जमिनीवर पडलेला होता. त्याचा चेहरा आकाशाकडे होता; आणि त्यावर उषःकालच्या बालरवीचें कोंवळें किरण पडल्यानें त्यावरील विकार स्पष्ट दिसत होते. या वेळीं त्याच्या चेहऱ्यावर भीति किंवा निराशा याची छटाही दिसत नव्हती. उलट एखादी इच्छित वस्तु प्राप्य झाल्यावर येतें तसलें समाधानाचें स्मित त्याच्या एकमेकापासून अमळ विलग झालेल्या ओंठावर दिसत असून त्याच्या चेहऱ्यावर विलक्षण टवटवी आल्यासारखी दिसत होती. अशा रितीनें मीर महबुबाच्या अखेरच्या गोष्टीची समाप्ति झाली.

सदाशिव.

---

# दैवाची लीला.

( लेखक—शंकर रामचंद्र ओक. )




सवी सन १७०९ सालची गोष्ट. औरंगजेब बादशहाच्या मागून त्याचा मुलगा मुअज्जमशहा हा नुकताच तख्तावर बसला होता. मोहोरमचा सण अगदीं जवळ आला असून लक्षावधि तमासगीर दिल्लींतील मोहोरमाचा थाट पाहाण्यासाठीं जमले होते. खुष्कीच्या रस्त्यानें व यमुना नदींतील नावांतून रोजच्या रोज लोक येतच होते. या बादशहाच्या कारकीर्दींतील हा पहिलाच सण असल्यामुळें तो अत्यंत थाटानें साजरा होणार हें उघडच होतें व त्या संधीला खैरात वगैरे मिळेल या आशेनें लांबलांबचे फकीर व भिकारी यांनीं दिल्ली शहर अगदीं गजबजून सोडलें होतें. यमुना नदींतून शेंकडों नावा येत होत्या. त्यांपैकीं एका नावेंत इतर लोकांपासून किंचित् बाजूला असे दोन उतारू बसले होते. त्यांपैकीं एक सुमारें दहा बारा वर्षांचा मुलगा होता. तो दिसायला किंचित् ठेंगणा, पण गोरा हंसतमुख व मोठा बोलका असल्यामुळें कोणासही त्याजकडे पाहून आनंद होई, दुसरा उतारू वृद्ध असून त्याची चर्या मोठी शांत दिसत होती. त्याचे केस बहुतेक पांढरे झाले होते व त्याची पांढरी शुभ्र दाढी, पांढरा झगा व हातांत स्फटिकाची माळ पाहून प्रत्येकाला त्याजविषयीं मोठा आदर वाटे. दिल्लीपासून, ते उतारू बसले होते ती नाव बऱ्याच अंतरावर असतांनाच, त्या मुलानें त्या वृद्ध गृहस्थास दिल्लीविषयीं प्रश्न विचारून बरीच माहिती मिळविली होती. कुतुबमिनार, दिवाण–ई–आम, जुम्मा मशीद व राजवाडा हीं स्थळें अगोदर पाहावयाचीं हें त्यानें अगदीं ठरवून टाकलें होतें; त्यामुळें दिल्ली शहर दिसूं लागताच त्यास फार आनंद झाला. मोठमोठे वाडे, मशीदी, दर्गे वगैरे स्पष्ट दिसूं लागले व नावेंतले इतर लोकही ते शोभायमान शहर पाहून मोंगल बादशहांची तारीफ करूं लागले. नाव अगदीं शहराजवळ येत चालली तसे उतारू लोक आपापल्या सामानाची बांधाबांध करूं लागले. तो वृद्ध गृहस्थही आपलें सामान बांधण्यासाठीं उठला, इतक्यांत तो मुलगा म्हणतो:—

" साईजी, ओहो हो ! पहा, ही सुंदर नाव कशी जाते आहे हो. आपण कां नाहीं असल्या नावेंत बसून आलों ? " साईजी त्यास हळूच म्हणाले, " हळू बोल बेटा. तुझ्या आईची भेट होईपर्यंत आपण कोण हें कोणाला कळवून उपयोग नाहीं. ही खुद्द पातशहाची नाव आहे म्हणून इतकी सुंदर केली आहे. हा समोर जो उंच वाडा आहे तो पातशहाचा एक महाल असून येथें ते कधीं कधीं असतात. त्या वेळीं त्यांना उपयोगीं पडावी म्हणून ही नाव येथे ठेवली आहे. "

त्या मुलानें त्या वाड्याकडे उत्कंठेने नजर फेंकून विचारलें, " साईजी, मग माझी आईसुद्धां याच वाड्यांत असेल का ? " " होय बेटा. बादशहा जर या वेळीं येथें असतील तर तुझी आई देखील येथेंच असली पाहिजे. " " पण साईजी, काय हो, मला पाहून आईला आनंद होईल का हो ? " " बेटा बहादर, मी काय सांगूं ! प्रत्यक्ष भेटल्यावर काय तें समजेल. यदा कदाचित् येथें तुझी निराशा झाली तरी आम्ही दोघे भाऊ जोंपर्यंत जिवंत आहोंत, तोंपर्यंत तूं अगदीं काळजी करूं नको. "

" पण साईजी, आम्ही आईची परवानगी आणवूनच नंतर येथें आलों असतों तर चांगलें नसतें का झालें ? " " तुला काय समजतें बाळ. कदाचित् ' येऊं नको ' असा निरोप आला असता तर काय करावयाचें ? तशा स्थितींतही आम्ही आलों असतों तर एखाद्या तीन कवडीच्या शिपुरड्यानें आम्हास मज्जाव केला असता. पण आता तुला प्रत्यक्ष पाहिल्यावर देखील तुझ्याशीं न बोलणें अगदीं अशक्य आहे. आईचेंच हृदय तें. मुलाला पाहिल्यावर देखील त्याला पाझर फुटणार नाहीं असें तें निष्ठुर कसें असूं शकेल ? बादशहा कोणत्याही गोष्टींत तिच्या विरुद्ध कधीं जात नाहीं हें सगळ्या जगाला ठाऊक आहे. शिवाय त्यालाही कांहीं मूलबाळ वगैरे नाहीं. बेटा बहादर, तुझें नशीब मोठें शिकंदर दिसतें आहे. तेव्हां तुझें नशीब उघडलेंच तर आम्हाला विसरूं नको म्हणजे झालें. "

साईजी हें शेवटचें वाक्य हंसत हंसत बोलले खरें, पण दिल्ली शहर जसें जसें जवळ येत चाललें तसें तसें आपलें कार्य कसें पार पडेल, या काळजीनें त्यास अगदीं घेरून सोडल्यामुळें ते बरेच चिंतातुर दिसत होते. फत्तेपूर येथील आपल्या मशीदींतल्या एका चटईवर बसून विचार करितांना जें कार्य आपण हो हो म्हणतां उरकून टाकूं असें वाटलें होतें, तें दिल्ली शहर अगदीं दिसूं लागतांच आता कसें पार पाडावें याचा त्यांस मोठा विचार पडला.

× × × × ×

( २ )

ज्या काळची कथा आम्ही लिहीत आहों त्यापूर्वी सुमारें बारा वर्षें फत्तेपूर प्रांतांत मोठा दुष्काळ पडला होता. औरंगजेब बादशहा आपल्या सैन्यासहवर्तमान दाक्षिणेंत उतरला होता. दिल्ली व उत्तर हिंदुस्थान वगैरे प्रांतांवर युवराज व मंत्रिमंडळ यांची नेमणूक केली होती, व त्यांनीं बऱ्याच अंशानें दुष्काळपीडित लोकांस साह्य केलें. अशा संधीस दुष्काळानें उपासमार झालेली व दारिद्र्यानें जिला फाटकातुटका कपडाही घेता आला नाही अशी एक तरुण व सुंदर रजपुतानी बरोबर आपलें एक अर्भक घेऊन फत्तेपूर येथें अन्नवस्त्राकरितां दारोदार हिंडत होती. तेथें असलेल्या हिंदु लोकांपैकीं कोणीही तिला साह्य केलें नाहीं, पण तेथील मशीदींत असलेल्या फकीरबंधूंनीं मात्र तिला यथाशक्ति साह्य करून भुकेनें तळमळणाऱ्या तिच्या अर्भकाला पाळण्याचें पत्करिलें. तिनेंही त्यास त्यांचे हवाली करून आपल्या पोटाला मिळेल त्या दिशेचा मार्ग स्वीकारला. नशिबाचा खेळ काय चमत्कारिक असतो पाहा ! प्राण कसे वांचतील या विवंचनेंत भटकणारी ती रजपुतानी दैववशात् एके दिवशी दिल्ली शहरांत भटकत असता शहाजाद्याची व तिची नजरानजर झाली व तिच्या सौंदर्यावर मोहित होऊन शहाजाद्यानें त्याच दिवशी तिला आपली पट्टराणी केली ! याप्रमाणें नजरानजर होण्याच्या पूर्वी जी दिल्ली शहरात कोणासही माहीत नव्हती व भिकारीण समजून जो तो तिचा तिरस्कार करीत असे, ती केवळ दैवाच्या अघटित लीलेनें मोगल साम्राज्याची युवराज्ञी बनली. युवराजानें मोठ्या आवडीनें तिचें नाव शमसलूनिहार असें ठेविलें. थोड्याच दिवसांत शहाजाद्यावर तिनें इतकें आपलें वर्चस्व बसविलें कीं, प्रजाजन, जहांगीर व नूरजहान हींच पुन्हां अवतरलीं आहेत असें बोलूं लागले. औरंगजेब दाक्षिणच्या स्वारींत गुंग झाल्यामुळें राज्यकारभार शहाजादाच पाहात असे. आणि तो सर्वस्वी शमसलूनिहारच्या मुठींत असल्यामुळें तिच्या इच्छेप्रमाणें सर्व कारभार चालू होता. शमसलूनिहार स्वभावानें फार रागीट व दृढनिश्चयी असल्यामुळे सर्वजण तिच्यापुढें अगदीं चळचळा कांपत असत. अशा त्या स्त्रीचें औरंगजेब मरून शहाजादा गादीवर बसल्यावर फारच प्रस्थ माजलें. माझा हुकूम एक वेळ मोडलेला पत्करेल पण शमसलूनिहारचा हुकूम मोडतां कामा नये असें बादशहानें खलितें चोहोंकडे पाठविले.

अशा त्या ऐश्वर्यसंपन्न राणीकडे, ती दारिद्र्यावस्थेंत असतांना टाकून गेलेल्या तिच्या मुलाला घेऊन सांईजी येत होते.

दिल्ली शहर येताच ती नाव एका घाटावर थांबली, व तीमधून सर्व उतारू बाहेर पडून आपापल्या मार्गाला लागले. साईजी व बहादर हे घाटावरून निघून एका मार्गाला लागले.

दिल्ली शहर फार प्रचंड खरें, पण रस्ते अरुंद असल्यामुळें, गाड्याघोड्यांची फार वर्दळ असल्यामुळें व विशेषतः त्या संधीला लक्षावधि लोक दिल्लीत आले असल्यामुळें रस्त्यांतून जाणाऱ्यांची मोठी त्रेधा उडत असे. साईजी अनेक वेळां दिल्लीत आले होते. त्यामुळें ते तेवढ्या गर्दीतूनही आपला रस्ता काढीत लवकर चालले होते; पण बहादराची तशी स्थिति नव्हती. तो प्रचंड जनसमूह व दिल्ली शहराचें तें विलक्षण वैभव पाहून, आनंदानें व आश्चर्यानें इकडेतिकडे पाहात तो साईजींच्या मागोमाग जात होता. हत्ती, घोडे, उंट, रथ, गाड्या वगैरे रस्त्यातून सारख्या जात होत्या, त्याचेंच त्याला फार कौतुक वाटत होतें. शेवटीं अनेक रस्ते ओलांडल्यावर ते एका विस्तीर्ण पटांगणांत येऊन दाखल झाले. या पटांगणाच्या उत्तरेच्या बाजूस एक फार मोठा बाग असून त्यात एक मोठा महाल असे. नूरजहान इला रहाण्याकरितां जहांगीर बादशहानें हा मुद्दाम तयार केला असून त्यास ' नूरबाग ' असें नाव दिलें होतें. त्या बागेंत शमसलूनिहार हल्लीं रहात असे. बागेच्या मुख्य दरवाजावर अरबी शिपायाचा पहारा होता. साईजी व बहादर त्या दरवाजाजवळ येतांच एका शिपायानें त्यांच्यावर गुरगुरून त्यांस आंत जाण्यास मज्जाव केला, पण साईजी त्याच्या गुरकावणीला मुळींच भ्याले नाहींत. मश्रूराकडे आपणांस जावयाचें आहे असें सांगतांच तो शिपाई किंचित् दचकला व त्यानें त्यांस पुढें जाण्यास वाट दिली. मश्रूर हा त्या वेळीं जनानखान्यांतील मुख्य खोजा असून त्याचा राजवाड्यांत चोहोंकडे फार दरारा असे. बादशहाच्या शयनागारांत रात्रीं पहारा करण्याचें त्याचें काम असून त्याचे हाताखालीं शेंकडों खोजे असत. जनानखान्याचें सर्व काम सुरळीत चालावें म्हणून बादशहानें त्याबद्दलचे सर्व अधिकार त्यास दिले होते. असो.

आपली युक्ति सफल झाली असें पाहून साईजींस फार हर्ष झाला असावा असें दिसलें व ते लागलीच त्या नूरबागेंत शिरले. राणी शमसलूनिहार हिचें अत्यंत आवडीचें तें ठिकाण! तेथल्या सौंदर्याला काय विचारावें! साईजी व बहादर जात होते त्या वाटेच्या दोहों बाजूंस अनेक जातींच्या व रंगांच्या वृक्षांची व वेलांची मोठ्या कुशलतेनें मांडणी केली होती. मधून मधून उंच उंच कारंज्यांतून पडणाऱ्या पाण्याचे पांढरे स्वच्छ प्रवाह सदा हिरव्यागार दिसणाऱ्या जमिनीवर

पडत होते. सर्व ऋतूंत पैदा होणारीं अनेक तऱ्हेचीं फुलझाडें, काश्मीर, नेपाळ अफगाणिस्थान व इराण वगैरे दूरदूरच्या देशांहून मुद्दाम आणून लाविलीं होतीं. जागोजाग सुंदर तळीं राखलेलीं असून त्यांत श्वेत, रक्त व नीलपद्में मुद्दाम लाविलीं होतीं. एक सरोवर सर्पाकृतीचें केलेलें असून त्याचे सभोंवतीं अनेक उंच उंच झाडांची दाट लागवड केली होती. यमुना नदीचा पाट आणून त्यांत मुद्दाम सोडला असून शेंकडों राजहंस व बगळे त्यांत आनंदानें आहार व विहार करीत होते. बादशहा व शमसलूनिहार यांचें हें एक विहारस्थान असून तीं एखादे वेळीं आपण दोघेंच नावेंत बसून त्या सरोवरांतून वल्हवीत जात असत. ठिकठिकाणीं सुंदर लताकुंज केलेले असून त्यांत विश्रांति घेण्यासाठीं संगमरवरी दगडांचीं अत्यंत शोभिवंत आसनें ठेविलीं होतीं. ती सर्व शोभा पाहून बहादरास फार आनंद झाला. त्याला समजूं लागल्यापासून फत्तेपूरच्या बाहेर तो कधींच पडला नव्हता, त्यामुळें त्याच्या दृष्टीस असा विस्मयकारक देखावा पडणें अर्थातच शक्य नव्हतें. त्या सुंदर बागेतून सभोंवतालची शोभा पाहात पाहात ते दोघेही कांहीं वेळानें महालाच्या मुख्य दरवाजाशीं येऊन पोंचले. येथेही पहिल्या पहाऱ्यावर सांगितल्याप्रमाणें सांगितल्यावर त्यास महालांत शिरण्याची परवानगी मिळाली, आणि पहाऱ्यावरील मुख्य अंमलदारानें मशूर कोठें भेटेल ते दाखविण्याकरिता एक शिपाई त्याजबरोबर दिला. त्या महालाची शोभा फारच विलक्षण होती. शहानशहा बादशहा जो जहांगीर त्यानें खुद्द नूरजहान हिच्याकरिता तयार करविलेला तो महाल! त्याची शोभा काय सांगावयाची आहे! फत्तेपुराच्या बाहेर कधीं न पडलेला तो बहादरच तें ऐश्वर्य पाहून चकित झाला असें नव्हे, तर अनेक वेळा दिल्ली, आग्रा, लाहोर वगैरे शहरें हिंडून आलेले व नानातऱ्हेचे रम्य देखावे अवलोकन केलेले ते साईजी देखील त्या महालाची ती अद्वितीय शोभा पाहून कित्येक वेळां आकृतवक्त्र झाले! महालामधील ते विस्तीर्ण दिवाणखाने, सुवर्ण, मोतीं व रत्नें यांनीं भूषित केलेलीं दिव्यासनें, रेशमाचे भरजरी कलाबतूचें काम केलेले पडदे, हंड्या, झुंबरें यांनीं सुशोभित केलेले महाल, संगमरवरी दगडांचे, चंदनाचे, हस्तिदंताचे व अनेक तऱ्हेच्या रत्नांनीं खचलेले असे सुंदर सुंदर नयनमनोहर पदार्थ, मिसर देश, रूमशाम देश व इराण व चीन या देशांतून आणलेल्या अत्यंत दुर्मिळ वस्तु, बाबर बादशहापासून अलमगीर बादशहापर्यंतच्या सर्व बादशहांनीं शत्रूंपासून जे अत्यंत सुंदर दुर्मिळ पदार्थ मिळविले होते, व ज्यांचा संग्रह त्या महालांत केला होता, ते ते सर्व पदार्थ पाहून साईजी

आपण कोणत्या कामाकरितां आलों आहों हें देखील क्षणमात्र विसरून एक एक वस्तूकडे निरखून पाहूं लागले ! परंतु त्याबरोबर आलेल्या शिपायास त्यांच्या इतकी उत्कंठा कोठें होती ? 'अतिपरिचयात् अवज्ञा' अशी त्याची स्थिति. त्यानें त्यांस लागलीच पुढें होण्यास खूण केली व कांहीं वेळानें ते एका खोली-जवळ येऊन पोंचले. कलाबतूनें अतिशय सुशोभित केलेला व नानाप्रकारच्या रत्नांनीं भूषविलेला एक मनोहर रेशमी पडदा त्या खोलीच्या दरवाजाला होता. साईजी व बहादर या दोघांस बाहेर उभे करून, तो बरोबर आलेला शिपाई तो पडदा किंचित् एकीकडे करून खोलींत शिरला, व नंतर थोड्या वेळानें बाहेर आला. त्याच्या बरोबरच सर्व खोजांचा मुख्य जो मश्रूर तोही बाहेर आला व त्यानें संशयित दृष्टीनें व तुच्छता व तिरस्कारदर्शक मुद्रेनें त्या उभयतांकडे पाहिलें. त्याची मुद्रा मोठी क्रूर असून रंग कोळशापेक्षांही काळा होता. अंगांत भरजरी चोगा व डोक्याला एक जरीचा फेटा त्यानें बांधला होता, परंतु त्याचा चेहरा इतका विद्रूप व कुरूप दिसे कीं पहाणाऱ्याला त्याच्याविषयीं अत्यंत तिरस्कार उत्पन्न व्हावा. असा तो रूपगुणसंपन्न खोजाचा राजा मश्रूर बायकासारखे हात वांकडे करून व जरा मुरडल्यासारखें करून साईजीस उद्देशून म्हणाला, 'कायरे ए बुढ्या, माझें नाव सांगून तूं येथे आलास काय ? माझें नांव सांगून आलास आँ ! माझें नाव सांगून आँ ? आणि माझ्या नावावर तुला पहारे-वाल्यांनीं येथपर्यंत सोडला आँ ? ओ हो रे मी ! जसा मी मोठा तसें माझें नांवही मोठें ! नुसऱ्या माझ्या नावावर वाटेल त्या भिकारड्याला खुद्द बेगमसाहे-बांच्या महालांत यावयाला परवानगी मिळते !' 'ओ हो हो' असें म्हणून हंसत हंसत त्यानें त्या त्रिवर्गाकडे जरा आढ्यतेनें व गर्वानें पाहिलें. तो वाटाड्या शिपाई तीनदा लवून सलाम करून आपणासही आनंद झाला असें बाह्यात्कारी दर्शवून निघाला तो त्याच्या दृष्टीआड होताच तुच्छतादर्शक मुद्रेनें त्याजकडे पाहून चालता झाला. तो गेल्यानंतर मश्रूरानें पुन्हां एकदां क्रूर मुद्रेनें त्या उभय-तांकडे पाहिलें व म्हणतो 'कायरे ए भिकारड्यांनो, खुद्द मला त्रास देण्याइतकें तुमचें असें कोणचें काम अडलें आहे ?'

हें बोलणें ऐकून व विशेषतः ती क्रूर दृष्टि पाहून बहादर किंचित् घाब-रल्यासारखा झाला, पण साईजीस त्याचें कांहींच वाटलें नाहीं. उलट तेच किंचित् हंसत मुद्रेनें म्हणाले, "कोणचेंच नाहीं महाराज. आपणांस त्रास देण्याची आमची काय हिंमत आहे ? बेगमसाहेब शमसुन्निहार यांच्याशीं आमचें काम आहे म्हणून आम्ही आलों आहों." "बेगमसाहेबांशीं भिकारड्याचें काम ?"

मश्रूर तिरस्कारानें व रागानें त्यांजकडे पाहून म्हणतो, "तुझें बेगमसाहिबांशीं काम? कुठला मशीदींतला फकीर नाहीं तर साई असलेला दिसतो आहेस. बोल; कोण आहेस तूं? काहीं तरी लांबलचक आशीर्वाद देण्याला आला असशील. गांवोगांवच्या भिकारड्यांनीं मोहरमच्या निमित्तानें दिल्लींत येऊन अगदीं धुमाकूळ मांडला आहे!"

"आपला तर्क खरा आहे महाराज. फत्तेपूरच्या मशीदींतला मी साई असून खुद्द बेगमसाहिबांशींच माझें काम आहे."

"काय काम आहे?" मश्रूर संतापानें ओरडून म्हणाला, "बेगमसाहिबांपाशीं तुझें काय काम असणार?"

"आहे खरें महाराज, आणि तें असें आहे कीं फक्त बेगमसाहिबांपाशींच सांगितलें पाहिजे. दुसऱ्या कोणासही तें मला सांगतां येण्यासारखें नाहीं."

मश्रूराचें तें खापरखुंटीसारखें काळें तोंड, रागानें आतां जास्तच भयानक दिसूं लागलें. रागानें मुठी आवळून तो साईजींस मारण्याकरितां म्हणून धावून आला व म्हणतो, "म्हातारड्या, थेरड्या, बुड्ढ्या, माझ्यापासून चोरून ठेवण्यासारखें-असें तुझें काय काम आहे? माझ्यापाशीं न सांगण्यासारखें बेगमसाहिबांचें काम? बोल, बोल, ताबडतोब बोल. न बोललास तर आतांच्या आतां तुझे राई राई-एवढे तुकडे करून टाकतो. मग खुशाल बेगमसाहिबांच्या कानांत आपला निरोप सांगत बैस."

साईजींनींही मग फारसें ओढून धरलें नाहीं. तो बोलल्याप्रमाणें करण्यास क्षणभरही चुकणार नाहीं हें त्यांच्या लक्ष्यांत येऊन चुकलें व ते म्हणाले, "ऐका तर. हा माझ्याबरोबर आणलेला मुलगा बहादर, बेगम शमसल्‌निहार यांच्या पोटचा असून त्या मजजवळ यास दहा वर्षांपूर्वीं ठेवून गेल्या होत्या, तो आज त्यांच्या हवालीं करण्यासाठीं मी येथें आलों आहें."

मश्रूरानें अत्यंत साशंक मुद्रेनें साईजींकडे पाहिलें. तो बोलतो आहे हें खरें कीं खोटें याचा त्यास विचार पडला असावा असें दिसलें. तें पाहून आपल्या बंडीच्या खिशांतून एक कागदाचा तुकडा काढला व साईजीनें मश्रूरापुढें तो केला व म्हणतात, "आपणास मी म्हणतों हें खरें वाटत नसल्यास हा कागद वाचून पाहा."

कागदावरून दृष्टि फिरवून मश्रूरानें बहादुरास नीट न्याहळून पाहिलें. शमसल्‌निहारच्या सौंदर्याचें प्रतिबिंबच तिच्या मुलामध्यें उतरलें होतें. जसा तिचा चेहरा दिसत असे, तसाच याचाही चेहरा दिसत होता. हें पाहून या आपल्या माहितीचा आपल्या फायद्याच्या कामीं कसा उपयोग करून घ्यावा याचा तो

विचार करूं लागला. कांहीं विचार ठरल्यावर तो मोठ्यानें म्हणतो, " म्हातान्या, खरेंच सांग, दोघांचा चेहरा सारखा दिसतो एवढ्यावरच बेगमसाहेबास फसविण्याकरितांच तूं आलास ना ? "

" छे छे, बिलकूल नाहीं; मी म्हणतों यांतलें जर एखादें अक्षरही खोटें असेल तर कोणची वाटेल ती शिक्षा मी भोगीन. अथवा इतके कशाला ? खुद्द बेगमसाहेबांसच विचारलें म्हणजे झालें. "

सांईजीची मुद्रा, बोलण्याची तऱ्हा, बहादराचा मोहक तोंडवळा व त्या कागदांत लिहिलेला मजकूर या सर्वांचा मथूराचे मनावर परिणाम होऊन सांईजीनीं सांगितलेली गोष्ट खरी आहे अशी त्याची खात्री झाली. आणि याचा आपण काय फायदा करून घ्यावयाचा हेंही त्यानें ठरविलें. मग तो सांईजीकडे वळून म्हणतोः—

" कायरे ही गोष्ट कुणाकुणाला ठाऊक आहे ? "

"कुणाला नाहीं महाराज. एक मी कीं माझा भाऊ, याशिवाय या दुनियेत ही गोष्ट कोणालाही ठाऊक नाहीं. "

" अगदीं खरें ? तुझी अगदीं खात्री आहे ? "

" होय महाराज. अगदीं खरें. माझी अगदीं खात्री आहे. "

हें ऐकून पुढें काय करावयाचें हें मथूरानें ठरविलें. राजवाड्यांत ही गोष्ट आपल्या शिवाय कोणास माहिती नसल्यानें, बेगमचें वर्म आपणास ठाऊक असल्यानें बेगमेला आपण म्हणूं तसें कसें वांकवूं व तिचा नक्षा कसा उतरूं याचा त्यानें क्षणमात्र मोठ्या गर्वानें व आढ्यतेनें विचार केला. आतांपर्यंत बादशहाला यांतील अवाक्षरही ठाऊक नाहीं हें त्यास आतां पक्कें कळून चुकलें होतें. त्याच्या कानावर जर आपण ही गोष्ट घातली तर काय परिणाम होतील याचेंही चित्र त्यानें आपल्या अंतःश्चक्षूपुढें रेखाटलें. बादशहाचें बेगमेवरील सर्व प्रीति एकदम उडून जाऊन तो तिला सुळावर देण्यास देखील कमी करावयाचा नाहीं. बेगमेस तर अशी गोष्ट घडून येणें अर्थातच इष्ट नाहीं. ती मला आपल्या विश्वासांत घेण्याचा प्रयत्न करणार, आणि भयानें माझ्या ज्या ज्या कांहीं इच्छा असतील त्या त्या पूर्ण करण्याविषयीं ती झटणारच. अशा स्थितींत मोंगल साम्राज्याचा मुख्य वजीर होणें ही गोष्टही मग मला कांहीं अशक्य नाहीं. हे विचार मनांत येऊन त्याच्या काळ्याकुट्ट तोंडावर आनंदाची किंचित् छटा आल्याचा भास झाला, आणि एकवार हातांतल्या कागदाकडे व एकवार बहादुर व सांईजी यांजकडे न्याहाळून तो म्हणाला, ' थांबा, तुम्ही दोघेंही येथेंच थांबा. मी आतां थोडा जाऊन येतों. ' असें म्हणून त्यांस तेथेंच सोडून तो आल्या वाटेनें चालता झाला.

× × × × ×

( ३ )

थोड्या वेळानें खालीच्या दारावरचा पडदा पुन्हां एकीकडे झाला व मश्रूर खोलींतून बाहेर पडला. तो बाहेर येताच पडदा एकीकडे सारून दार चांगलें उघडलें व त्यामधून एक लावण्यसंपन्न तरुण स्त्री बाहेर आली. तिच्या स्वरूपाला साजेल असाच तिचा पेहराव असून हिरे, माणकें वगैरे रत्नांनीं तिनें आपलें शरीर भूषविलें होतें. तिच्या एकंदर झोंकावरून ती बेगम शमसल्निहारच होय असें बहादर व साईजी या उभयतांनीं तात्काळ ओळखलें. तिच्या स्वरूपांत व तिच्या एकंदर वर्तनांत असा कांहीं विलक्षण फरक पडला होता कीं एखाद्या नवख्याला तिचें पूर्व वृत्त खरें देखील वाटलें नसतें. ती बोलण्याची ऐट, ती चालण्याची ऐट, ती हुकमत करण्याची तऱ्हा, ती वर्चस्व बसविण्याची हातोटी, ती डौलानें राहावयाची चाल, वगैरे तिला इतकें कांहीं साधून गेलें होतें कीं, ज्याच्या त्याच्यापुढें दीन मुद्रेनें तोंड वेंगाडणारी, हात पसरणारी, कोणी निराश्रित भिकारीण ही पूर्वीं कधीं असेल अशी स्वप्नातसुद्धा कोणाला शंका आली नसती. भिकारपणाच्या संवयी तिच्या केव्हांच नाहींशा झाल्या होत्या, आणि अत्यंत थोर कुळांतल्या राजस्त्रीनें जसें वर्तन करावें तसेंच हुबेहूब तिचेंही वर्तन होतें.

खोलींतून बाहेर येतांच तिनें साईजी व बहादर यांजकडे एकदां साशंक मुद्रेनें पाहिलें व नंतर बहादराचा हात धरून तिनें त्यास एकदा नीट न्याहाळून पाहिलें. तिच्या साशंक मुद्रेवर प्रेमाचें व आनंदाचें हास्य विलसूं लागलें. पुत्रप्रेमाचा अनिवार्य मोह तिला उत्पन्न झाला. आपल्या पुत्राचा तोंडवळा तिनें ओळखला व तिनें अत्यंत स्नेहानें, अत्यंत प्रेमानें, अत्यंत ममतेनें व अत्यंत आनंदानें त्यास आपल्या हृदयाशीं धरलें. बहादरानेंही मोठ्यानें ' आई ' अशी हाक मारली व तिच्या गळ्याला मिठी मारून तो स्फुंदून स्फुंदून रडूं लागला. तिच्याही डोळ्यांतून प्रेमाश्रु वाहूं लागले. परंतु हा प्रकार फार वेळ टिकला नाहीं. आपण येथें कोणत्या स्थितींत आहोंत, व या स्थितींत, बादशहाच्या अंतःपुरांत व मश्रूरासारख्या खोजाच्या देखत हा प्रकार होणें किती भयंकर आहे हें तिच्या ताबडतोब लक्षात आलें. मातृप्रेमाचा तिच्या हृदयांत झालेला संचार पार नाहींसा झाला व मोंगल साम्राज्याच्या महाराज्ञीच्या कर्तव्याचा पगडा तिच्यावर बसला. तिनें बहादरास आपणापासून लागलींच दूर लोटलें व मोठ्यानें टाळी वाजविली. त्याबरोबर दोन मुके खोजे तेथें आले व त्यांनीं बेगमेस अत्यंत नम्रपणानें कुर्नि-



बहादुरानेंही मोठ्यानें 'आई' अशी हांक मारली व तिच्या
गळ्याला मिठी मारून तो स्फुंदून स्फुंदून रडूं लागला.

सात केला, व बेगमेनें ' या दोघांस घेऊन जा ' अशी खूण करितांच त्यांनीं बहादर व सांईजी या उभयतांस तेथून दुसरीकडे नेलें.

बेगमेच्या डोळ्यांतून अश्रु गळत होते ते कसेबसे पुसून ती खिन्नवदन अशी कोंचावर बसली. मश्रूर हा तेथेंच उभा राहून आपल्या तीक्ष्ण दृष्टीनें तिजकडे पाहात होता. त्याला पाहून तिला या वेळीं अगदीं चोरट्यासारखें झालें आणि ती म्हणाली, " मश्रूरा, या वेळीं मी तुझ्या ताब्यांत आहें. सुलतानाला आतां घडलेली ही गोष्ट तूं कळविणार नाहींस ना ? तूं काय मागशील तें मी तुला देईन, मग तर झालें ना ? "

" बेगमसाहेब– " मश्रूर आपलें वक्रतुंड किंचित् हंसरें करून म्हणतो, " हें काय आपण म्हणतां ! आपला मी दासानुदास आहें. आपल्या इच्छेविरुद्ध वागण्याचें मज गरिबाचें काय सामर्थ्य आहे ! शहानशहांना या गोष्टीचा मागमूसही लागूं नये अशी जर आपली इच्छा आहे, तर या दासाच्या हातून आपल्या मर्जीविरुद्ध वागणें कदापिही घडणें शक्य नाहीं. "

" बरें, मग त्या दोघांची काय व्यवस्था करावयाची ? "

" मला एक युक्ति सुचते आहे बेगमसाहेब. आपली आज्ञा असल्यास सांगतों. "

बेगमेनें आपली संमति दर्शवितांच मश्रूरानें जमिनीकडे बोट केलें. महालाच्या खालीं जमिनींत एक मोठें व भयंकर भुयार असून त्यांत राजवाड्यांत व जनानखान्यांत नको असणाऱ्या दुर्दैवी प्राण्यांना सोडून देण्यांत येत असे. त्या विस्तीर्ण भुयारांत अथवा खरें म्हटलें तर भूलोकच्या त्या यमपुरींत मोटमोठे रस्ते, खोल्या व कैदखाने असून सूर्याच्या किरणाचा तेथें कदापिही प्रवेश होत नव्हता. हातांत पाजळलेल्या मशाली घेऊन जनानखान्यांतले मुके खोजे एकाद्या दुर्दैवी प्राण्याला तेथें घेऊन जात व एखाद्या कोठडींत अगर विहिरींत त्यास लोटून देत असत. अशा भयानक व अंगावर कांटा उभारण्यासारख्या गोष्टी फक्त त्याच वेळीं घडत होत्या असें नाहीं. पृथ्वीवरील सर्व देशांत कमीअधिक प्रमाणानें ह्या गोष्टी घडत आल्या आहेत. रोमन साम्राज्याच्या उतरत्या काळाच्या इतिहासांत, मिसर देशाच्या इतिहासांत, इराणच्या इतिहासात व हिंदुस्थानांत स्थापन झालेल्या मुसलमानी साम्राज्याच्या इतिहासांत वरील तऱ्हेचीं शेंकडों उदाहरणें वाचावयास मिळतात. व्यसनी, मदांध, दुराचारी व पापासक्त अशा सुलतानांनीं व बेगमांनीं आपला व्यापार मनसोक्त चालावा या हेतूनेंच हीं भुयारें बांधलेलीं असतात. अशाच प्रकारचें एक भुयार नूरमहाल व नूरबाग तयार करविले त्या वेळीं जहांगीर व नूरजहान यांनीं बांधविलें व त्याकडेच या वेळीं मश्रूर आपला अंगुलिनिर्देश करीत होता.

मश्रुराचा बेत ऐकून बेगमेचें अंत:करण करपल्यासारखें झालें. आपल्या पोटच्या गोळ्याची—आपल्याच रक्तमांसापासून उत्पन्न झालेल्या त्या कोवळ्या मुलाची—भुयारांत लोटल्यास काय स्थिति होईल हें तिच्या मनांत येऊन एकादा विजेचा धक्का बसल्याप्रमाणें तिला झालें. पण सुलतानापासून ही गोष्ट गुप्त राखण्यास दुसरा काय उपाय होता ? सुलतान विचारी, मनमिळाऊ व प्रेमळ खरा, पण आपला हा असा संबंध आहे असें समजल्यावर देखील तो शांतवृत्तीचा कसा राहील ? त्याच्याच कृपेनें रजाच्या स्थितीपासून गजाच्या स्थितीला आपण आलों, त्याच्याच हुकुमानें प्रत्यक्ष राज्ञीपदाचें सुख आपण भोगीत आहों, त्याला आपली ही गुप्त गोष्ट कळली तर काय परिणाम होईल ? भर दिल्ली शहरात जेथें आपलें नख दिसणें देखील अशक्य, तेथें सर्व लहानथोर लोकांसमक्ष विटंबना करून सुलतान आपल्यास दुराचारिणी म्हणून तोफेच्या तोंडी किंवा सुळावर देईल तर काय होईल, असें तिच्या मनांत आलें. त्याच्या मनांत आल्यास अशी गोष्ट घडून येणें किती स्वल्प आहे हेंही तिनें जाणलें. एखाद्या महाप्रचंड डोंगराच्या कड्यावर उभें राहिल्यासारखी तिची स्थिति झालेली होती. एकीकडे आशेचें, मोठेपणाचें, व ऐश्वर्याचें उंच शिखर दिसत असून दुसरीकडे पाहिले असतां डोळे फिरून जातील अशी महाभयंकर, व विटंबना, छळ व त्रास यांनीं भरलेली अशी खोल दरी तिला दिसत होती. संसाराचा झंझावात सुटला होता व वेळ अशी आणीबाणीची होती कीं सुखाच्या आशेनें, मोठेपणाच्या आशेनें, ऐश्वर्याच्या आशेनें शिखराकडे तरी वळावें, नाहींपेक्षां त्या महाप्रचंड व अक्राळविक्राळ दिसणाऱ्या खोल दरींत तरी पडावें ! मुलाला भुयारांत लोटून देऊन जिकडेतिकडे सामसूम तरी करावें, किंवा सुलतानाला ही गोष्ट कळतांच कोल्ह्याकुत्र्यांकडून खावविलें तरी जावें. एकीकडे अमर्याद सौख्य, दुसरीकडे अमर्याद दुःख अशा स्थितींत तिनें काय ठरविलें असेल ? मुलाला भुयारांत लोटून देण्याच्या ऐवजीं आपल्याला अत्यंत दुःख सहन करावें लागलें तरी, अनंत यातना भोगाव्या लागल्या तरी, अमर्याद विटंबना झाली तरी बेहेत्तर असें तिनें ठरविलें असेल काय ? परंतु इतक्या कल्पनातीत व दुर्लभ सुखाला सोडून दुःखाला मिठी मारण्याइतकी ती थोडीच वेडी होती !

त्या चिंतातुर स्थितींत तिला पाहून मश्रुराला फार आनंद झाला, किंबहुना आपला भाग्योदय व्हावयाच्या शकुनास सुरवात झाली असेंच त्यास वाटलें. परंतु आपला आनंद वरकरणी न दाखवितां तो म्हणाला, ' बेगमसाहेब, हा

आपला नम्र सेवक हजर असतां आपण चिंता कां करतां? त्यांची विल्हेवाट लावण्याचें काम आपण मजकडे सोंपवा व आपण अगदीं निर्धास्त रहा."

"मग काय भुयारांत लोटून देण्याशिवाय दुसरा उपायच नाहीं काय?"

"मला दुसरा उपायच दिसत नाहीं बेगमसाहेब. यांना जर आतां मोकळें सोडून दिलें तर कधीं ना कधीं शहानशहाच्या कानावर ही गोष्ट गेल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु ठार मारण्याला अथवा भुयारात लोटावयाला आपली मर्जी नसेल तर आणखीं एक उपाय मला सुचतो आहे."

बेगमेनें उत्कंठेनें त्याजकडे पाहिलें. तो म्हणाला:—

"शहानशहा सुलतान अलमगीर बादशहांनी शिवाजीच्या पोराला-संभाजीला अशी शिक्षा केली तशी करावी म्हणजे मग ते असले काय आणि नसले काय आपल्याला सारखेंच!"

उष्णतेनें तावड्या लाल झालेल्या त्या लोखंडाच्या कांबी आपल्याच डोळ्यात शिरत आहेत की काय असा तिला भास होऊन भीतीनें तिच्या अंगास कंप सुटला. अशा रीतीनें हालहाल होऊन मरण्यापेक्षा भुयारात पडून मेलेलें फार बरें, असें तिला वाटलें. पण पोटच्या गोळ्याला मारून टाक असे तिच्यानें म्हणवेना. तिला काय करावें हे सुचेना. एकीकडे नवीन उत्पन्न झालेला हा मायापाश तिला ओढीत होता व दुसरीकडे त्याचे भावी परिणाम तिला ओढीत होते. एकादी रस्त्यावरील भिकारीण काफर लोकाच्या जातीची स्त्री—एकदम बडी बेगम झाल्याबद्दल जनानखान्यांतल्या सुलतानाच्या सर्व स्त्रिया व उपस्त्रिया तिच्यावर दातओंठ खाऊन होत्याच. औरंगजेबाची महादुष्ट बहीण जी गुलनार बेगम, तिला शमसलनिहारबद्दल फारच वैषम्य वाटत होतें. किंबहुना रजपुतांच्या उच्चनीच स्त्रियांचें मोंगल सुलतानास वेडच लागलें आहे असें तिला वाटे. हुमायून, अकबर, जहांगीर, औरंगजेब व मुअज्जीम ऊर्फ बहादुरशा या सर्वांस कमीअधिक प्रमाणानें कसें वेड लागलें होतें याचें ती मोठ्या त्वेषानें सर्वांजवळ वर्णन करी. रजपूत स्त्रियाबद्दल तिच्या मनांत द्वेष उत्पन्न होण्यास औरंगजेबाची उपस्त्री उदेपुरी ही कारणीभूत होय. ती गुलनार बेगम, तिच्या कानीं आपली वार्ता जातांच ती आकाशपाताळ एक करून सोडील, सगळ्या बेगमा अर्थातच तिच्या पक्षाला मिळतील व मग मी या जगात काय करूं, असें तिला वाटले. यापेक्षा हा मुलगा व त्याजबरोबरचा तो म्हातारा हे या जगातून नाहींसे झाले तरी हरकत नाहीं असें तिला वाटलें व तिनें दगडासारखें मन घट्ट करून, डोळ्यांमधून गळत असलेले अश्रू पुसून टाकून त्यांस भुयारांत लोटून देण्यास अनुमति दिली!"

" आपली दूरदृष्टि काय वर्णावी बेगमसाहेब ! आंधळें करून त्यांस सोडून देण्यापेक्षां भुयारांतच त्यांचा अंत केलेला आपल्यास जास्त फायदेशीर आहे. कारण पुढेंमागें, भानगड होण्याचाही मग संभव नाहीं. " असें म्हणून तो घातकी व क्रूर मश्रूर पडल्या फळाची ही आज्ञा मिळतांच आनंदानें तेथून चट-कन चालता झाला !

तो दृष्टीआड होतांच बेगमेस अमर्याद दुःख होऊन आपल्या सुखाकरितां निरपराध्याचा—प्रत्यक्ष पोटच्या गोळ्याचाही—कसा आपण जीव घेत आहोत असें वाटून तिनें अत्यंत शोक केला.

अनायासें प्राप्त झालेलें हें कृत्य आपण पार पाडल्यावर, व फत्तेपुरास या गोष्टीविषयीं माहिती असलेला तो साईजीचा भाऊ, त्याचा निकाल लावल्यावर या जगांत मी व बेगम यांशिवाय ही गोष्ट कोणास ठाऊक असणें संभवनीयच नाहीं. अर्थात वेळोवेळीं त्या मानीं इमसल्लीनिहारनी अब्रू चव्हाट्यावर आण-ण्याची धमकी देऊन आपलीं इष्टकार्यें आपल्यास विर्ती अनायासें साध्य करितां येतील या आनंददायक विचारांत मग्न झालेला मश्रूर बेगमेकडून निघाला, तो बहादर व साईजी यास ते मुके खोजे जेथें घेऊन गेले होते तेथें जाऊन दाखल झाला. उंदरास पाहून जसा मांजरास आनंद व्हावा, खोकडास पाहून जसा लांडग्यास आनंद व्हावा, एखादें प्रेत पाहून जसा तरसास आनंद व्हावा, त्याच प्रकारचा आनंद, बहादुर व साईजी यांस पाहून मश्रूरास झाला. उंदरास धरल्या-वर त्यास तोंडांत टाकावयाचें हें तर ठरलेलेंच असतें, पण त्याचे हालहाल करून मारण्यातच मांजरास फार आनंद होतो. बहादुर व साईजी यास भुयारांत नेऊन ठार मारावयाचें हें तर त्यानें ठरविलेंच होतें, पण अगोदर तोंडसुख घेऊन नंतर तसें करावयाचें अशीच त्याची लहर लागली, आणि त्या उभयतांस त्यानें शिव्यांची लाखोलीच वाहिली. नंतर शिव्या देऊन देऊन त्याचेंच तोंड दुखूं लागल्यावर त्यानें त्याजवळ उभे असलेल्या मुक्या खोजांस कांहीं खूण केली. त्यासरशीं ते दोघेही तेथून चालते झाले व कांहीं वेळानें आणखी दोघां मुक्या खोजांस घेऊन आले. परत येते वेळीं त्या सर्वांच्याही हातांत मोठमोठे पलिते होते. ते येतांच बहादर व साईजी यांजकडे एकवार क्रूर दृष्टीनें पाहून मश्रूरानें त्यांस भुयाराकडे घेऊन चलण्याविषयीं त्या खोजांस खुणाविलें. खोजांनींही लागलींच त्या दोघांस पकडून भुयाराच्या रस्त्याकडे चालविलें.

नूरमहालाच्या मागच्या बाजूच्या एका लहानशा खोलीतून भुयारांत उतर-ण्याचा एक रस्ता होता. त्या रस्त्यानें सुमारें पन्नास पायऱ्या खालीं अंधेरांत उतरून

गेलें म्हणजे वांकड्यातिकड्या वळणाचे असे बरेचसे बोळ लागत. त्यांतून पुढें गेलें म्हणजे भलें थोरलें कुलूप अडकविलेला एक खूप भक्कम असा लोखंडी दरवाजा लागे. त्या दरवाजाला नेहमी कुलूप लाविलेले असे व त्याची किल्ली जनानखान्यांतील मुख्य खोजाकडे असे. मश्रूराने तेथपर्यंत जातांच आपल्या हातानें त्या दरवाजाचें कुलूप काढलें, आणि नंतर ते सर्वजण आंत शिरले. आंत शिरतांच प्रेतें कुजल्याची अशी विलक्षण घाण येऊं लागली की बहादर मध्येंच थबकला व नंतर मागें परत जाण्याचा यत्न करूं लागला. पण मश्रूर त्यास कसचा जाऊं देतो ! त्याने त्यास पुन्हा पुढें ढकलून असा एक जोराचा गुद्दा लगावला की बहादराने एक मोठी किंकाळी फोडली व तो धाडकन रस्त्यावर पडला !

परंतु त्या नरपशूस त्याचे काय होय ? बकरें कापणाऱ्या कसायास देखील त्याची अंतकाळची किंकाळी ऐकून द्रव येण्याचा संभव असेल, मांगाला देखील फासावर चढलेल्या कैद्याची दोरी ओढते वेळी काहीं दया उत्पन्न होत असेल, पण जनानखान्यातले हे खोजे म्हणजे मूर्तिमंत राक्षसच होत. लोकांचा प्राण क्रूरपणानें घ्यावयाचे जणूं काय त्यास बाळकडूच मिळालेले असते. याच्या पोटीं दया नाहीं, माया नाहीं, वात्सल्य नाहीं, याना कोणी स्नेही नाही, हे कोणाचे स्नेही नाहीत. भिंतीत चिणणें, विहिरीत ढकलणें, शिरच्छेद करणें, वगैरे याचा तळहाताचाच मळ ! मश्रूराने बहादरास रट्टा देऊन धरून उभें केलें व आपणापुढे ढकलीत नेलें. मशालीच्या त्या अंधुक उजेडांत एक उदासवाणी व भयंकर अशी मोठी जागा दिसत असून भिंतीला चोहोंकडे ओल व बुरा आलेला दिसत होता. जमिनीवर १०–१० हातांवर एक एक खुंटा रोवलेला असून त्यांपैकीं कित्येकास साखळदंडांनीं जखडून बांधलेले कित्येक दुर्दैवी पुरुष दिसत होते. कित्येकाचे प्राण गेले होते व कित्येक कण्हत कुंथत मृत्यु केव्हा येतो अशी वाट पहात पडले होते. कित्येक प्रेतें कुजून त्यांची घाण सर्व जागेवर पसरली होती. त्या जागेतून थोडे पलीकडे गेल्यावर एक खूप खोल विहीर होती तिकडे मश्रूर त्या दोघांस घेऊन गेला. पुन्हा ज्यांचा केव्हांही मागमूस देखील लागूं नये असे जे कोणी दुर्दैवी प्राणी असतील त्यांची या विहिरींत रवानगी करून देण्यांत येई ! विहिरीच्या तोंडावर एक मोठी व जाड लांकडाची फळी घातली होती. मश्रूरानें एका खोजास विहिरीवरील झांकण काढून टाकण्यास खूण केली. झांकण काढलेलें पहातांच भयानें घाबरा झालेला तो बहादर मोठ्यानें ओरडला व सांईजीच्या कमरेला मिठी मारून ‘ मला वाचवा ’ असें म्हणून रडूं लागला. त्या वेळचा तो देखावा जितका भयंकर तितकाच हृदयद्रावक होता. ती केविलवाणी

मुद्रा पाहून आतांपर्यंत मौन धारण केलेल्या त्या साईजींची मुद्रा संतापानें तांबडी लाल झाली. पुत्राप्रमाणें पालन केलेल्या त्या निरुपद्रवी बहादराला आतां अचानक त्या खोल विहिरींत पडून प्राणास मुकावें लागणार हें पाहून त्यांचें हृदय शतशः विदीर्ण झालें. पण त्याच्या रागाला तेथें कोण जुमानणार होतें ? आपला राग कसाबसा आंवरून ते मश्रूरास म्हणाले, ' महाराज, मी आतां मरणार हें तर उघडच आहे. माझें आतां वय झालें आहे तेव्हां मी आज मेलों काय अगर उद्यां मेलों काय सारखाच. पण या गरीब मुलाचा तुम्ही कां जीव घेतां ? तो दिल्लीस आला हा अपराध त्याचा नाहीं. अपराध असलाच तर तो माझा व माझ्या भावाचा आहे. आणि तेवढ्याकरितां मरणाची ही शिक्षा भोगावयाला मी तयार आहें. पण या गरीब बिचाऱ्यानें काय केलें ? याकरितां महाराज, कृपा करून याला तरी जीवदान द्या, ' असें म्हणून साईजींनी मश्रूराचे पाय धरले व त्याची पुनःपुन्हा ते काकुळतीनें विनवणी करूं लागले. बहादरही एकदां विहिरीकडे व एकदां त्या काळस्वरूपी मश्रूर व खोजाकडे पाहून रडत होता.

पण मश्रूरानें साईजींच्या विनंतीकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं; त्यानें त्यांना पायानेंच एकीकडे लोटलें, आणि आपण एकटाच विहिरीकडे जाऊन त्यानें विहिरीचा ठाव पाहण्यासाठीं म्हणून जवळच पडलेला एक विटेचा टोला उचलून आंत टाकला. तो आंतील खडकाळ भिंतीना हापटत हापटत कांहीं वेळानें खूप खोल तळाशीं असणाऱ्या पाण्यांत पडून त्याचा ' डुब् ' असा आवाज झाला, त्यावरून पाणी फारच खोल असावें असें दिसलें. नंतर तो विहिरीपासून किंचित् मागें सरकला व त्यानें त्या मुक्या खोजांस बहादरास उचलून विहिरींत झुगारून देण्याविषयीं खूण केली. त्यांना काय ! हुकूम मिळतांच त्यांनीं आपआपल्या मशाली भिंतीशीं टेकून ठेविल्या आणि बहादर होता तेथें जाऊन चौघांनीं त्याचे हात व पाय धरून त्यास उचलला. त्या वेळीं बहादरानें केलेली धडपड व फोडलेली किंकाळी इतकी भयंकर व मोठी होती कीं त्यामुळें मागें बेगम शमसलनिहार येऊन केव्हां उभी राहिली हें कोणाच्या समजण्यातही आलें नाहीं !

ती भयंकर किंकाळी संपते तोंच शमसलनिहार जोरानें ओरडून म्हणाली, खबरदार खोजांनो; त्यास सोडा, आणि एकीकडे व्हा, बाळा बहादरा, ये असा, तूं अगदीं भिऊं नको. मी तुझी आई येथें आतां असतांना तुझ्या आंगाला बोट लावावयाची कोणाची ताकद आहे ? ' असें म्हणत म्हणतच तिनें बहादरास घट्ट मिठी मारिली आणि अश्रूंनीं त्याला भिजवून टाकलें.

परंतु हें अकल्पित विघ्न आलेलें पाहून मश्रूराच्या अंगाची आग झाली. आपल्या हातून ही शिकार जाणार कीं काय याची त्याला क्षणमात्र शंका

आली, आणि तो बेगमेस म्हणाला, " बेगमसाहेब, अशा रीतीनें यांना ठार मारूं नये असें जर आपणांस वाटत असेल तर तसें स्पष्टपणें सांगा म्हणजे यांचे डोळे तापलेल्या सांडसानें तरी भाजून टाकतों. "

बेगम संतापानें कांपूं लागली, आणि तिनें त्या मुख्या खोजाकडून मश्रूरास साखळदंडांनीं जखडून एका खुंट्यास बांधून टाकविलें. नंतर ती म्हणाली, " साईजी, माझी ही गुह्य गोष्ट आपण आणखी कोणाजवळ बोललां आहांत ? तुम्ही वृद्ध आहात, आणि तुम्हींच बहादरास लहानाचा मोठा केला आहे, तेव्हां मजजवळ तुम्ही खोटें बोलणार नाहीं असें मला वाटतें. "

" बेगमसाहेब, मी प्रत्यक्ष पैगंबराची देखील शपथ घेऊन सांगतों कीं माझ्या भावाखेरीज ही गोष्ट कोणासही ठाऊक नाहीं. "

" तर मग साईजी, आजपर्यंत जशी ही गोष्ट गुप्त राखलीत तशीच यापुढेंही राखा अशी तुम्हाला माझी विनंती आहे. आणि बाळा बहादरा, तूंही या गोष्टीची वाच्यता कधींही करूं नको. कारण त्यापासून तुझा कांहींच फायदा नसून माझें मात्र भयंकर नुकसान होणारें आहे. "

" आई, मीहि शपथ वाहून सांगतों कीं, माझ्या तोंडून ही गोष्ट कधींहि निघावयाची नाहीं. "

" ठीक आहे तर मग " बेगम साईजींस उद्देशून म्हणाली, " या तुमच्या उपकाराबद्दल तुम्हाला व तुमच्या भावाला चांगलें इनाम देण्याची मी व्यवस्था करीन. मी पुढें सांगून पाठवीपर्यंत बहादरासही तुम्ही आपल्याबरोबर फत्तेपुरास घेऊन जा. पण संभाळा हां, कोणत्याही रीतीनें माझा विश्वासघात करून ही गुप्त गोष्ट फोडलीत असा जर सुगावा लागला, तर तुमच्या घरादारावर गाढवांचे नांगर फिरवून तुमचे राईराईएवढे तुकडे करण्यास मला क्षणभर देखील लागावयाचा नाहीं. "

" बेगमसाहेब–" साईजी हात जोडून म्हणाले, ' मी, माझा भाऊ व बहादर या सर्वांची जबाबदारी मी आपल्यावर घेतों, पण दुसऱ्याच्याबद्दल मी काय तजवीज करूं ? हे खोजे व हा मुख्य खोजा—"

" त्यांच्याबद्दलची काळजी तुम्ही करूं नका. हे चार खोजे मुके आहेत तेव्हां त्यांच्यापासून बातमी दुसऱ्यांस कळण्याची धास्ती बाळगावयासच नको. आतां राहतां राहिलेला हा मश्रूर, याची विल्हेवाट लावलेली तुम्हीं आपल्या डोळ्यांनीच पहा म्हणजे झालें. "

इतकें बोलून त्या चार मुक्या खोजांस, मश्रूरास उचलून त्या विहिरींत झुगारून देण्याची तिनें खूण केली. तेही जणूं काय हा हुकूम केव्हां मिळतो याची

वाटच पाहात होते. रानांतल्या हरिणाची शिकार करण्यासाठी जसे शिकारी कुत्रे धांवतात तसे ते बेगमेचा संकेत होताच मश्रूरावर धांवून गेले.

" बेगमसाहेब, बेगमसाहेब " आपली होणारी स्थिति पाहून मश्रूर घाबऱ्या घाबऱ्या म्हणाला, " अहो म्यां गरिबानें काय केलें ? माझे अपराध क्षमा करा बेगमासाहेब, मला जीवदान द्या बेगमसाहेब. "

बेगम त्वेषानें त्यास म्हणाली, " तूं काय केलें आहेस असें विचारतोस ? अरे, तूं काय केलें नाहींस ? माझाच प्राण घ्यावयास तूं उद्युक्त झालास, माझ्या मुलाला ठार मारावयास निघालास, माझ्या गुप्त गोष्टीचा फायदा घेऊन माझा नाश करावयाचा तुझा बेत होता, हें मला कळलें नाहीं असें का तुला वाटलें ? अरे, तुझें कपट मी केव्हांच ओळखलें होतें. आतां भोग आपल्या दुष्कर्मांचीं फळें. हीं येथें मरणाच्या पंथांत पडलेलीं माणसें तुला असा मेलेला पाहून सुखानें प्राण सोडतील. कारण या सर्वांच्या मरणास तूंच कारण झाला आहेस. "

इतकें म्हणून त्यास विहिरींत ढकलून लोटण्यासाठीं तिनें त्या मुक्या खोजास खूण केली, आणि बहादर व साईजी यास तेथून जाण्यास सांगितलें. बेगम तेथल्या तेथेंच उभी राहिली. बहादर व साईजी यांनीं जातां जातां मागें वळून पाहिलें तों हातपाय अवळून टाकलेला तो मश्रूर सुटण्यासाठीं धडपड करीत असलेला त्यांना दिसला. तो मोठमोठ्यानें ओरडून बेगमेची प्रार्थना करीत होता, पण त्या गडबडींत, त्याच्या ओरडण्याकडे बिलकूल लक्ष न देतां त्या खोजांनीं त्याला मोठ्या कष्टानें उचलून विहिरीच्या भिंतीवर ठेविला आणि पुन्हा एक जोराचा धक्का देऊन त्या खोल विहिरींत त्याला ढकलून दिलें !

× × × × ×

सुलतान मुअज्जाम उर्फ बहादरशहा आणि बेगम शमसलुन्निहार यांनीं दिल्लीच्या साम्राज्याचा पांचच वर्षें ( १७०७–१७१२ इसवी ) उपभोग घेतला. सुलतान निपुत्रिक व वृद्ध होता म्हणून बेगम शमसलुन्निहार हिच्या सल्ल्यानें व इच्छेनें, त्यानें फत्तेपूर येथील कोणी साईजी होता त्यानें पाळलेल्या बहादर नांवाच्या पोरक्या मुलास दत्तक घेऊन त्याचें नांव जहांदरशहा असें ठेविलें आणि मरतेसमयीं त्यास गादी दिली. जहांदरशहा ( इ. स. १७१२ ) हा गादीवर बसल्यावर त्यानें आपल्या आईच्या-बेगम शमसलुन्निहारच्या–सल्ल्यानें राज्यकारभार चालविला होता. त्याचा कारभार प्रजाजनांस कदाचित् सुखावह झाला असता, परंतु तो व त्याची आई यांचा राजघराण्यांतल्या कांहीं मंडळींनीं खून केल्यामुळें सर्वच कारभार आटोपला.

# "संशयाचे भोंवऱ्यांत."

( लेखकः—उमारमण, वर्धा. )



कलंस कां, अग ए, मला आता झाला आहे उशीर. मीच काढून ठेवणार होतों, पण सकाळपासून इतर कामांमुळें फुरसद झाली नाही. तर तूंच दुपारीं त्या पेटींतून १० रुपये काढून तो आपला कापडवाला येईल, त्याला दे. ११ ला सारीं १० च मिनिटें राहिलीं आहेत. पैसे काढतांना ते कागद मात्र जसेचे तसे राहूं दे. नाहीं तर इकडेतिकडे होतील बरें. मी जातों. बरोबर ३ ला येईन. कारण आज शुक्रवार आहे. असें म्हणून मुरलीधरपंत तडक टांग्यात बसून निघाले. टांगा दृष्टीच्या आड झाल्यावर त्यांच्या पत्नीही घरांत गेल्या. मुरलीधरपंत हे नागपूरच्या कॉलेजांत संस्कृतचे अध्यापक होते. त्याना २५० रुपये पगार होता. ते स्वभावानें फार प्रेमळ होते. त्यामुळे ते सगळ्याना हवेसे वाटत. स्वतः पैसे मिळवून लग्न करीन असा त्यांचा निश्चय असल्याकारणाने त्याचें लग्न होण्यास उशीर झाला. लग्न होऊन नुकतेंच एक वर्ष झालें होते. त्यांच्या पत्नी चांगल्या सुशिक्षित व धरंदाज घराण्यातल्या होत्या. सत्यभामाबाईंचें वाचन बरेंच होतें, पण त्यामुळें त्यांच्या संशयी स्वभावांत यत्किंचितही बदल झाला नव्हता. दोघेंही सुशिक्षित व प्रौढ असल्यानें त्यांचे दिवस मोठ्या मजेत व आनंदात चालले होते.

दुपारीं जेवण झाल्यावर सत्यभामाबाईंनीं पेटी उघडून वरचे कागद हळूंच एका बाजूला काढून ठेविले व नंतर त्या रुपये मोजूं लागल्या तोंच वाऱ्याचा झोत येऊन कागद सर्व खोलीभर अस्ताव्यस्त उडाले. ते लागलीच त्या उचलूं लागल्या. त्यांत एक सुंदर अक्षरांत लिहिलेलें पत्र त्यांना सांपडलें. पत्र बालबोध लिपींत लिहिलें होतें. सहज सत्यभामाबाई तें वाचूं लागल्या. तोंच त्यांची मुद्रा कावरी-बावरी झाली, चेहरा काळाठिक्कर पडला, डोळ्यांसमोर काजवे चमकूं लागले, अंग थरथर कांपूं लागलें व ओठ स्फुरण पावूं लागले. तो कागद जसाच्या तसा ठेवून त्या निजायच्या खोलींत गेल्या व दाराला कडी लावून बिछान्यावर



सहज सत्यभामाबाई तें वाचूं लागल्या तोंच त्यांची मुद्रा
कावरीबावरी झाली.

पडल्या. एका १० मिनिटांत त्यांची अशी स्थिति झाली तेव्हां त्यांत असें लिहिलें होतें तरी काय, हें समजण्याची इच्छा वाचकांना झाली असेल. पण आपला निरुपाय आहे. कारण तो कागद केव्हांच आपल्या जागीं पेटींत बसला आहे. तेव्हां त्याच्यावरील मजकूर समजणें जवळ जवळ अशक्यच आहे. वाचकांपैकीं कांहींनीं त्या कागदाला विषाची उपमा दिली असेल. पण विषानें मनुष्याचा प्राण जातो. ह्यानें त्यांचा प्राण न जातां प्राणांतिक वेदना मात्र होत आहेत, असें त्याच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत आहे. कोणी म्हणतील कीं, 'तो कागद अग्निसत्त्वाचा केला असेल. कारण पहिल्यानें सुंदर दिसणारी कोमलता त्याचा स्पर्श होतांच काळी ठिक्कर होते, तशीच सत्यभामाबाईची स्थिति झाली.' वाचक हो, त्याला विषपत्रिका म्हणा अगर अग्निसत्त्वाचा तुकडा म्हणा. त्यात कांहीं तरी कमीजास्ती आहे, एवढें खास. आतां त्या आपल्याशींच काय बोलतात हें ऐकूं या म्हणजे त्यात काय लिहिलें ह्याची कल्पना तरी होईल. ऐका, त्या काय म्हणतातः—"मला आत्तांपर्यंत असें वाटत होतें कीं, माझ्यावर तिकडचें म्हणजे अलोट प्रेम आहे. त्यांची ती गोडगोड बोलणीं मला सगळी आठवताहेत. खालीं ठेवलेलें विष झाकण्याकरितां वरती साखर पेरावी त्याप्रमाणें त्यांची ती मानभावी भाषणें. मी कांहीं मागितलें अन् तें मिळालें नाहीं असें कधीं तरी झालें कां! माझ्यावर प्रेम नसते तर असें झालें असतें का? हां, पण समजलें! मला तिकडचा बिल्कूलसुद्धां संशय येऊं नये म्हणूनच हें. हां, अगदीं खरें! मी जरा दिसलें नाहीं कीं शोधशोधून पाहायचें अन् भेटलें म्हणजे म्हणायचें कीं 'तुझ्यावांचून एक क्षणसुद्धां मला करमत नाहीं.' मी कांहीं पदार्थ दाखवायला नेला, मग तो किती का साधा असेना, त्याची स्तुति करकरून पुरें करायचें. हें सगळें ढोंगच का? होय, ढोंग! ढोंगच ह्यात संशय तो कसला! तें पत्र जर आज सांपडलें नसतें तर मी ज्या भ्रमांत होतें तशीच राहिलें असतें. आनंदसागरांत मी जी निर्धास्त पोहत होतें, मत्सररूपी खडक नाहीत असें जें मला वाटत होतें तें सगळें खोटें ठरलें ना. आमच्या प्रेमतारवावर हल्ला करणाऱ्या सुसरी आहेत हें स्पष्ट दिसत आहे. ही पत्रिका-दुर्बीण आज मला लाभली म्हणून बरें झालें. माझ्यासारखी भाग्यवान् मीच असें जें मला वाटत होतें, ती माझी कल्पना तशीच राहिली असती. ज्याला मी "क्षीरसागर" म्हणत होतें तो काळकूटाद्रि आहे असें धडधडीत नजरेस आलें. माझे हवेंतले मनोरे ढासळून पडले. माझ्यासारखी दुर्दैवी कोणी दुसरी असेल कां?

"तनमन लावून रात्रंदिवस सेवा केली, तिकडची आज्ञा शिरसावंद्य मानून त्याप्रमाणें वागत आलें, तिकडचें सुखदुःख तेंच माझें सुखदुःख ही भावना माझ्या हृदयांतून कधीं हलली नाहीं. हें शरीर सर्वस्वी तिकडेच वाहिले असता तिकडचें मन मात्र असें कां? बरें असे असलें तर त्यांत दोष कोणाचा? माझाच ना? मीं जर अगदीं पूर्ण प्रेम केलें असतें, नेहमीं संतुष्ट ठेवले असते, तर काय बिशाद होती, दुसरीकडे पाहिलें तरी असतें का! मला वाटते मी आपल्याकडून कांहीं सुद्धा उणें पडूं दिलें नाहीं. पण असें असतांना प्रणयपत्रे दुसरीकडे! ईश्वरा! खरें प्रेम जगात नाहींच का रे! एकीकडे मला प्रियतमा म्हणायचें अन दुसरीकडे अशीं पत्रें. अक्षर तिकडचेंच आहे ह्यात बिलकूल संशय नाहीं. खालीं सही नाहीं म्हणून काय झालें. ईश्वरा! तुला सत्याचा कैवारी म्हणतात मग मलाच कां उलट झालास. असो, तुझी मर्जी.

"बरें, हें पत्र कोणाला लिहिलें असेल बरें! समजलें त्या बॅरिस्टराच्या कार्टीला, त्या राधेलाच लिहिलें असेल. माझ्याशीं ठरायच्या अगोदर तिच्याशी बहुतेक जमलेंच होतें, पण कायशशा कारणानें मोडलें. त्या चाडाळणीला लिहिले असेल. हां, संशय काय उरला! मग आतां त्या दोघाच्या सुखाआड आपण का या? कोणीकडून का होईना तिकडे सुख लागो म्हणजे झालें. आपण होऊनच दूर व्हावे हें चांगलें. बरें जायचें तरी कुठें! हें काळें तोंड दाखवावयाचे तरी कोणाला! एकदम जगांतून नाहींसें व्हावें हें चागलें. एका झटक्यात काम. झिजून झिजून मरण्यापेक्षां हें कितीतरी बरें. ठरला निश्चय, आता तिकडे जायचे नाहीं कीं, पाहायचें नाहीं. न जाणो तिकडच्या गोडगोड मोहक वाणीनें माझा बेत फिरायचा. पोट फार दुखत असल्याची बतावणी करावी अन जाऊं नये व आज उद्या रात्रीं जलदेवतेस हा देह समर्पण करावा." होता होता २॥ केव्हा वाजले तें समजलें नाहीं. " ३ वाजता येईन म्हणून सागायचें झाले. तर आता इथून उठून दुसरीकडे वरती माडीवर जाऊन निजावे" असें म्हणून सत्यभामाबाई उठून गेल्या.

३ वाजतां प्रोफेसरसाहेब परत आले. नेहमींप्रमाणें म्हटले म्हणजे प्रोफेसरांच्या वाटेकडे त्यांच्या पत्नीचे डोळे लागलेले असावयाचे व घरात पाऊल टाकतात न टाकतात तोंच सुहास्य वदनानें हातांत चहाचा पेला द्यायचा व मग गोष्टी व्हावयाच्या. प्रोफेसरसाहेबांनीं कॉलेजांत घडलेली एकादी गोष्ट किंवा कोटी सांगावी तर ह्यांनीं जवळपासची किंवा वर्तमानपत्रांतील एकादी बातमी सांगावी. पण

आजचा प्रकार तसा नव्हता. आल्याबरोबर कपडे व पुस्तकें खोलीत ठेवून दुसरा पोषाख चढविला. "पुनर्विवाह" ह्या विषयावर त्यांचे ३।। ला व्याख्यान होतें. त्यांनी गर्दीगर्दीनें चोहोंकडे आपल्या पत्नीचा शोध केला पण व्यर्थ. जवळ-पास कोणाच्या घरी गेली असेल, असे मनाचें समाधान करून ते सभास्थानी गेले. नेहमींप्रमाणें मुद्देसूद व आवेशयुक्त भाषण झाले, संध्याकाळी स्वारी परत आली.

साधारण ७ चा सुमार असेल. संध्याकाळच्या "पुष्पपरागसुगंधित शीतल" अशा वायूच्या झुळकीत गच्चीवर प्रोफेसरसाहेब बसले होते. त्यांची सहजप्रफुल्लित मुद्रा बरीच निस्तेज दिसत होती. गार वारा चालला होता. तरी त्यांच्या शरिराची लाही काहीं मुद्धा कमी होईना. त्यांचे दीर्घोष्ण निःश्वास सारखे चालू होते. मुरलीधरपंत बहुतकरून कोणावर रागवावयाचे नाहीत; पण आज त्यांचा चेहरा रागानें अगदी तांबडा लाल झाला होता. डोळ्यातून तर आता अग्नि-स्फुलिंग बाहेर पडतात की काय असा भास होई. असे होण्यास काय कारण बरें? ते जवळच्या बाईशीं काय बोलतात तें ऐकूं या:—" का ग सिता, तुला पुन्हा जाऊन बोलावून आण म्हणून सांगितले होतें ना? जातेस कीं नाहीं?" दादासाहेब, आपल्या आज्ञेप्रमाणे मी दोनदा जाऊन आले. पहिल्याप्रथम बाई-साहेबांचा चोहोंकडे शोध केला पण व्यर्थ. शेवटी दुसऱ्या मजल्यावरील पाठी-मागल्या माडीच्या खोलीत कडी लावून त्या पडलेल्या दिसल्या. खिडकीच्या फटीतून दाराला किती धक्के दिले पण उत्तर येईल तर शपथ. शेवटी त्रासून "कोण आहे ग तिकडे. दाराला कोण धक्के देतंय" असे रागाने ओरडल्या. मी म्हटले, 'मी सीता आहें. दादासाहेब आपल्याला मघापासून हाका मारताहेत.' तेंव्हा म्हणाल्या, 'जा, जाऊन सांग कीं त्या निजल्या आहेत, त्यांचे पोट फार दुखतें आहे. बरें वाटलें म्हणजे येईन. चल, नीघ इथून.' दार उघडीत नाहींत मी तरी काय करूं?' हें ऐकून त्यांची आग मस्तकाला गेली. '२।३ बोलावणीं पाठवून हे उत्तर? पोट दुखतें म्हणून काय झालं? एकदा येथवर येववत नाहीं! बरें आहे, खाली जा.' इतके म्हणून ते खुर्चीवरून उठून [illegible]

मनानें फिरूं लागले. 'मीच हिला डोक्यावर बसवून [illegible]

हट्ट पुरविला त्याची ही फळे. बायकोशी जरा मऊ [illegible]

कीं लागल्या मिरी वाटायला. बस्स, हिलाच जर [illegible]

तिच्यापेक्षा सवाई आहे. हिची मनधरणी करण्याची [illegible]

रात्रीं माईसाहेब जेवल्या नाहींत हें सांगायला नकोच. प्रोफेसरसाहेबांना एका परम प्रिय मित्राच्या घरीं जेवायला जायचें होतें. जाऊं नये असें वाटे पण आयत्या वेळेवर त्यांचा हिरमोड होईल तें बरें नाहीं असें म्हणून ते नेमल्या वेळीं निघून गेले. कसेबसे दोन घास खाल्ले. वरून हास्य मुद्रा करून बोलत होते. पण आंतून त्यांची स्थिति काय झाली होती ती त्यांनाच माहित. जेवणानंतर लागलीच घरीं परत यावें असें त्यांचें मन घेईना. ज्या मुरलीधरपंताला घर कधीं गांठीन असें होत असे, त्याचा पाय घराकडे जाईना. थोडा विचार करून ते नदीकिनाऱ्याकडे फिरायला गेले.

अक्रासाडेअक्राचा सुमार असेल. बराच काळोख पडला होता. प्रोफेसरसाहेब वाळवंटांत बसले होते. त्याच्या वरच्या बाजूला एक मोठा थोरला डोह असून एक सुळक्यासारखा खडक होता; त्याकडे कोणी जात आहे असें दिसून आलें. ह्या अशा वेळेस आणि अशा भयाण ठिकाणीं कोण जात आहे ह्याविषयीं त्यांना उत्सुकता वाटली. पण त्यांच्या डोक्यात विचारांचें काहूर माजलें होतें त्यामुळें ते लागलींच निघाले नाहींत. राहून राहून त्यांना चमत्कार वाटे, 'माझ्या हातून असा कोणता अपराध घडला, केव्हां मी रागावून बोललों कीं, तिनें आज असा माझा उपमर्द करावा, जी नेहमीं छायेसारखी माझ्याभोंवतीं फिरत असे तिला एकदां येऊन जाणें महत्प्रयासाचें व्हावें आं! रागावली आहे, बसेल दोन दिवस रुसून, तिसऱ्या दिवशीं आपण होऊनच बोलेल' असें म्हणून ते स्वतःचें समाधान करूं लागले, पण मन स्वस्थ होईना. इतक्यात पाहतात तों मघांची आकृति अगदीं खडकाच्या टोंकावर उभी राहिली. पाहणारास वाटे कीं, ती आतां खचित खालीं पडेल. प्रोफेसरसाहेब निघाले ते लपतछपत जाऊन ती उभी होती त्याच्या मागच्या बाजूला झाडांत उभे राहिले. जवळून त्यांना असें आढळून आलें कीं ती बाई असावी, तिनें तोंड दिसूं नये म्हणून, बुरखा घेतला होता, पांढरें पातळ परिधान केलें होतें, ओचे कासोटे पक्के घातले होते, आंगावर फुटका मणिही नव्हता, तिच्या उभें राहण्याच्या प्रकारावरून ती जीव

आहे असा अदमास होई. कांहीं वेळानें तिनें हात जोडले व म्हणाली "हे पतितपावना, दयाघना परमेश्वरा, मला

पातां माझे सहस्रावधि अपराध आतांपर्यंत झाले अस-

समर्थ आहेस. मी आपल्याकडून होईल तितकें करून

नाहीं. कोणाचें वाईट इच्छिलें नाहीं. मग करायचें ?

कुठून ? मी आपल्या पतीवर पराकाष्ठेचें प्रेम करीत असें. हा देह त्यांच्या पायींच वाहिला होता व आहे. असें असून जर माझा जीव त्यांचेपाशीं आणि त्यांचा जीव तिसरीपाशीं आहे तर मग मला जगून तरी काय करायचें! पुरुषांचे प्रेम चंचल आहे ह्याविषयीं माझी खात्री झाली. इंदु आणि चंद्रकला यांचीच गोष्ट घ्या ना. इंदूचें प्रेम संपादन करण्याकरितां रोज सारखे इचे प्रयत्न. प्रेम-कलेचा पूर्ण उदय झाला तरी त्या इंदूचें लक्ष कुमुदिनीवर. चंद्रकलेला वाटतें कीं, इथे माझ्याशिवाय दुसरी कोण आहे, पण ही तिची नुसती कल्पनाच. असेंच मलाही वाटत असें, पण आता ती झडप उतरली. हे सरिते, तूं सुद्धां माझ्यासारखी आहेस, तर तुझ्याशीं मला एकरूप होऊं दे. तुला वाटत असेल कीं माझे पतिराज सागर हे प्रेमाचें आगर आहेत. त्याचें माझ्यावर काय प्रेम! त्याचा माझा देह अर्धनारीनटेश्वराप्रमाणें एक झाला आहे. नव्हे विरह सहन होईना म्हणून एक केला आहे. सहस्रकरात त्यांना बद्ध करून शेंकडों मुखांनीं मी त्याचें व ते माझें अधरपान करितात. मला पाहून त्याच्या हृदयात प्रेमोर्मि उसळतात. प्रेमाला अजून कांहीं सीमा राहिली आहे का? झुळझुळ मंजुळ आवाजात प्रणयगीत म्हणत असता त्याच्या हृदयांत कशी गडबड होते हें त्यांच्या हालचालीवरून दिसत असतेंच. मला अर्पण करण्याकरिता हिऱ्यामोत्यांचे अपरिमित दागिने घडवून ठेविले आहेत व ठेवीत आहेत. बाहेरून जरी कृष्णवर्ण दिसलें व स्वभावात प्रथमतः माधुर्य नाहीं असें भासलें तरी अंतर्याम शुद्ध आहे अशीच माझी खात्री आहे. असें हे भोळे सरिते, तूं म्हणशील—नव्हे प्रत्येक सरिता असेंच म्हणते, पण हा सागर किती लबाड आहे याची तुला काय कल्पना. प्रत्येकीला निरनिराळ्या प्रदेशात ठेवून एकीला दुसरीचें तोंड सुद्धा दिसूं नये, तिच्याशीं काय बोलणें, काय क्रीडा होतात हें समजूं नये याचा कडेकोट बंदोबस्त केला आहे. सरिते, आतां तुझी भ्रांति समूळ नाहींशी झाली ना. तूं, मी समानदुःखी आहोंत. फार कशाला, तुझ्यात आनंदाने नाचणाऱ्या कमलि-नींचीसुद्धा हीच स्थिति आहे. प्रत्येक कमलिनीला वाटतें कीं, ह्या भृंगाचें माझ्यावर किती प्रेम! सकाळपासून तो माझी जी स्तुति करितो ती मला सांगता येत नाहीं. "गुडगुड करून माझी नेहमीं आठवण करून सांगतो कीं, तुझ्या प्रेमांत मी गुंग झालों आहे. मला दुसऱ्या कशाचीही स्मृति नाहीं. ती कमलिनीही भावडी. एवढ्या स्तुतीनें खूष होऊन यथेच्छ त्यास रसपान करूं देते. जोंवर रस आहे, मुखकमलावर टवटवी आहे, तोंपर्यंत

हाही घिरट्या घालतो. पण थोडी कमतरता वाटली की चालला दुसरीकडे. विसरला पहिलीला. तिला कधी पाहिलें होतें की नव्हते इतकी विस्मृति. हें त्या कमलिनीला कुठें कळतें. ह्या कृष्णतनूची व त्या कृष्णाची फारच मैत्री पूर्वी असावी. त्या कृष्णानेंच ह्यांच्या वर वरदहस्त ठेवला असावा. गोकुळांतल्या सगळ्या गौळणींना त्यानें असेंच नाचविलें. एका हातानें एकीचे डोळे झांकून दुसरीचें चुंबन घ्यावें. दोघींना वाटे आपल्यावरच काय तो त्याची प्रीति. पण त्या कृष्णतनूचे प्रेम तेथें न दिसणाऱ्या भृंगावर व ह्या कृष्णाचें राधेवर. त्याप्रमाणेंच तिकडची प्रीति त्या वीरष्ठांच्या राधेवर. हे ईश्वरा! ह्या जन्मीं ह्याची पूर्ण सेवा करतां आली नाहीं; पुढच्या जन्मीं तरी तिची पूर्तता होवो. पुढच्या जन्मीं ह्यांच्याशींच माझी गाठ घाल. ह्यांना योग्य अशी मला कर. निरंतर सुखांचा वर्षाव कर. त्यांच्या मानी पत्नीला—माझ्या सवतीला—कांहीं कमी पडूं देऊं नकोस. हे कमलिनींनो, तुम्ही ह्या सरितेच्या कन्या आहां. तुमच्या आईप्रमाणे तुमचीही अशी दुःखी स्थिति आहे. मला तुम्ही आपली भगिनी माना, माझी स्थिति तुमच्यासारखीच दुस्सह आहे. हे सरिते, मला पोटांत घे," असें म्हणून ती उडी टाकणार तोंच तिला मुरलीधरपंतांनीं मागें ओढलें. तिला मूर्च्छा आली. सावध झाल्यावर पाहते तों ज्यांच्यावर रागावून जीव द्यायला निघालें तेच. सत्यभामाबाईला विरघळल्यासारखें झालें. प्रो० साहेबांनीं असें करण्याचें कारण विचारलें. तेव्हां त्यांना सगळा प्रकार कळला. तेव्हां प्रो० साहेबांना फार हंसूं आलें. ते म्हणाले, "अग, तें इंग्लिश love letter चें ( प्रणयपत्र ) भाषांतर आहे. तें एका कादंबरींत घालायचें आहे. तेवढ्यावर कां तूं प्राण द्यायला निघालीस? काय तुझा हा संशय!" संशयनिरसन झाल्यावर एकदम त्यांचे त्यांनीं पाय धरले व क्षमा मागूं लागल्या. लागलीच दोघें घरीं परत आलीं. तेव्हांपासून सत्यभामाबाईची वृत्ति बदलली. त्यांना पुन्हां कधीं असा संशय आला नाहीं. त्या पत्राचें नांव कधीं काढलें, कीं, त्यांना हंसावें कीं रडावें असें होतें. हा सर्व कशाचा खेळ? तर संशयपिशाच्चाचा.

---

# पहिली मंगळागौर.



( लेखक—शं. ना. सहस्रबुद्धे-रामचंद्रानुज. )

( १ )

श्रावण महिन्याचे दिवस. रात्रभर पाऊस पडून जमीन स्वच्छ धुऊन गेली आहे. रात्रभर बंद केलेल्या मेघांना बाजूला सारून आपले कोमल किरण सोडीत श्रीसूर्यनारायण उगवत आहे, अशा वेळेस शेतांतून अथवा डोंगरावर फिरण्याची किती मौज! डोंगरावर उभे राहून भोंवतालच्या सृष्टिसौंदर्याकडे नजर टाकली म्हणजे किती आनंद होतो! भोंवताली सगळा हिरवा देखावा पाहिल्यावर जणुं काय आपल्याभोंवती हिरवा गालिचाच पसरला आहे असें वाटत होतें. मधून फों फों करीत दुथडी वाहत असलेली नदी त्या गालिचावर जणुं वेलबुट्टीप्रमाणेंच शोभत होती. त्याचप्रमाणें उगवणाऱ्या श्रीसूर्यनारायणाचे पीत किरण मधून मधून पाणी साचलेल्या डबक्यावर पडले असल्यामुळें त्या डबक्यांनीं त्या गालिचावरील सोनेरी फुलाची जागा पटकाविली कीं काय असा भास होत होता. अशा वेळीं कोणाचें मन प्रसन्न होणार नाहीं? रात्रीं पावसांत गारठलेला पक्षिगण-सुद्धां आपली डोकीं बाहेर काढून त्या देखाव्याची मौज पाहात बसलेला ठिक-ठिकाणीं दृश्यमान होत होता. डोंगर पावसानें स्वच्छ धुऊन गेला होता. धों धों शब्द करीत पृथ्वीवर येऊन आदळणारे पाण्याचे शुद्ध ओहोळ ठिकठिकाणीं दिसत होते. या शुभ्र बाह्य वर्णाला भुलून व त्यालाच हिमालय समजून भोळ्या शंकरानें त्याच्यावर आपलें वसतिस्थान केलें होतें. चोहोंकडे हिरवा देखावा. त्याप्रमाणेंच झाडाच्या पानावर व गवतावर जलबिंदु दृग्गोचर होत असल्यामुळें ही पृथ्वी हिरवा शालू नेसून व मोत्यांचे अलंकार अंगावर धारण करून शिवा-मूठ वाहण्यास निघाली आहे कीं काय असा भास होत होता. आज श्रावणी सोमवार, नववधूंच्या जिवाची आज कोण धांदल! उद्यां शिवामूठ वहावयाची म्हणून आदले दिवशींच पूजेची सर्व तयारी-पंचामृत, तांदूळ वगैरे-करून ठेवली होती. न जाणों, उद्या धांदलीत कांहीं सामान घ्यावयाचें चुकेल म्हणून रात्रींच पूजेची सर्व तयारी करून त्या निजल्या होत्या—निजल्या होत्या असें म्हणण्यापेक्षां उद्यांचा कार्यक्रम ठरवीत अंथरुणावर पडल्या होत्या असें म्हणणें जास्त शोभेल.

वणू यायच्या अगोदर अंग धुऊन तयार राहीन; ती आल्यावर तिला उशीर झाल्याबद्दल चिडवीन; नंतर आम्ही शिवामूठ वाहावयाला जाऊं; दुपारीं मंगळागौरीची पत्री आणण्यास बागेंत जाऊं; मी सगळ्यात जास्त फुलें...... पण इतक्यांत आमच्या यमूताईला झोंप लागून उजाडलें सुद्धां.

झालं, यमूताईला आतां कसला दम. ती साडेसाताला आग धुऊन, पैठणी नेसून, दागदागिने घालून तयार झाली व मैत्रिणी आल्या कीं नाहीत हें पाहण्याकरितां माजघरांतून ओटीवर व ओटीवरून माजघरांत अशा तिच्या पांचसात येरझारा झाल्या. अजून एकजणसुद्धां आली नव्हती, त्यामुळें आमची यमूताई फारच अधीर झाली. आठ वाजण्याच्या सुमारास दोघीतिघी आल्या; पण मुख्य वेणू ती आलीच नाहीं म्हणून यमूताई तिला बोलावणें धाडणार तों ती लगबगीनें आलीच, व यमूताईनें तिला उशिराबद्दल टोमणाही दिलाच. अंग धुतल्याबरोबर तिनें विठोबाला ( शागीर्द ) पूजेचें घेऊन पुढें होण्यास सांगितलेंच होतें. मागा-हून यमूताई व तिच्या मैत्रिणी, बरोबर एक वृद्ध बाई व एक गडी घेऊन निघाल्या. आमची यमूताई जातीचीच नाजूक, त्यात प्रभाकरानें आपली प्रभा प्रखर करण्यास थोडी थोडी सुरुवात केली होती; त्यात रस्ता चढण्याचे श्रम, यामुळें यमूताईच्या कपाळावर घर्मबिंदु चमकूं लागले; गाल लाल झाले; व तोंडानें ती सारखी हुःश् हुःश् करूं लागली. अर्धा अधिक रस्ता चढून गेल्यावर यमू-ताईला फिरूं लागलें. इकडे वेणूचा सृष्टिसौंदर्य दाखविण्याचा सपाटा चाललाच होता. परंतु तिचें तिकडें लक्ष लागेना. ती वृद्ध बाई व तो गडी अजून मागेंच राहिले होते, त्यांची वाट पाहण्याचें निमित्त करून ती तेथेंच जवळच्या बाकावर जाऊन बसली. पूजेला ज्या उत्साहानें ती घरून निघाली होती तो उत्साह एन पूजेच्या वेळीं मावळूं लागला. तिची पूजा श्रमिष्ठासारखी चालली होती. गंधाच्या ऐवजीं देवाला ती मधाचेंच बोट लावी व कापूर समजून खडीसाखरेचा खडाच दिव्यावर पेटवूं लागे. जेमतेम नैवेद्यापर्यंत पूजा आली व नैवेद्य दाखविण्या-साठीं जों तिनें डोळे झांकले तोंच तिचा पाठीमागें झोंक जाऊन निरांजनाला पाय लागून तें आडवें झालें. इतक्यांत वेणूनें तें सांवरून नीट ठेवलें व यमू-ताईला पोटाशीं धरलें. तिच्या अंगाला दरदरून घाम सुटला होता. नंतर डोळ्याला पाणी वगैरे लावून तिला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न चालविला. दोनतीन मिनिटांनीं यमूताई सावध झाली व तिनें घाबरलेल्या मुद्रेनें सभोंवतालच्या मंडळीकडे पाहिलें व " काय झालं ? कुठें आहेत ? " एवढेच शब्द उच्चारून

जरा भानावर आल्यासारखे केले व कशी तरी पूजा संपविली. वेणूने तेथेच धाबळी घालून यमूताईस त्यावर निजविलें. सर्व मैत्रिणी तेथेच बसल्या व गड्याला घरून गाडी घेऊन येण्यास सांगितलें. अकराचे सुमारास गाडी आली. बाबू ( यमूताईचा धाकटा भाऊ ), कारकून, व गडी लवकरच वर आले. बाबू वाटेंत दमलाच होता. परंतु माईच्या काळजीपुढें तो काय आपली फिकीर बाळगतो ? बाबू आल्यावर जरा वेळानें सर्व मंडळी यमूताईला घेऊन हळुहळू खालीं आली. गाडीपर्यंत तिनें कशी तरी मजल मारून ती एकदाची गाडीत बसली. तिच्या मैत्रिणीही पण बसल्या व गाडी चालू झाली.

× × × ×

( २ )

चला आता मधल्या रस्त्यानें आपण यमूताईच्या घरीं जाऊं. घर काहीं लांब नाहीं. काळ्या हौदाजवळ आहे. हे बघा आलेंच घर. दारात जे गृहस्थ उभे आहेत तेच आमच्या यमूताईचे वडील. यमूताईच्या गाडीचीच वाट बघत आहेत वाटतें. ती बघा यमूताईची आई. तेथे जवळच्या जाळीत मुलीची वाट बघत उभी आहे. यांची तुम्हाला थोडक्यात हकीगत सागतो. यमूताईच्या वडिलाचें नाव गणपतराव ऊर्फ दादासाहेब व तिच्या आईचे नाव सरस्वतीबाई याना वहिनी-बाई म्हणतात.

दादासाहेबानी अव्वल इंग्रजांत नोकरी धरून मोठमोठ्या हुद्यांची कामें केली होती व आता पेन्शन घेऊन ते पुण्यास राहण्यास आले होते. याचे घराणें फारसें श्रीमंत नव्हते. यांचे वडील पेशव्यांचे पदरीं कारकून होते. पुण्यास इंग्रजी अम्मल सुरू झाला तेव्हा मुलाची इंग्रजी शिकण्याची इच्छा दिसल्यावरून त्याला इंग्रजींत घातला, व लहानशी पोटापुरती नोकरी लावून दिली. परंतु, दादासाहेबाचे अंगीं हुषारी, प्रामाणिकपणा वगैरे गुण असल्यामुळे साहेब त्याच्यावर फार खूष असे. त्यामुळें त्याना मोठी नोकरी मिळण्यास फारसे श्रम पडले नाहींत. वहिनीबाईचा स्वभावही फार सालस होता; आपण आता श्रीमंत झालो म्हणून त्याना कधींही गर्व झाला नाहीं व त्या कोणाशीं कधीही तिरस्कारानें वागल्या नाहींत. देवाच्या दयेनें त्याना संततिसुखही काहीं कमी नव्हते. पहिले दोन मुलगे नारा-यण व विष्णु हे अनुक्रमे इंग्रजी सातवी व पाचवी शिकत होते; तिसरी यमूताई. तिचे यंदाच लग्न झालें होतें. चवथा बाबू अकरा वर्षांचा असून तो इंग्रजी पहिली इयत्ता शिकत होता. एकुलती एक मुलगी. तेव्हा यमूताईचें लग्न पुण्यास मोठ्या

थाटानें झालें. तिला बार्शीस बाबासाहेब इनामदाराच्या मुलाला दिली होती. सासरा, सासू, दीर, नणंद वगैरेंचें सुख तिला चांगलें होतें. सर्व माणसें स्वभावानें गरीब, ममताळू व बालबोध वळणाचीं होतीं. कृष्णराव-यमूताईचे पतिराज—यांना अप्पासाहेब म्हणत. हे मुंबईस कॉलेजकोर्स पुरा करीत होते. पहिलीच मंगळागौर तेव्हां जोडप्यांनीं पूजा करावी असा घरातून आग्रह पडल्या कारणानें दादासाहेबांनीं, मुंबईस कृष्णरावास व बार्शीस बाबासाहेबांस अशीं दोन पत्रें धाडलीं होतीं. दादासाहेबांच्या पत्रावरून बाबासाहेबांनीं ' तूं पुण्यास मंगळागौरीकरितां जा. येथून मुलांपैकीं कोणी तरी येईल. ' असें पत्र कृष्णरावास धाडलें होतें; त्याप्रमाणें दादासाहेबांस ' सोमवारीं संध्याकाळीं पांच वाजता येतों ' असें अप्पासाहेबाचें पत्र आलें होतें. अप्पासाहेबाचा स्वभाव मनमिळाऊ, सरळ व विशेषतः चौकस असा होता. कोणतीही नवी वस्तु पाहिली कीं ती कोठली काय वगैरे चौकशी करून तिचा ते छडा काढीत व ती वस्तु मिळण्यासारखी असेल तर ती हर प्रयत्नानें मिळवीत. त्याची खोली म्हणजे चमत्कारिक वस्तूंचें एक प्रदर्शनच होतें. त्याच्या जवळ स्वतः मिळविलेले डोंगरांतील निरनिराळ्या रंगांचे दगडच पांच पंचवीस होते. इतिहासप्रसिद्ध स्थळें पाहण्याची त्यांना फार आवड. या योगानें त्याच्या चित्रकलेत बरीच भर पडे. ते चित्रकलेंत बरेच निपुण होते. तेथील कोरीव काम ध्यानांत ठेवून ते त्याबरहुकूम बेलबुट्टी काढीत. वाटेंतील एखादा देखावा लक्षांत धरून तोच देखावा ते आपल्या चित्रांत प्रगट करीत. डोंगरावरील स्थळें पाहण्यांत त्यांचे दोन हेतू असत. एक त्यांची स्थळ पाहण्याची इच्छा परिपूर्ण होत असे व दुसरा डोंगरावर पुष्कळ चित्रविचित्र वस्तु दृष्टीस पडत; तसेच निरनिराळे उत्तम देखावे दृष्टीस पडून त्याच्या चित्रकलेला मदत होत असे. पुण्यास लग्नाला आले होते तरीसुद्धां ते सिंहगड पाहून गेले.

× × × ×

( ३ )

' उद्यां शिवामूठ वाहण्यास आपण पर्वतीस जाऊं ' असा यमूताईनें व तिच्या मैत्रिणींनीं आपापसांत बेत करून यमूताईकडून दादासाहेबांच्या जवळ हळूच गोष्ट काढली. यमूताई दादासाहेबांची फार लाडकी होती, तरीसुद्धां पहिल्यांदा त्यांनीं नकारच दिला; परंतु यमूताईचें तोंड जरा गोरेमोरें झालेलें दिसतांच त्याचा होकार आला; परंतु बरोबर गडी वगैरे घेऊन जाण्याबद्दल बजावलें. वहिनी

बाईंना ही गोष्ट आवडली नाही, परंतु बाहेरूनच सांगणें झाल्यावर त्यांच्या आड कोणी जावें असा त्यांनी विचार केला व बरोबर एक वृद्ध बाई दिली. पुढील प्रकार वाचकांस माहीतच आहे. यमूताई घरी आल्यावर वहिनीबाईंनी मात्रा वगैरे देऊन तिला निजविली व आपण तेथें बसल्या. दादासाहेबही वारंवार समाचार घेत होतेच. दुपारी वेणू वगैरे मैत्रिणी यमूताईच्या समाचारास आल्या व ती त्यांच्याशीं गोष्टी सांगत बसली होती. यमूताईची प्रकृति आतां जरा बरी होती. दुपारचे शब्द वेणूच्या मनांत सारखे घोळत होते व त्यांच्या अर्थाबद्दल तिची अंतःकरणात खटपट चालली होती; परंतु त्याचा तिला उलगडा पडेना. यमूताईच्या मैत्रिणी तेथेंच बसल्या होत्या—नव्हे यमूताईनें त्यांना ' पत्री, फुलें वगैरे आपण दारावरच विकत घेऊं ' असें सांगून बसवून घेतलें होतें. चार वाजण्याचे सुमारास तिच्या मैत्रिणी आपापल्या घरी गेल्या. वेणूला मात्र तशीच बसवून घेतली होती. जरा वेळानें यमूताईनें आपला बिछाना सोडला व चित्रें, तसबिरी वगैरे पाहण्याच्या मिषानें वेणूला घेऊन ती दरवाजावरील माडीवर निघून गेली. संध्याकाळीं पाच वाजतां कृष्णराव येणार म्हणून बैठकीची वगैरे तयारी करवून दादासाहेब ओटीवर वाट पाहात बसले होते. गाडी स्टेशनवर गेलीच होती. वेणूला चित्रें वगैरे पाहण्यांत गुंतवून यमूताईनें तितक्यातल्या तितक्यात सात आठ खिडक्यांतून रस्त्यांत डोकावून पाहिलें. सरतेशेवटीं एकदांची गाडी दृष्टीस पडली घाईघाईनें वेणूला घेऊन ती माजघरांत पळाली. गाडी येऊन दाराशीं धडकली. आमची पतिदर्शनोत्सुक यमूताई वेणूला घेऊन माजघरातल्या जाळीशींच उभी होती. परंतु गाडीतून एकटे हरीपंत ( कारकून ) उतरलेले पाहतांच तिला हसेंसेंच झालें. ती ओटीवरच्या दाराच्या आतल्या बाजूस हरीपंत काय सांगतात तें ऐकण्यासाठीं उभी राहिली. ' मी सबंध गाडी शोधली, प्लॅटफॉर्मवर पुष्कळ शोध केला, परंतु अप्पासाहेब कोठेंच दिसले नाहींत. ' असें हरीपंतांनीं सांगतांच यमूताईची पूर्ण निराशा झाली व दादासाहेब बरेच बुचकळ्यांत पडले. त्यांनीं मुंबईस तार केली. सुमारें सात वाजतां ' मालक मिळाला नाहीं ' म्हणून ' तार ' परत आली. दादासाहेब आतां फार घाबरले व वहिनीबाईंच्या डोळ्यांतून तर अश्रुच आले. दादासाहेबांनीं झालेल्या हकीकतीची बाबासाहेबांना बार्शीस तार दिली. यमूताईला सकाळचा देखावा पुन्हा दिसूं लागला. ती बरीच घाबरून गेली व वेणूला कवटाळूं लागली. इतक्यांत ' करकरीत तिन्हीं सांजा झाल्या. अजून त्यांच्या येथें जाऊन गोष्टी बोलत बसण्याची कां ही वेळ आहे, ' असें

पुटपुटत वेणूची आई तिला शोधीत आलीच. परंतु वहिनीबाईंनीं व विशषतः यमूताईनें आग्रह धरल्यावरून वेणूला राहण्यास सांगून तिची आई घरी गेली. यमूताई व वेणू माजघरच्या खोलींत जाऊन बसल्या. दोघींच्या तोंडून एकही शब्द निघेना. बराच वेळ झाल्यावर वेणू म्हणाली, ' यमूताई, तुला एक गोष्ट विचारतें ती सांगतेस का ? सकाळीं पर्वतीवर तुला घेरी आली त्या वेळेस तूं कांहीं बोललीस का ? तुला कांहीं तेव्हांचें आठवतें का ? ' इतके शब्द उच्चारल्याबरोबर यमूताईच्या अंगावर शहारे आले, ती घाबरली व भीतीनें डोळे मिटून स्तब्ध बसली. भीतीचा जोर जरा कमी झाल्यावर यमूताईनें इकडेतिकडे पाहिलें व ' गडे, डोंगरात एका भिल्लाशीं झुंजणं चाललं होतं व अंगावर बऱ्याच जखमाही झाल्या होत्या, असं मला त्या वेळीं दिसलं ' असें भय व लज्जायुक्त अशा काकुळतीच्या वाणीनें सांगून ती वेणूच्या खांद्यावर मान टाकून स्वस्थ पडली. वेणूही घाबरलीच होती. परंतु तिनें यमूताईचें शांतवन करण्याचा प्रयत्न करून तिला बराच धीर दिला. ती रात्र त्यांनीं तशीच घालविली.

× × × ×

( ४ )

वडिलांच्या पत्रानुसार अप्पासाहेबांचा पुण्यास जाण्याचा बेत ठरला त्याप्रमाणें श्वशुरांना पत्रही लिहिलें. जातां जातां वाटेंत कारल्याचीं कार लेणीं पाहावीं असा बेत करून ते दुपारीं न निघतां पहाटेच्या गाडीनें निघू साडे नवाच्या सुमारास ' कारले ' स्टेशनवर उतरले. बरोबर सामान वगैरे तेंच; एक फराळाचा डबा व छत्री. एक घोडें भाड्यानें करून ते पायथ्यापर्यंत ले, व नेहमींच्या क्रमाप्रमाणें तेथेंच घोडेवाल्यास रजा देऊन ते डोंगर चढूं गले. ( डोंगरावर निरनिराळ्या तऱ्हेच्या वनस्पति, दगड, गारगोट्या वगैरे स ंडतात म्हणून ते डोंगरावरच्या प्रवासात पादचारीच बनत. ) अर्धा अधिक डोंग चढून गेल्यावर अप्पासाहेब एका झाडाच्या मुळाला टेंकून खालील सृष्टिसौंदर्याचें निरीक्षण करीत राहिले. तें डोंगरावरील पाण्याचे ओहोळ, तेथील गर्द झाडी, मध्येच पुढें आलेला डोंगराचा कडा अथवा एखाद्या गुहेचें तोंड, तीं डोंगराखालील भातखाचरें, ते मेंढरांचे कळप वगैरे अनेक प्रकारचे देखावे बघतांना त्यांना फार संतोष झालासा दिसला, व प्रवासाच्या योगानें आलेला शीणही कमी झाला. नंतर बऱ्याच वेळानें वर जाऊन लेणीं पाहिलीं, देवीचें दर्शन घेतलें. लेणीं पाहतांना त्यांच्या मनाला बराच आनंद झाला. तळ्यावर स्नानसंध्या उ न तेथें

थोडासा उपहार केला व अप्पासाहेब डोंगर उतरूं लागले. थोडासा डोंगर उतरल्यावर एका झाडाच्या मुळांत एक चित्रविचित्र रंगाचा दगड अडकलेला त्यांना दिसला; व त्यांनीं तो नेहमींच्या जिज्ञासेनें बाहेर काढण्याचा प्रयत्न केला. तों काय एक लांबलचक सर्प फुत्कार करून बाहेर निघाला ! सर्पाची जात जात्याच चपळ व हा डोंगरावरील सर्प. मग त्याची चपलता काय वर्णावी ! त्यानें लागलाच हाताला विळखा घालून दंश केला. अप्पासाहेब सर्प पाहण्याबरोबर घाबरून गेले व दंश होताक्षणींच त्याना भयंकर मूर्च्छा आली व ते एका दगडावर पडले.

काय बिचाऱ्याची स्थिति ! धड घरीं नाहीं, धड दारीं नाहीं, डोंगरात एका झाडाखालीं तो सर्पदंश होऊन पडला ! प्रकृति जरा बिघडली कीं ज्याच्या भोंवतीं दहा माणसें त्याच्या सेवेकरिता उभी राहात त्याला सर्पदंश झाला असून, प्रबळ मूर्च्छा आली असतां त्याच्या जवळ एकही मनुष्य नसावें ! गादीवांचून ज्यानें जमिनीला कधींही पाठ दाखविली नाहीं त्याला निर्जन डोंगरातील खडकांत पडावयाची पाळी यावी ना ! शुद्धींत असता तर त्याने आरडाओरड करून मंडळी जमा करण्याचा प्रयत्न केला असता व तो कदाचित् सफलही झाला असता. परंतु मूर्च्छा आल्याकारणानें ती बाजू सर्वच संपली. झाले, तोंडही काळें ठिक्कर पडले, व हालचालही बंद झाली. यमूताई, गेला ! तुझा प्राणविसावा गेला ! ! तुझा कलिजा गेला ! ! ! हर ! हर ! ! हर ! ! !

हे विधात्या, एखाद्या मनुष्याला निर्जन प्रदेशांत गांठून त्याचे प्राण हरण करण्यात तुला पुरुषार्थ वाटला असेल नव्हे ? तुझ्या हातातील अधिकाराचें चीज झालें ना ? असो. त्याला तरी आपण कां दोष द्यावा ? दैवीं असते तेंच घडतें.

× × × ×

( ५ )

" अग, ऐकलंस का ? विनू म्हणतो मी पुण्यास जाणार, ही आऊताई म्हणते मी जाते. तुझें काय मत आहे सांग पाहूं ! "

" विनू गेला तर आऊ येथें रडून रडून त्रास देणार; बरं, आऊ गेली तर विनू रडणार; म्हणून मी म्हणतें दोघेही जाईनात ? विठ्ठलपंत बरोबर आहेतच, ते त्यांना नीट संभाळून नेतील. पण काय रे, विनू, तेथें गेल्यावर खोड्या, दंगा वगैरे नाहीं ना करावयाचास ? तर पुण्यास जायचं, नाहीं तर नाहीं. " माईसाहेब म्हणाल्या.

" छे ! छे ! मी तिथं अगदीं देवासारखा वागेन. ही ताईच दंगा करील. छोटा विनू म्हणाला !

" मी खोड्या करीन की नाही तें माईला ( माईसाहेबांना मुले माईच म्हणत ) माहीत आहे. तूंच संभाळ म्हणजे झालं. " आऊताई तोऱ्याने म्हणाली. सरते शेवटीं दोघें जायचीं असें ठरलें.

" आपण पुण्यास गेल्यावर, तिथं अप्पा येईल. मग वहिनी व अप्पा जवळ जवळ बसून मंगळागौरीची पूजा करतील; मग आपल्याला गंमत पाहायाला सांपडेल " असें म्हणत म्हणत आऊताई व छोटा विनू घरात धावत गेलीं.

बाबासाहेब कारकुनाजवळ विनूचे व आऊचे कपडे वगैरे बांधण्यासाठी देत होते; जवळच माईसाहेबही उभ्या होत्या. इतक्यात एका शिपायाने त्यांच्या नांवची एक तार त्यांचे पुढे टाकली. तार दादासाहेबांची होती. तार वाचल्या-बरोबर बाबासाहेब घाबरून गेले. माईसाहेबांनी विचारल्यावरून त्यानाही तारेचा अर्थ सांगितला. बाबासाहेबांनी मुंबईस आपल्या मित्राला तार दिलीच. सर्वांनी पुण्यास जाऊन खरी हकीगत काय आहे हे पाहण्याचे ठरविले.

× × × ×

( ६ )

दुपारचे बारा वाजण्याची वेळ. बरेच दिवसांनी सहस्ररश्मीने आपले किरण सोडल्यामुळे डोंगरावरील मेंढ्यांचे कळप उन्हात उभे होते. बरेच दिवस पावसाने झोड लाविली असल्यामुळे जरा ऊन पडलें तर बरें असें वाटत होते. डोंगरावर दाट गवत उगवलें असल्यामुळे बहुतेक डोंगर हिरवा गार दिसत होता मधून पाण्याचे ओहोळ जोरानें वाहात जाऊन धों धों असा शब्द करीत खाली पडत होते. त्याचा प्रतिध्वनि तर आपण त्याच्यापेक्षा जास्त बलवान आहों असे दाखविण्याकरताच की काय त्याच्यापेक्षा मोठा आवाज काढीत होता. पावसाने भिजलेले डोंगरावरील ढिसूळ दगड आपली जागा सोडून पायथ्याशीं केव्हा जातील याचा नेम नव्हता, म्हणून डोंगरात वावरणारे लोक फार जपून चालत होते. जरा मोठा आवाज झाला की ते जागच्या जागीं थांबत व खालींवर नीट निरखून बघून नंतर पुढील मार्ग काढीत. काही धनगर आपले कळप डोंगरात चरणीस लावून आपापल्या शिदोऱ्या सोडून भाकरी खाण्यास बसले होते. इत-क्यात वरच्याच बाजूला कांहीं दगड वगैरे पडल्याचा आवाज झाला. तेव्हा काय पडलें हे पाहण्याकरता आपली भाकरी वगैरे गुंडाळून सर्व धनगर वर चढले तों

त्यांना एक विचित्र देखावा दृष्टीस पडला. एका झाडाखाली एक मनुष्य अस्ता-व्यस्त अशा स्थितीत पडला होता; त्याचे कपडे वगैरे जिन्नस मौल्यवान् होते, परंतु त्याचा वर्ण त्याच्या इभ्रतीला शोभण्यासारखा नव्हता. त्या धनगरांपैकी एक म्हातारा धनगर पुढे आला व त्याने त्या मनुष्याचे कपडे सोडले व त्याचे अंग तपासले, तो त्याला मनगटावर एक मोठा ओरखडा दिसला व त्याची मुद्रा जरा खिन्न झाली. त्याने एका धनगराच्या कानात काहीं सांगून दुसऱ्याला मेंढीचे दूध आणण्यास सांगितले. पंधरा मिनिटांत ते दोघे आपापली कामे बजा-वून आले. एकाने थोडासा हिरवा पाला आणला होता व दुसऱ्याने एका भाड्यात दूध आणले होते. म्हाताऱ्याने तो पाला घेऊन दुधात कालवून ते हिरवे दूध त्या मनुष्याच्या सर्व अंगास लाविले. थोडा रस तोंडात घातला व तो चोथा त्या हातावरील ओरखड्यावर दाबून धरला. हळूहळू त्या मनुष्याचा रंग बदलत जाऊन त्याची काया गौरवर्ण दिसूं लागली. श्वासोच्छ्वास सुरू झाला व तो हळूहळू सावध होऊं लागला. ते वेळी त्या धनगरास बराच आनंद झाला. तो सावध झाल्यावर त्या धनगरांनी त्याला उचलून पायऱ्याशी आणले. पुन्हा औषध पिण्यास दिले व एका झाडाखाली घोंगडी अंथरून त्याला तीवर निजविले. दोनतीन वाज-ण्याचे सुमारास त्याला चांगलीच हुशारी वाटली. नंतर त्याने ' मला स्टेशनवर जावयाचे आहे ' असे सांगितल्यावर त्याला संध्याकाळचे सुमारास स्टेशनवर गाडीत घालून नेला. हेच आपले कृष्णराव ऊर्फ अप्पासाहेब हे वाचकांना ताडलेच असेल. काय त्या वनस्पतीचा गुण ! एवढा मोठा सर्प, पण अर्ध्या तासात त्याच्या विषाचा जोर पार उतरला. अप्पासाहेबांची प्रकृति आता बरीच चांगली झाली होती; ते रेल्वे लाईन ओलांडून स्वतः स्टेशनमास्तर जवळ गेले, त्यांना तो घडलेली हकी-गत सांगितली व लहानसे बक्षिस म्हणून—त्यांच्या कामाच्या मानाने पाहिले असता ते काहींच नव्हते—खिशातून दहा रुपयांची नोट काढून त्या धनगराला दिली. त्या धनगराने त्यांना दोन चार तास झोप घेण्यास सांगितले होते. स्टेशनमास्तर फार सज्जन होता; त्याने बरात अंथरुण वगैरे घालून देऊन स्वस्थ निजण्यास सांगितले; जरा वेळ आपण तेथे बसला व त्याने त्यांची हकीगत विचारून घेतली. व ' तुम्ही आता स्वस्थ निजा. उद्यां सकाळी तुम्ही पुण्यास पोंचाल अशा गाडीने तुमची रवानगी करून देतो. तुम्ही काही काळजी करू नका. ' असें सांगून तो निघून गेला.

× × ×

( ७ )

पुण्याच्या स्टेशनवर सकाळी कोण गर्दी. साताऱ्याच्या मेलला ' सिग्नल ' दिला होता. हडपसरावर सोलापुराकडची गाडी येऊन ' लाइन क्लीअर ' मागत होती. मुंबईची गाडी पुलावर ' सिग्नल ' करता शीळ फुंकीत होती. मध्येच एक इंजिन दोन डबे बरोबर घेऊन करवलीसारखे इकडून तिकडे नाचत होते. गाड्यांचे आदरातिथ्य करण्याकरतांच की काय स्टेशनमास्तर कमरेवर हात देऊन ' प्लॅट-फॉर्म ' वर उभे होते. ' तिकीट–कलेक्टर ' आपापली शस्त्रे घेऊन दारावर उभे होते. एक ' पोर्टर ' घंटेजवळ उभा राहून मधून मधून घंटा देत होता. हमाल लोक हातगाड्या घेऊन तयार होते. अशी एकच धादल स्टेशनवर दिसत होती. सुमारें पंधरा मिनिटांत तिन्ही गाड्या स्टेशनात आल्या. आपले अप्पासाहेब मुंबईच्या गाडींतून उतरून टांगा ठरवीत होते. बाबासाहेब वगैरे मंडळी दादर उतरून फाटकाजवळ उभी होती व बाबासाहेब टांगे ठरविण्याकरितां बाहेर गेले. बरोबर गडबड्या विनूही होताच. इतक्यात ' बाबा, बाबा, तो बघा: अप्पा टांगा ठरवीत आहे ' असें विनू म्हणाला. हे ऐकून कृष्णरावास पाहून त्यांना बाबासाहेबांनी बोलाविलें व ती सर्व मंडळी गाडींत बसून चालू झाली. बाबा-साहेबांनी कृष्णरावास उशिराचें कारण विचारलें व ते अप्पासाहेबांनी इत्थंभूत सांगितलें. त्या वेळी त्या मातापितरांच्या डोळ्यांतून अश्रु चालले होते. शेवटी गाडी दादासाहेबांच्या दाराशीं येऊन थांबली. दादासाहेब कालच्या तारेची वाट पाहात काळजींत बसले होते. इतक्यांत जांवईबुवांना घेऊन खुद्द व्याहीच आलेले पाहतांच त्यांचा खेद वगैरे पार मावळला; ते गडबडीनें उठून जावईबावांना व व्याह्यांना सामोरे गेले. माईसाहेबांनीं घरात जाऊन आधीं सुनबाईची चवकशी केली व तिला पोटाशीं धरून जरा वेळ मनसोक्त रुदन केलें. माईसाहेबांच्या कडून घरांत व बाबासाहेबांच्या कडून बाहेर सर्व हकीगत कळली. सर्वांना त्या प्रसंगाबद्दल फार वाईट वाटलें; व अप्पासाहेबांना सुखरूप हजाली केलें म्हणून सर्वांनीं त्या दयाघन परमेश्वराचे व त्या धनगराचे मनापासून आभार मानले. त्या दिवशीं आमच्या यमूताईचा आनंद काय विचारावा ? ते त्या दिवशीं मंगळा-गौरीची किती मनोभावानें पूजा–हाताला हात लावून केली असेल !

पहिली मंगळागौर मोठ्या थाटाची व कडाक्याची झाली हें वाचकांस अजून सांगावयास पाहिजे काय ?




इतक्यांत 'बाबा, बाबा, ती बघा; आपला अप्पा टांगा ठरवीत आहे' असें बिनू म्हणाला. [पृ. १२

# कर्तबगारीचें बक्षीस.



( लेखकः—दत्तात्रय वासुदेव निमकर. )

१



"मालती, बाबांचें आणि माझें काल चांगलेंच भांडण झालें. त्यांचे मनांतून मीं सरकारी नोकरींत शिरावें हें फार आहे, व त्याप्रमाणें साहेबाजवळ गोष्ट काढून त्यांनीं त्यांचेकडून मला एकदम १५० रुपयांचा स्टार्टही देवविला आहे. मीं नोकरी करणार नाहीं, म्हणून निक्षून सांगतांच ते फार संतापले. मलाही राग आला व शब्दानें शब्द वाढतां त्यांनीं मला घरांतून निघून जाण्यास सांगितलें."

"माधवराव, पण एवढ्या थरावर तुम्हीं भांडण येऊं कशास दिलेंत?"

"कशाला दिलेंत म्हणजे! एकदां या गोष्टीचा सोक्षमोक्ष लागावयाचाच होता, आणि तो लवकरच लागला हें एका अर्थी बरें झालें. आमचे बाबांच्या स्वभावांत फरक पडेल व माझ्या शिक्षणाचें योग्य चीज करण्याचा अवसर ते मला मिळूं देतील अशी मला कालपर्यंत आशा वाटत होती, परंतु तसें न होतां माझा मार्ग मला एकट्यालाच शोधीत गेलें पाहिजे असा ईश्वरी नेमानेम दिसतो. असो! कांहीं हरकत नाहीं."

दोघेंही किती वेळपर्यंत तसींच स्तब्ध होतीं. माधवाची समजूत करून त्यास येथेंच ठेवून घ्यावें असें मालतीला वाटत होतें, पण त्याच्या तोंडावर चमकणाऱ्या निश्चयवृत्तीकडे पाहून तिला तसें करण्याचें धैर्यच होईना. माधवाचा स्वभाव तिला पूर्ण माहीत होता, व हा त्याचा व त्याचे वडिलांचा उडालेला खटका अगोदरच उडावयाचा, पण त्यानें आपली शिक्षणाची मर्यादा आंखून ठेविली असल्यामुळें तें पूर्ण होईपर्यंत मालती त्याला वरचेवर जागे करून वडिलांशीं जास्ती-कमी न बोलण्याबद्दल सुचवीत असे. म्हणून अद्यापपर्यंत त्यांचे भांडणाचा प्रसंग लांबणीवर पडला होता.

माधवाचे वडील नागपुरास मोठ्या हुद्याचे जागेवर होते. इंग्रजीच्या पहिल्या अमदानींत एकदोन बुकांचें शिक्षण घेऊन नोकरींत शिरलेल्या मंडळींपैकीं हे एक होते. त्यांचे घरची मूळचीं गरिबीच होती. थोडेसें शिकल्यावर लवकरच नोकरी

मिळून हे भराभर वाढत वाढत आपल्या हल्लींच्या जागेवर येऊन पोहोंचले होते. त्यांस पगार ७०० रुपये महिना मिळत असे. नोकरीशिवाय अन्यत्र बाबतींत त्यांनीं कधींच लक्ष घातलें नव्हतें व तें त्यांस आवडतही नसे. त्यांचा स्वभाव फार चमत्कारिक असे. कांहींचीं हांजी हांजी त्यांचे अंगवळणीं खिळून गेलेली असे, तरी आपले दांभिक वृत्तीस 'अनुसरून' हांजी हांजी करणें हा मोठा दुर्गुण' हे त्यांचे सर्वांस सांगणें असे. आपण मोठे करारी आहों हें जनतेस भासविण्याची ते फार खटपट करीत असत. तामसी वृत्ति हा संसारांतील एक मोठा सद्गुण आहे अशा तऱ्हेची त्यांची घरीं नेहमीं वागणूक असल्यामुळें घरांतील मंडळीस सुख अगर प्रेम काय असतें याची कल्पनासुद्धां नव्हती. आपल्या व्यतिरिक्त संसारांतील इतर माणसें म्हणजे जनावरें अशी त्यांची पूर्ण कल्पना असे. त्यांच्या सुखाकडे अगर मानसिक वृत्तीकडे लक्ष देणें म्हणजे संसारासारख्या अनित्य गोष्टींस फाजील महत्त्व देणें किंवा आपल्या दांभिक संसार-आसार-वृत्तीस कमीपणा आणण्यासारखें त्यांस वाटत असे. सर्व गोष्टींत मी शहाणा व माझ्या म्हणण्याप्रमाणें सर्व गोष्टी झाल्या पाहिजेत अशा तऱ्हेची त्यांची वागणूक असे. त्यांना खुष करण्यासाठीं कोणी कितीही काळजीनें अगर मेहनतीनें कोणतें काम केलें व तें त्यांस पसंत पडलें तरी 'तूं काम चांगलें केलेस' अशा तऱ्हेच्या उत्तेजक उद्गारांऐवजीं 'तुला कामच करतां येत नाहीं, तूं अडाणीच आहेस' हे किंवा अशाच तऱ्हेचे निराशाजनक उद्गार काढून त्याचा हिरमोड करावयाचा हा त्यांचा नेहमींचा मामुल असे. सारांश काय, तर त्यांच्या वागणुकीनें कुटुंबांतील मनुष्यांस अगर ज्यांच्याशीं त्यांचा संबंध येईल त्यांस यांचपासून सुख अगर सुखाचा शब्द कधींही मिळाला नाहीं.

माधव हा त्यांचा एकुलता एक मुलगा. तो नुकताच बी. ए. झाला होता. वडिलांचे व याचे स्वभावांत जमीन अस्मानाचें अंतर. त्याचे वडील जितके दांभिक, हेकड व गर्विष्ठ तितकाच हा मोकळा, समजूतदार व विनयशील होता. त्याचे वडिलांची त्याच्याशीं वागणूक त्यांचे स्वभावानुरूपच होती. माधव जरी चांगल्या हुषार विद्यार्थ्यांपैकीं होता, तरी त्याचे वडिलांनीं त्यास तूं हुषार आहेस असें कधींही म्हटलें नाहीं. आपल्या क्वचित् मित्र मंडळींशीं मात्र ते त्याच्या हुषारीची नेहमीं शिफारस करीत असत; व त्याचें कारण त्यांच्या सांगण्यावरून 'त्याचे हुषारीची त्याचे तोंडावर स्तुति केल्यास तो शिरजोर होऊन पुढें कदाचित् आपली अवज्ञा करणारा निघेल' अशा तऱ्हेचें असे.

माधवास समजावयास लागल्यापासून त्याचा शिक्षणविषयक हेतु फार निराळ्या तऱ्हेचा बनत चालला होता. नोकरी अगर वकीली किंवा अशाच तऱ्हेचा निरुपद्रवी धंदा हें शिक्षणाचें अंतिम साध्य नसावें असें त्यांस नेहमीं वाटत असे. आपण जन्मास आलों त्या समाजाचा, राष्ट्राचा भार शिरावर घेऊन आपलें कर्तबगारीनें त्या समाजाची व राष्ट्राची उन्नति करणें हें शिक्षणाचें खरेंखुरें ध्येय असून, त्याप्रमाणें प्रत्येक सुशिक्षिताची वागणूक असलीच पाहिजे असें त्याचें ठाम मत बनलें होतें, व अशा तऱ्हेच्या लोकांबद्दल त्यास फार गर्व वाटत असे. कॉलेजमध्यें असतांनाच शंगारिक व अशाच तऱ्हेच्या शुष्क वाङ्मयाची तो नेहमीं अवहेलना करीत असे व ह्यामुळें कित्येक वेळां तरी वार्क्षेत अगर वर्ग ( Class ) हीं त्यांस इतर विषयांत त्याची पारंगतता असूनसुद्धां, मिळत नसत.

राष्ट्राची उन्नति ही त्याची 'सांपत्तिक स्थिति व शिक्षणविषयक प्रगति' झाल्याशिवाय कधींही होत नसते अशा तऱ्हेच्या भौतिक भावना त्याच्या झालेल्या होत्या. व साधारण शिक्षण मिळाल्यानंतर ह्या तऱ्हेच्या विषयांत पडण्याचा त्याचा मनोदय होता. त्याचे वडिलांस हा त्याचा विचार अर्थात पसंत नसून, नोकरीशिवाय मनुष्यजन्माचें सार्थक असें कांहींच नाहीं असें त्यांस वाटत असे व आपल्या दुराग्रही स्वभावास अनुसरून त्यांनीं त्यास नोकरींत गोवण्याचा पूर्ण बेत केलेला होता. अर्थात् माधवास हें पसंत न पडून शिरोभागीं दिलेल्या संभाषणाप्रमाणें त्याची व त्यांची बरीच खडाजंगी उडून, माधव आपल्या तत्त्वासाठीं किंवा प्रामाणिक समजुतीसाठीं त्यांस पारखा होऊन, इच्छित कार्यसिध्यर्थ झगडण्यास एकटाच व असहाय्य असा ह्या जगांत उतरण्यास तयार झाला.

मालती ही माधवाचे शेजारीं रहाणाऱ्या आनंदरावांची मुलगी. आनंदराव तेथील सेक्रेटरीएटमध्यें दोनशें रुपये पगारावर नोकर होते. मालतीचें वय ह्या वेळीं पंधरासोळा वर्षांचें होतें. हिचे वडिल चांगले सुशिक्षित व सुसंस्कृत असून सामाजिक सुधारणेचे कट्टे भक्त होते व त्यामुळेंच अद्याप मालतीला ह्यांनीं अविवाहित ठेविलें असून जगांतील उलाढाल्या, आपली स्थिति व तदनुसार आपलें कर्तव्य ह्यांची जाणीव होण्याइतकें तिचें शिक्षण होईपर्यंत तिस तसेंच ठेवण्याचा त्यांचा मनोदय होता. माधव व मालती लहानपणीं एकमेकांच्या संगतींत वाढलेलीं असल्यामुळें त्यांचें एकमेकांवर निर्व्याज प्रेम असे, व ह्या त्यांच प्रेमास कामी प्रेमाचें स्वरूप आलेलें नसून तें अद्याप हेतुमुक्त व निर्मल असेंच होतें. माधव आपल्या

भावी आयु:क्रमाबद्दल व सुख-दु:खाबद्दल मालतीजवळ नेहमीं वाटाघाट करीत असे व ह्यामुळेंच आपलें व आपल्या पित्याचें झालेलें भांडण व आपला बेत त्यानें तीस सांगितला. ह्या त्याच्या कर्तव्यप्रेरित मनोदयास आळा घालण्यासारखी मालती अजाण नव्हती. तिनें यशस्वी होण्याची आपली मनापासूनची इच्छा त्यास कळविली, व वेळप्रसंगीं आपल्या मदतीची अपेक्षा भासल्यास ती पूर्ण केली जाईल असें त्यास आश्वासन दिलें. त्यांनीं एकामेकांचा निरोप घेतला व माधवानें आपले घराची वाट न धरतां स्टेशनची वाट धरली.

---

## प्रकरण २ रें.



वरील गोष्टीस दोन वर्षें झालीं. इतक्या अवधींत माधवाचें त्याचे वडिलांस पत्र किंवा त्याची इतर बातमी अशी कांहींच मिळाली नाहीं. जवळ ना पैसा, ना वशिला अशा स्थितींत माधव किती दिवस काढील, अखेर हातांत नाक धरून माझेकडेच त्याला आले पाहिजे 'अशा तऱ्हेच्या घमेंडींत त्याचा बाप होता. मुलगा नाहींसा झाल्याबद्दलचें तिळमात्रसुद्धां दुःख आपणास झालें आहे अगर होत आहे हें त्याच्या वर्तनावरून दिसत नव्हतें. पिता व पुत्र ह्यांच्यामध्यें ईश्वरप्रेरित प्रेमतंतूचा धागा असतो कीं नाहीं ह्याच्या सत्यतेबद्दल, जनतेला त्यांच्या या निष्ठुर वागणुकीनें, संशय यावयास लागला होता. मुलाचें नांव कोणीं काढलें कीं त्यांचे पायांची आग मस्तकास जाऊन, त्याला ते सहस्रशः अपशब्दानें ताडण करीत असत व आपणा स्वतःपेक्षां आपल्याला मुलाची किंमत नाहीं असें ते स्पष्ट बोलून दाखवीत असत. त्यांस इतकें चेकाळण्याचें कारण माधव नाहींसा झाल्यावर तेथील एका स्थानिक पत्रानें त्यांच्यावर यथेच्छ तोंडसुख घेतलें असून त्यांनीं कोर्टाच्या पायरीची धमकी दाखवितांच त्यास आपली तयारी असल्याचें त्या पत्रचालकानें स्पष्ट कळवून त्याचें आव्हानाला कबुली दिली होती. माधवासारख्या हुशार व होतकरू मुलाचा भावी आयुष्यक्रम आपल्या हेकेखोर वर्तनानें दुर्घट केल्याबद्दल तेथील समंजस आम्ल अधिकारीवर्गेही त्यांस दोष द्यावयास लागला होता. कोर्टाची पायरी चढून जास्ती छीः थू करून घेणें त्यांस बरें वाटलें नाहीं. कोर्टांतील सार्वजनिक परिस्फोटाच्या छीःथू पासून जरी माधवाच्या वडिलांनीं आपला बचाव करून घेतला होता तरी जनतेस त्यांच्या स्वभावाची चांगली पारख झाली असून माधवाशीं त्यांच्या झालेल्या वागणुकीबद्दल सर्वजण त्यांजकडे तिरस्कारानें पाहूं लागले.

जनतेच्या तिरस्कारास आपल्या मुलामुळें आपण पात्र झालों याबद्दल ते माधवाचा जास्तीच तिरस्कार करूं लागले. आपल्या गर्हणीय वर्तनानें असें झालें याजबद्दल त्यांस कांहींच वाईट वाटत नसून, आपण केलें तें योग्यच केलें अशी ते आपल्या मनाची समजूत करून घेत असत.

माधवानें घरांतून बाहेर पडल्यापासून आपल्या आयुष्यांतील एक दिवसही आपले अंतिमध्येयप्राप्तीच्या प्रयत्नाविना फुकट जाऊं दिला नाहीं. ह्या अवधींत हिंदुस्थानच्या सांपातिक, राजकीय, धार्मिक, सामाजिक ऱ्हासाचे अध्ययन करण्यांत त्यानें आपला सर्व काल घालविला. उपजीविकेसाठीं त्यानें एका शाळेंत नोकरी धरली होती व मधून मधून वर्तमानपत्रें व मासिकें यांत लेख लिहून तो नोकरीशिवाय थोडा-बहुत पैसा मिळवीत असे. त्यानें हा सर्व काल बंगालमध्यें घालविला व तेथें तो टोपण नांवाखालीं राहात असे. त्याचे लेखसुद्धां टोपण नांवानेंच प्रसिद्ध होत असत. आपलें खरें नांव झांकून ठेऊन टोपण नांवानें राहण्यांत आपले वडिलांस किंवा परिचित मनुष्यास आपला पत्ता लागूं नये हा त्याचा हेतु होता. वडिलांचा दीर्घद्वेषी स्वभाव त्यास पूर्णपणें माहीत असल्यामुळे आपला पत्ता लागल्यास आपणास त्रास देण्यास ते कमी करणार नाहींत अशी त्याची पूर्ण खात्री होती. त्याचे लेख मुद्देसूद, अर्थपूर्ण व निर्भीड असल्यामुळें हिंदुस्थानांतील सुशिक्षित कार्यकारी मंडळांत टोपण नांवानेच त्याची फार ख्याति झालेली होती. हिंदुस्थानच्या उन्नतीसाठीं पुढें करावयास लागणाऱ्या कार्यासाठीं त्यानें पूर्वतयारी चांगलीच करून ठेविली होती.

माधवानें घरून गेल्यापासून मालतीस देखील पत्र लिहून आपली बातमी दिलेली नव्हती. ह्या दोन वर्षांच्या कालांत मालतीच्या, त्याच्या संबंधाच्या विचारक्रमांत बराच फेर झालेला होता. त्याच्यासारख्या हुशार मनुष्याच्या विद्वत्तेची अगर बुद्धीची प्रत्यक्ष त्याच्याच बापानें राखरांगोळी करावी व त्याच्याशीं प्रखर शत्रुत्वाची वागणूक धरावी ह्याजबद्दल तीस फार वाईट वाटत असे. त्याच्याबद्दल प्रथम तिच्या मनांत अनुकंपाप्रेरित विकार यावयास लागले; तर पुढें त्याची मर्दानी वागणूक पाहतां त्याच विकारांचें रूपांतर त्याचेबद्दल गर्व वाटण्यांत होऊं लागलें, व ह्यानें तिच्या त्याच्या संबंधाच्या हेतुमुक्त व निर्मल प्रेमाचें स्वरूप बदलून तें हेतुयुक्त व विकारी व्हावयास लागलें. 'वस्तु जवळ नसतांना तिच्या विषयींची आस्था व आवड वाढत असते' हा मनुष्यस्वभावाचा धर्म आहे, व त्याला मालती अपवाद नव्हती. पहिल्यापेक्षां माधवाविषयींची आस्था व

भावड मालतीला जास्ती वाटावयास लागली; व एकदां त्याच्याविषयींच्या निर्मल प्रेमाला प्रणयी प्रेमाची छटा मिळाल्यानंतर त्याच्याच चिंतनानें त्या प्रणयी प्रेमाची सारखी वाढ होत चालली. मनोभावें तिनें आपलें सर्वस्व माधवाला अर्पण केलें. तिच्या प्रेमाचा प्रवाह निश्चल व शांत असून त्याचा उगम क्षणैक उचंबळणाऱ्या मनोवृत्तीपासून झालेला नसून तो बाळपणच्या निर्मल व अचल बाल्य प्रेमापासून झालेला होता.

शिक्षणाच्या दृष्टीनें विचार करतां मालती ह्यावर्षी मॅट्रिकमध्यें होती. तिचें अवांतर वाचनही बरेंच झालेलें होतें. आपला भावी आयुष्यक्रम माधवाचे संगतीनें घालविण्याचें तिच्या मनानें घेतलें. अर्धांगी पद सार्थ करावें व त्याच्या अंगीकृत कार्यास आपणास मदत करता यावी, म्हणून त्याच्या आवडीच्या हिंदुस्थानाविषयींच्या सांपत्तिक वगैरे वाङ्मयाचा तिनें चांगलाच अभ्यास केलेला होता. रमेशचंद्र दत्त, बानर्जी, डिग्बी. काटन, दादाभाई रानडेप्रभृति विद्वानांच्या लेखांचा व ग्रंथांचा संग्रह तिनें आपल्याजवळ केलेला होता. एवंच काय तर, माधवाच्या सहवासांत कर्तबगारी करतां करतां आयुष्याचा योग्य उपयोग करण्याचा माधवाप्रमाणें तिनेंहि निर्धार केलेला होता.

माधवाला वरण्याचा जरी आपले मनाशीं मालतीनें निश्चय केला होता, तरी त्याची तिनें अद्याप परिस्फुटना केली नव्हता. मालती सुशिक्षित व सुस्वरूप असल्यामुळें प्रौढविवाहेच्छु कितीतरी तरुण तिची अपेक्षा करीत असत. ह्या तरुणांपैकीं पुष्कळ धनदांडगे व कुलीन असून त्यांपैकीं कित्येक तर विश्वविद्यालयांत नाव मिरविलेले असे होते. ह्या सर्व मंडळींना कोणी मित्रांचे मदतीनें, कोणी त्रयस्थाच्या मध्यस्तीनें, तर कोणी प्रत्यक्ष पत्रद्वारें तिच्या बापाजवळ तिजबद्दल मागण्या घातल्या होत्या. आनंदराव ह्या सर्वांस एकच जबाब देत असत आणि तो हा कीं, " हें बघणें माझें नसून प्रामुख्यानें माझ्या मुलीचें आहे व तिच्या सुखाची जबाबदारी असणाऱ्या माझ्या संमतीपेक्षां त्यांत मला जास्ती अधिकार नाहीं. तेव्हां तुम्हीं ह्या बाबतींत इतःपर माझ्याशीं पत्रव्यवहार व बोलणें करण्यापेक्षां माझ्या मुलीशीं केल्यास बरें." आनंदरावाचा हा जबाब देण्यांत अंतस्थ हेतु होता. पण त्या तरुणांना तो कोठून ठाऊक ! त्यांना हें आनंदरावाचें करणें अगदीं अयोग्य व चालीरीतीस सोडून करण्यासारखें दिसत असे.

आमचे इकडे प्रौढविवाहाची चाल जरी हळू हळू प्रचारांत येत चालली आहे तरी तिचें स्वरूप मुलीच्या लग्नाची वयमर्यादा १२।१४ वर्षांपलीकडे ढकलण्यापेक्षां

अद्याप दुसरें नाहीं. उज्वल प्रेमाचा विकास करण्याइतकी मोहकता अद्याप आमच्या इकडील प्रचलित प्रौढविवाहांत आलेली नाहीं. बालविवाहाइतकीच त्याची योग्यता आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. विवाह झाल्यानंतर परस्परांच्या मनांत प्रेमतरंग यावयास लागतात व त्यांचे स्वरूप अर्थात् विपर्यास असतें, यांत शंका नाहीं.

आनंदरावानें मालतीसंबंधीं मागण्या घालणाऱ्यांस वरील तऱ्हेचें उत्तर दिल्यानंतर बऱ्याचजणांचा हिरमोड झाला. लग्नसंबंधानें प्रत्यक्ष मालतीजवळ गोष्ट काढण्याचें कोणासच धैर्य होईना. कित्येकांनीं प्रणयपत्रिका लिहून तीस आपला मनोदय कळविण्याचें धाडस केलें होतें. या सर्वांच्या प्रणयपत्रिकांस मालतीनें देखील आपल्या वडिलांप्रमाणें एकाच तऱ्हेचें उत्तर दिलें. "आपणांस माझे स्वभावाची व मला आपले स्वभावाची ओळख नाहीं. तेव्हां अशा स्थितींत अजाण मनुष्याबरोबर विवाह करून एकमेकांच्या विचारांचा जम न बसल्यास पुढें आपलें आयुष्य त्रासदायक करून घेणें मला प्रशस्त दिसत नाहीं; करितां आपल्या पूर्ण माहितींतील एखाद्या कुमारिकेबरोबर आपण विवाह करून आपला भावी संसार सुखाचा होईल असें करावें. लग्नासंबंधीं तरी माझें मन वरील प्रकारचें असल्या कारणानें आपल्या मागणीचा मला स्वीकार करतां येत नाहीं, ह्याबद्दल मी फार दिलगीर आहे."

असें उत्तर मिळाल्यावर अर्थात् सर्वांचा हिरमोड होऊन कोणी तिच्या शिक्षणाचे माथीं व कोणी तिच्याविषयीं कुत्सित तर्कवितर्क काढून तिच्या (त्यांचे दृष्टीनें) निमवट बापाचे माथीं त्याचें खापर फोडूं लागले. त्यांपैकीं जे समंजस व थोर मनाचे होते त्यांनीं ह्या तिच्या स्पष्टोक्तिबद्दल तिची तारीफच केली.

तिला मागणी घालणारांमध्यें शामराव नांवाचा एक गृहस्थ होता. हा मनुष्य सी. आय्. डी. मध्यें इन्स्पेक्टर असून तिकडील एका नामांकित मालगुजाराचा मुलगा होता. त्याचें शिक्षण एफ्. ए. पर्यंत झालेलें असून जवळ जवळ तीन वर्षांपासून तो पोलिसच्या नोकरींत होता. त्याचे मनावर शिक्षणाचा सुपरिणाम असा कांहींच झालेला नव्हता. सात्विक विकारांची त्याला ओळखसुद्धां नव्हती. घरच्या श्रीमंतीनें व बापाचे वशिल्यानें त्याला नोकरी मिळालेली असून त्यांनींच त्याची अद्यापपर्यंतची बढती झालेली होती. मालतीविषयीं हा फार आसक्त झालेला होता, व आपल्या श्रीमंतीच्या व नोकरीच्या भरावर ती आपणास माळ घालील अशी त्याला खात्री होती. तिच्या बापाच्या व नंतर

तिच्या मिळालेल्या उत्तरानें स्वस्थ न होतां प्रत्यक्ष मालतीजवळच त्या गोष्टीचा खुलासा काढण्याचा त्यानें बेत केला होता. आपलें सौंदर्य, वयमान, श्रीमंती व मानाची नोकरी, वगैरे परिस्थितीचा पगडा तिच्या मनावर बसल्याशिवाय रहावयाचा नाहीं याची त्याला पूर्ण खात्री वाटत होती.

मालतीच्या वडिलांकडे त्यानें आपलें जाणें-येणें हळूहळू सुरू केलें. ह्या वेळीं फावल्यास मालतीजवळ दोनचार शब्द बोलण्यास तो कमी करीत नसे. मात्र त्यानें विशेष सलगी अगर सभ्यतेचें उल्लंघन असें कधींच केलें नाहीं.

त्याच्याशीं बोलताना मालतीचा चेहरा निर्विकार असे. तिच्या त्या गंभीर चेहऱ्याकडे पाहून मनांतील इच्छित गोष्ट बोलण्याचें शामरावास धैर्यच होत नसें. पोलिसाच्या चाकरींत जरी वाटेल तशीं अमानुष क्रूर कर्मे करण्यास त्यास दिक्कत वाटत नसे, तरीसुद्धां मालतीसारख्या अबलेजवळ मनांतील इच्छित गोष्ट बोलण्याचें त्यास धैर्य होत नसें. याचें कारण पाहूं गेल्यास शामरावापेक्षां वरच्या पायरीचें मालतीचें नैतिक वर्तन व सुशिक्षणांतर्गत सुसंस्कृति यांशिवाय काय असणार. सत्तेच्या जोरावर अनीतिचें वर्तन करणाऱ्या मनुष्याची एखाद्या नैतिक व सुसंस्कृत मनुष्याशीं [ जेथें त्याच्या सत्तेचा काडीमात्र उपयोग होण्यासारखा नसतो असा ] प्रसंग पडला म्हणजे त्याची अशीच स्थिति होते. त्याची सत्ता त्यास येथें पाठिराखी नसते. तो हतवीर्य बनतो.

शामराव बोलूनचालून पोलिसगडीच. मोठ्या धैर्यानें त्यानें मालतीजवळ अखेरीस आपला मनोदय प्रगट केला.

" शामरावपंत, मला वाटतें या बाबतींत मी तुम्हांस अगोदरच पत्रद्वारें माझा विचार कळविला आहे. " मालतीनें शांतपणानें त्यास सांगितलें.

मालती व शामराव दिवाणखान्यांत बोलत बसलीं होतीं.

आनंदराव कचेरींतून घरीं आले, त्यांनीं मालतीच्या हातीं पत्रें दिलीं. त्यांपैकीं एकावर खासगी व जरूरीचें असें लिहिलेलें होतें. शामरावशीं बोलणें लांबविण्याचा मालतीचा मनोदय नव्हता. म्हणून तिनें त्यांतील पत्रें फोडून वाचण्यास सुरुवात केली.

मालतीचीं पत्रें वाचून झाल्यानंतर ती आपणाशीं बोलेल या लोचट आशेनें शामराव तेथेंच बसून राहिला.

पहिलेंच पत्र वाचल्यावर मालतीच्या मुद्रेवर आश्चर्याचा विकार स्पष्ट दिसूं लागला. ह्या विकाराचें पर्यवसान हळू हळू निश्चयीपणांत झालें. पहिलें पत्र वाचून झाल्यावर एकवार भेदक व तीक्ष्ण नजरेनें तिनें शामरावकडे पाहिलें.

शांतपणानें तिनें दुसरें पत्र फोडून वाचण्यास सुरवात केली. तिला आनंद होत असल्याचें तिच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होतें तें पत्र तिनें कितीदां तरी वाचलें

" अखेरीस माझी आठवण झाली म्हणावयाची......"

तिच्या तोंडांतून आणखी उद्गार बाहेर पडावयाचे, पण इतक्यांत तिची दृष्टि शामरावाकडे गेली व आपण एकांतात नाहीं याची तिला आठवण झाली.

आपणास मिळालेल्या पत्रांचीं उत्तरें आपणास आतांच्या आतां पाठवावयाचीं आहेत असें सांगून तिनें शामरावास निरोप दिला.

शामराव खिन्नांत:करणानें तेथून चालता झाला.

मालतीस आलेल्या वरील दोन पत्रांपैकीं एक माधवाचें असून दुसरें एका अज्ञ मनुष्याचें होतें. व त्यात मालतीस शामरावाच्या मिष्ट भाषणापासून आपला बचाव करून घेण्याची सूचना केलेली होती.

---

## प्रकरण १ रें.



" अ. आशिर्वाद. मी तेथून निघून आल्यास आज दोन वर्षे झाली. या दोन वर्षांत माझे पश्चात् नागपुरास किती तरी घडामोडी झाल्या असतील. तुझें लग्नही कदाचित् झालें असेल. माझ्याबद्दल वाटेल तसे तर्कवितर्क तेथे उठले असतील. कदाचित् माझे जीवितताबद्दलसुद्धां कित्येकांस शंका येत असेल माझे वडिलांच्या स्वभावांत कदाचित् माझ्या निष्ठुर वागणुकीनें फरक पडला असेल व त्यांस आपले वर्तनाबद्दल पश्चाताप वाटत असेल. माझ्या स्तब्धतेनें तुझ्या व आनंदरावाच्या कोंवळ्या मनास किती तरी खेद झाला असेल. माझ्या कृतघ्नतेबद्दल मी तुमच्या तिरस्कारासही पात्र झालों असेन. पण ह्या सर्व गोष्टी-बद्दल माझा नाइलाज होता. अंगीकृत कार्यांत व्यत्यय येऊं नये म्हणून मोठ्या जुलमानें मला अद्यापपर्यंत मौनव्रत धरणें जरूर होतें. तुझ्यासारख्या संमंजस मुलीस जास्ती फोड करून सांगण्याची जरूरी नाहीं.

" तेथून निघाल्यापासून माझ्या भावी आयुष्याच्या पूर्व तयारींत मी गेलीं दोन वर्षें घालविलीं. खर्चास लागणारे पैसे मिळविण्याशिवायचा सर्व काल, मी हिंदुस्थानच्या भौतिक, सामाजिक व राजकीय वगैरे पूर्वकालीन व वर्तमानकालीन परिस्थितींच्या अभ्यासांत घालविला असून त्याचा लाभ साधारण जनतेस व्हावा; म्हणून वर्तमानपत्रें व मासिकें यांत लेखही लिहिण्यास सुरवात केलेली आहे.



शामराव खिन्नांतःकरणानें तेथून चालता झाला. [पृ. १३८]

मीं इकडे टोपण नांवाखालींच रहात असून माझे लेखही त्याच नांवानें प्रसिद्ध होतात.

" आणखी एक वर्ष सर्व हिंदुस्थानचा प्रवास करण्यांत घालवून सर्वत्रांच्या व वडिलांचे भेटीस येण्याचा विचार आहे व तोंपर्यंत तुझ्याकडून पत्रद्वारें भेट मिळत जाईल ही आशा आहे. तुझें लग्न झालें असल्यास कळवशीलच. रा. आनंदरावांस माझा सविनय प्रणाम कळविणें. माझे वडिलांचा क्रोधाग्नि शांत झाला असल्यास त्यांस माझी खुशाली कळविणें. मात्र माझा पत्ता अगर हें पत्र त्यांस दाखवूं नये. कळावें, पत्राचें उत्तर यावें हे आशिर्वाद." ता. १४ मे १९०४.

**पत्ता**:—पंडित सदानंदजी.

हिंदु लॉज, राधाचरण स्ट्रीट. तुझा,

कलकत्ता. **माधव.**

" सेवेशी विज्ञापना. आपलें ता. १४ चें पत्र पाहून फार आनंद झाला. आपल्या द्विवार्षिक स्तब्धतेबद्दल आपला खुलासा वाचल्यानतर आपणांस दोष देणें मूर्खपणाचें काम होय. आपल्या अंगीकृत कार्याबद्दलची आपली चिकाटी, कळकळ व आपलें मनोधैर्य आपणांस भूषणावह आहे. आपलेसारख्यांकडूनच राष्ट्रीय प्रगतीचें कार्य होईल.

" माझ्या लग्नाबद्दल आपण लिहिलेंत तरी मी अद्याप अविवाहितच आहें व आपल्या विचारांत जुळणारा संसारांतलि भागीदार मिळेपर्यंत याच स्थितींत राहण्याचा माझा इरादा आहे.

" आपण गेल्यानंतर माझ्या अभ्यासक्रमांत चांगलीच प्रगति झालेली असून यंदा मॅट्रिकला बसण्याचा माझा विचार आहे. शिक्षणामुळें आपलेप्रमाणें माझेही विचार बनत चालले असून दत्त, दादाभाई, रानडेप्रभृति विद्वानांचे लेख व ग्रंथ यांचे अध्ययनांत मी आपला काल घालवीत असतें, व ईश्वरकृपेनें जमल्यास आपले पुढील कार्याचा अंशतः तरी भार शिरावर घेण्याची माझी फार इच्छा आहे.

" आपले जाण्यापासून आपले वडिलांचा आपलेवर फार रोष झालेला आहे. यामुळें आपले सांगण्याप्रमाणें आपली खुशाली त्यांस मीं कळविली नाहीं.

वरचेवर पत्रद्वारें खुशाली कळवीत जाणें."

नागपूर १७ मे १९०४. आपली,

**मालती.**

ताजाकलमः—हेंच पत्रीं माझे वडिलांचे आपणांस सप्रेम आशिर्वाद लिहिण्याबद्दल त्यांनीं मला सांगितलें असून आपले कार्याबद्दल त्यांची पूर्ण सहानुभूति आहे.

माधवाचें आलेलें पत्र व आपण त्यांस लिहिलेलें उत्तर हीं दोन्हींहीं मालतीनें आपले वडिलांचे हातीं दिलीं.

माधवाचें पत्र पाहून आनंदरावांस फार आनंद झाला. पुत्र असावा तर तो माधवासारखाच करारी व कर्तबगार असावा. असें त्यांस वाटणें साहजिक होतें. आपणांस मुलगा नाहीं, असता तर तो माधवाचे संगतीनें तसाच निघाला असता व आपण त्याला तसेंच वळण दिलें असतें असा त्यांच्या मनांत विचार येऊन त्यांचे मन जरा खट्टू झालें. मुलाऐवजीं मुलगी, तीही चांगली व माधवाप्रमाणेंच आपल्या आयुष्याची सार्थकता करणारी असल्यानें ते आपल्या मनाचें जरी सांत्वन करीत असत, तरी पण मुलाशिवाय कुळाचें नांव चालून त्याचें सार्थक होत नाहीं ह्या तऱ्हेची पौराणिक कल्पना त्यास कधीं कधीं त्रास देत असे.

माधवाचें पत्र वाचून वरीलप्रमाणें त्यांचे मनांत विचारतरंग यावयास लागून त्याचें प्रतिबिंब त्यांच्या सदानंदी चेहऱ्यावर अस्पष्ट दिसावयास लागलें.

माधवाचें पत्र वाचून आनंदरावांचे चेहऱ्यांत झालेला बदल पाहून मालती घोटाळ्यांत पडली. आपले वडिलांस माधवाचें करणें पसंत नसेल याची तिला खात्री येईना व त्यांच्या मुद्रेवरील विकाराचें तिस दुसरें कारणही सांपडेना.

आनंदरावांनीं मालतीचें उत्तर वाचलें. तें वाचतांच त्यांच्या चेहऱ्यावरील खिन्नता जाऊन तेथें आनंदाचें व गर्वाचें हास्य व अहंपणा चमकूं लागला.

ताज्याकलमांत लिहिलेला मजकूर त्यांनीं मालतीस माधवाचे पत्रांत लिहिण्यास सांगितला व माधवाची व तिची त्यांच्या योग्य मनोवृत्तींबद्दल तारीफ करून माधवाप्रमाणेंच, संकटकालीं न डगमगतां, धैर्यानें आपला मार्ग काढण्याबद्दलचा तिस योग्य कर्तृत्वोपदेश केला.

मालतीनें दुसरें पत्र आपले वडिलांजवळ दिलें. तें वाचून त्यांना चमत्कारिक वाटलें.

" तरीच शामराव आतां आपलेंकडे वरचेवर येत असतो. मला त्याच्या हेतूबद्दल अस्पष्ट कल्पना आलेली होती. " आनंदराव म्हणाले.

" शिवाय त्यानें आज मजजवळ गोष्टही काढली होती; परंतु इतक्यांत तुम्ही येऊन हीं पत्रें मला दिलीत " मालती म्हणाली.

" बराच धीट आहे म्हणावयाचा तर ! बरें, पण तूं त्यास काय उत्तर दिलेंस ? "

" बाबा, उत्तर ते काय दुसरें द्यावयाचें, मागील त्याच्या पत्राला जें उत्तर दिलें तेंच. मला नाहीं वाटत, ह्याबद्दल तो पुन्हा मजजवळ बोलण्याचें धाडस करीलसें. बरें, तें असो. पण ह्या पत्र लिहिणाऱ्याचा हेतु काय असावा ? त्याचें व शामरावचें वांकडें आहे म्हणून किंवा चांगल्या हेतूनें प्रेरित होऊन त्यानें हें पत्र लिहिलें असावें. "

" त्यानें कोणाच्या कां हेतूनें लिहिलें असेना; पण शामरावसंबंधीं मला जी माहिती आहे त्यावरून तो मनुष्य चांगल्या स्वभावाचा नाहीं व ह्या दृष्टीनें पाहतां या गृहस्थानें चांगल्याच हेतूनें हें पत्र लिहिलें असावे असें मला वाटतें. "

" असें असेल तर, मला वाटतें, बाबा, येथील दैनिकांत आपण ह्या मनुष्यास उत्तर देऊं; त्याचे आभार मानावयास पाहिजेत. "

" बरें तर, कर तसें. " आनंदरावांनीं उत्तर दिलें.

दुसऱ्या दिवशीं तेथील दैनिक वृत्तात खालील मजकूर प्रसिद्ध झाला.

" हितचिंतकास–आपल्या महत्त्वाच्या पत्रभेटीबद्दल व सूचनेबद्दल फार आभारी आहें. गरीब भगिनीची वरचेवर अशीच काळजी घेत असावी. आ. मा. "

माधवाच्या पत्राप्रमाणें त्यानें आपल्या प्रवासास सुरुवात केली होती. ज्या ज्या ठिकाणीं तो जाई त्या त्या ठिकाणीं त्याच्या लेखप्रसिद्धीमुळें त्याला अडचण अशी कोणचीच पडली नाहीं. मोठमोठ्या कर्त्या हिंदी गृहस्थांशीं त्याची ओळख वाढून ठिकठिकाणच्या सद्यःस्थितीबद्दल प्रत्येकजण त्याच्याशीं मन मोकळें करून बोलत असे. त्यांत हिंदुस्थानच्या स्थितीविषयीं अधिकारयुक्त वाणीनें बोलण्याचा अधिकार असलेल्या मंडळींच्या भावी स्थितीबद्दलच्या विचारांची अगर ती स्थिति चांगली कशी घडवून आणावी या विषयींच्या कार्यक्रमाची व ह्याच्या विचार व कार्यक्रमाची सात्त्विक अदलाबदल होत असे. त्यांच्या होणाऱ्या वादास अहंमन्यतेचें विकारी स्वरूप नव्हते. त्या वादांची दिशा व उद्देश आपल्या देशाची उन्नति कशी होईल या दृष्टीची असे. सध्याच्या परिस्थितींत–देशाच्या अशिक्षित स्थितींत–बहुतेक जनसमाज अशिक्षित असतां आपण त्याच्यापुढें कितीही ओरडून भौतिक जागृतीच्या आवश्यकतेचें स्वरूप मांडलें तरीसुद्धां त्यांचे मनांवर त्यापासून कांहींच परिणाम व्हावयाचा नाहीं असें जरी त्यास वाटत असें, तरीसुद्धां व्याख्यान व लेख ह्यांनीं जनसमूहजागृतीच्या आपल्या कामाचा त्यानें कधीं कंटाळा केला नाहीं. वेळ संधि सांपडेल तेथे त्याचीं व्याख्यानें होतच असत. ह्या त्याच्या व्याख्यानांत अशिक्षित वर्गाच्या अपरिहार्य अज्ञानाबद्दल तो त्यास

कळकळीनें उपदेश करून ' शिक्षण घेतल्याशिवाय जगांत मनुष्याचा तरणोपाय नाहीं ' हें मोठ्या जोरदार शब्दांत, त्यास समजतील असेंच दाखलें देऊन प्राकृत भाषेंत समजावून सांगत असे.

आशिक्षित वर्गाबद्दल तो जितक्या सौम्यतेनें बोलत असे तितक्याच किंवा त्याहीपेक्षां जास्तीं निष्ठुरतेनें तो सुशिक्षित समाजाचा तोंडसुख घेत असे. सुशिक्षित समाजापैकीं वकील वगैरे मंडळींच्या नैतिक अधःपाताबद्दल तो त्यांस फार दोष देत असे. सुखवस्तु, पण सुशिक्षित मंडळींस ते आपलें कर्तव्य योग्य बजावीत नाहींत म्हणून त्यांचें शिक्षण म्हणजे जनाहितदृष्टीनें उकिरड्यांतील तेजोमय रत्न असें तो स्पष्ट सांगत असे. राष्ट्राची व समाजाची उन्नति करण्याचें खरें काम यांचें असतां त्यांनीं तें योग्य रीतीनें न बजाविल्यामुळें यांच्या लक्ष्मीचा व सरस्वतीचा उपयोग यांची अवनति करण्यांत नयकंत सर्वसाक्षी ईश्वर करतो तें बरोबरच आहे, असें तो मोठ्या जोरानें प्रतिपादन करीत असे. " शिक्षणाचें ध्येय जनसमूहहिताला सर्वस्वी विरोधी असणाऱ्या व स्वतःची सांपत्तिक स्थिति सुधारणाऱ्या वकीली, वैद्यगिरी, नोकरी, वगैरे गौण पेशाचें नसून तें राष्ट्राची स्थिति, त्याची इभ्रत, त्याचा मान, त्याची कर्तबगारी, त्याचा बुद्धिविकास व त्याची जागृति करण्याचें आहे " हें प्रत्येक समंजस मनुष्यास समजावयास लागून त्याप्रमाणें त्यानें आपलें वर्तन ठेवलें पाहिजे अशा तऱ्हेचा त्याच्या व्याख्यानाचा उगर लेखाचा समारोप असे.

माधवाचा वर्तनक्रम ह्याप्रमाणें चालू असतां इकडे मालतीही स्वस्थ बसलेली नव्हती. नागपूर व वऱ्हाड ह्या भागांत ठिकठिकाणीं जाऊन तेथील स्त्री-वर्गाच्या सामाजिक, शिक्षणविषयक, व नैतिक स्थितीचें अवलोकन करून या स्त्री-वर्गाची उन्नति कशी करतां येईल याचा विचार करीत असे. सुशिक्षित स्त्रिया कोणती पुस्तकें वाचतात हें पाहून तीं अयोग्य असल्यास त्यांनीं कोणतीं वाचावीं हे त्यास नीट समजावून सांगत असे. स्त्रियांच्या हातांत पडणाऱ्या वृत्तपत्रांतून व मासिकांतून राष्ट्रीय दृष्टीनें स्त्रियांची उन्नति कशी होईल याविषयीं ती नेहमी मार्मिक लेख लिहीत असे. राष्ट्रांतील स्त्रियांची योग्यता, त्यांचा सामाजिक दर्जा, भावी पिढी निर्माण करण्याची त्यांचेवरील जबाबदारी, गृहिणीपद, वगैरे स्त्रीजातीसंबंधीविषयांवर ती त्यांजपुढें नेहमीं व्याख्यानें देत असे. त्यांची पुराणप्रियता, अंधधार्मिक कर्मश्रद्धा, अनाठायीं दातृत्वता, वगैरे नाजुक बाबींसंबंधानें बोलतांना त्यांच्या मनोवृत्ति न दुखावतां आपलें कार्य साधेल अशाच तऱ्हेची

तिची भाषासरणी व विषयप्रतिपादनशैली असे. परीक्षेचा नाद तिने आता सोडून दिला होता, व आपल्या सर्व कालाचा उपयोग ती वरीलप्रमाणे करीत असे.

आनंदराव व माधव यांची तिला पूर्ण सहानुभूति असून प्रसंगविशेषीं तिच्या अडचणी दूर करण्यांत ते तिला मनोभावें सहाय्य करीत असत.

मालती सर्व नागपूर व वऱ्हाड प्रांताची ललामभूत लक्ष्मी झाली होती, व त्याला योग्य अशीच तिची कृति असे.

---

## प्रकरण ४ थें.



कर्तव्यस्फूर्तीने मालतीचें कार्यक्षेत्र जसजसें विस्तृत व्हावयास लागून तिची कीर्ति दिगंत नाचावयास लागली, तसतशी शामरावाची तिजसंबंधीची लालसा वाढत चालली. त्याचा तिजविषयींचा प्रेमविकार नैतिक व स्वर्गीय स्वरूपाचा नसून त्याचा उगम अनीतिमान कामेच्छा व मालतीच्या लौकिकावरून तिच्याविषयींचा हव्यास या क्षुद्र मनोवृत्तीपासून होता. तिजविषयींच्या त्याच्या लालसेस प्रेम म्हणणें म्हणजेसुद्धां प्रेमशब्ददर्शक उच्चतम मनोभावनेची अवहेलना करण्यासारखें होय.

शामरावचें आनंदरावांकडे अद्याप येणें–जाणें असेच, व त्या दोघांची त्याजबरोबरची वागणूक घरोब्याच्या मनुष्याप्रमाणें प्रेमळ जरी नव्हती तरी तिचें स्वरूप शिष्टाचारास सोडून नव्हतें. आनंदरावांच्या स्वभावाची येवढ्या अवधीत त्यास पूर्ण पारख झाली होती. तेव्हां त्याजजवळ आपला मनोगत विचार प्रगट करणें त्यास अशक्य होतें. योग्य संधि सांपडतांच मालतीजवळच पुनर्वाच्यता करण्याचा त्याचा मनोदय होता. त्याच्या इच्छेप्रमाणें अखेरीस योग आला. आनंदराव कांहीं कामासाठीं बाहेर गांवीं गेलेले होते. घरांत मालती व नोकरचाकर यांजशिवाय दुसरें कोणी नव्हतें.

" मालती......" त्याच्या तोंडांतून जास्ती शब्दच निघेनात. त्याच्या बोलण्याचा आशय त्याच्या मुखचर्येवर स्पष्ट मुद्रित झाला होता.

भेदक दृष्टीनें मालतीनें त्याच्याकडे पाहिलें. तिच्या त्या तीक्ष्ण दृष्टीस दृष्टी मिळविण्याचें त्यास धैर्यच होईना. गोंधळून तो खालीं पाहूं लागला.

"शामराव, आपण ह्या अयोग्य विषयावर पुन्हा संभाषण काढून आपल्या माणूसकीस लाज मात्र आणतां. एकदां नव्हे तर तीनदां ह्या प्रश्नाचें आपणांस उत्तर मिळालें असतां त्याची पुनर्वाच्यता करणें आपणासारख्यांस शोभत नाहीं. नैतिक दृष्टीनें तर हें फारच गर्हणीय होय; त्यांतून आपण शिकलेले, घरंदाज व सरकारच्या विश्वासू जबाबदारीच्या नोकरींतले. अज्ञजनांसारखी आपली स्थिति नव्हे. आपण या विषयासंबंधानें पुन्हा मजजवळ बोलाल अशी मला कल्पना देखील नव्हती, व आपल्या ह्या वागणुकीनें आपल्यासंबंधाचा माझा ग्रह आनष्ट झाला असून, आपण ह्या आशेनेच जर माझ्या स्नेहाची इच्छा धरीत असाल तर आपल्या स्नेहाची मला जरूरी नाहीं व आपण आमचे येथें न याल ततके दोघांसही चांगलें."

मालतीच्या या तिरस्कारयुक्त स्पष्टोक्तीनें शामराव जागचे जागीं थिजून गेला. त्यावर प्रत्युत्तर देण्याचें अगर आपल्या मागणीच्या शिफारशीसाठीं दोन शब्द बोलण्याचें त्यास धैर्य झालें नाहीं.

मालती खिडकीत बसलेली होती. ती तेथून उठून दोन पावलें पुढें येतांच एखाद्या भ्रमिष्ट व घाबरलेल्या मनुष्याप्रमाणें तो झटकन दिवाणखान्याच्या बाहेर पडला व त्यानें तडक फाटकाचा रस्ता धरला.

सडकेवर आल्यावर तो किंचित् भानावर आल्यासारखा झाला.

मालतीनें आपला अपमान केला, आपल्या माणूसकीस बट्टा लावून आपणास पशुवृत्तींत गोवलें, नैतिक वृत्तीबद्दल आपली कानउघाडणी केली व आपल्यासारख्या श्रीमंत, सुस्वरूप व योग्यतेच्या मनुष्याची अवहेलना करून आपल्या मागणीचा अनादर केला, वगैरे तरंग त्याचे मनांत येऊं लागले. अपमानाचें शल्य त्यास बोचूं लागलें, त्याची अहंभावना प्रदीप्त व्हावयास लागली. सरळ मार्गानें नाहीं, तर आड मार्गानें आपला हेतु साधण्याचा विचार त्याचे मनांत आला. पळवून नेऊन बळजबरीनें तिला आपलीशी करावी असें त्यास वाटूं लागलें, पण हा त्याचा विचार फार वेळ टिकला नाहीं. मालतीचा करारी स्वभाव, तिचा समाजातील दर्जा, तिची सुशिक्षणसंपन्नता हीं त्याच्या डोळ्यांसमोर उभीं राहिलीं. बळजबरीनें मालती वश होईल ही गोष्ट त्यास संभवनीय दिसेना, व एक वेळ करतां वेक होऊन लोकांस लोहशृंखला अडकावणाऱ्या आपणासच त्यांचा लाभ होण्याची शक्यता त्यास भेडसावूं लागली. मालतीशीं राक्षसी विवाह करण्यास त्याचें मन तयार होईना.

विचारांनीं त्याचे मनांत काहूर उडवून दिलें. त्याची विचारमालिका सरळ चालेना. त्याचें डोकें भणभणून गेलें, व एखाद्या कातावलेल्या पण पिंजऱ्यांत कोंडलेल्या वाघाप्रमाणें त्याची स्थिति झाली.

वरील गोष्टीस दोनचार दिवस होऊन गेले. आनंदरावही घरीं आले होते. शामरावसंबंधाची हकीकत त्यास आल्यावर कळावयाची होती. माधवाचें कराचीहून पत्र आलें असून त्यांत त्यानें आपल्या तेथील कामगिरीचा उल्लेख केलेला होता. कराची गांव हिंदुस्थानच्या निर्गत व्यापाराचें एक प्रमुख बंदर असल्यामुळें तेथें त्यानें व्यापारविषयक चारपांच व्याख्यानें दिलीं होतीं. त्यांत व्यापारांत, राष्ट्रीय संपत्ति वाढविण्यास व्यापार कोणता, हिंदुस्थानचा सद्यःकालीन व्यापार, राष्ट्रीय संपत्तीच्या र्‍हासानें त्याची अवनतता, आपली स्थिति सुधारण्यास व दुष्काळासारख्या भयंकर आपत्तीपासून वांचविण्यास येथील कारागिरांची वाढ होण्याची आवश्यकता, वगैरे मुद्यांचा त्यानें उत्तम ऊहापोह केला होता. हिंदुस्थानच्या पूर्वकालीन तयार मालाच्या व हल्लींच्या कच्च्या निर्गत व्यापारस्वरूपाची त्यानें तुलना करून पूर्वकालीन सुसंपन्नतेचें व हल्लींच्या दरिद्री स्थितीचें त्यानें हृदयद्रावक चित्र रेखाटलें होतें. व्यापारविषयक धार्मिक कल्पना त्यानें जनतेस नीट समजावून सांगितल्या व आपल्या व्यापारास हितकारक होईल या हेतूनें वगैरे तऱ्हेच्या निर्बंधाबद्दल सरकाराजवळ योग्य दाद चिकाटीनें व एकजुटीनें मागण्याबद्दल त्यांस कळकळीनें उपदेश केला होता.

योग्य तें व्यापारी शिक्षण व माहिती मिळवून एकजुटीनें आपल्या व्यापाराचें संरक्षण करण्यासाठीं स्थानिक व्यापाऱ्यास व्यापारीमंडळ स्थापण्यास त्यानें लाविलें. आपल्या माहितीप्रमाणें व व्यापाऱ्यांच्या सल्ल्यानें त्याचें धोरण त्यानें ठरवून दिलें व तेथील व्यापारी पेठेंत अंतर्भाव होणाऱ्या प्रदेशांतील व्यापाऱ्यांस त्याचा हेतु समजावून सांगून त्यांची मदत मिळविण्यासाठीं त्यानें कर्तबगार लोक त्यांस ठेवावयास सांगितलें. बाहेरगांवीं व्यापाऱ्यांत फिरून त्यांचेमध्यें व्यापाराची जागृति उत्पन्न करणें हें त्यांचें काम होतें. ह्या व अशाच तऱ्हेचे अनेक उपायांची योजना त्यानें त्यांस सांगितली व मनःपूर्वक आपल्या अंतिम ध्येयासाठीं खटपट करण्याची त्यानें त्यांस सविनय प्रार्थना करून कराचीचा निरोप घेतला.

ह्याप्रमाणें कामगिरी बजावीत तो अमदाबाद, भडोच, सुरत वगैरे ठिकाणीं जाऊन मुंबईस आला. मुंबई म्हणजे हिंदुस्थानच्या व्यापाराचें केंद्रस्थान. परदेशीय

मालाची मोठी उतारपेठ. स्थानिक कापडनिपजेचें मोठें ठिकाण. येथील व्यापारीवर्ग धाडशी व पाश्चात्त्यांचे व्यापारी बाबतींत अनुकरण करणारा, व सांपत्तिक दृष्टीनें सबंध हिंदुस्थानांत उत्तम. येथील व्यापाऱ्यांचा कल भौतिक उन्नतीकडे जास्तीं. बहुजनसमाज सुशिक्षित. अशा तऱ्हेच्या औद्योगिक उन्नतीस सर्व बाजूंनीं योग्य असलेल्या ठिकाणीं माधवानें पुष्कळ दिवस राहून आपली कामगिरी बजाविण्याचें ठरविलें होतें.

मुंबईस आल्यानंतर मोठमोठ्या सुशिक्षित व्यापाऱ्यांचीं व कारखानदारांचीं त्यानें प्रथम भेट घेतली. आपला उद्देश त्यांस कळविला व त्यांच्या मदतीची अपेक्षा दर्शविली. लेखांच्या व व्याख्यानांच्या द्वारें त्याच्या विद्वत्तेबद्दल व कळकळीबद्दल त्यांस त्याची ओळख झालेलीच होती. त्यांनीं मोठ्या आनंदानें त्यास मदत करण्याचें कबूल केलें. वरील लोकांच्या भेटी घेतल्यानंतर स्थानिक पुढाऱ्यांच्या व वर्तमानपत्रांच्या संपादकांच्या त्यानें भेटी घेऊन आपला उद्देश त्यास कळविला. वर्तमानपत्रांनीं त्याच्या आगमनाची व त्याच्या भेटीची वार्ता आशापूर्ण हेतूनें लोकांपुढें ठेवली. त्याच्या इतर ठिकाणच्या कामगिरीबद्दल लांबलचक लेख लिहून त्याची लोकप्रियता वाढविण्याची तयारी चालविली. व कांहीं दिवसपर्यंत पंडित सदानंदजी हाच वर्तमानपत्रांच्या चर्चेचा मुख्य विषय होऊन बसला होता. कल्पनेबाहेर आपल्या कामगिरीची पूर्वतयारी माधवास दिसतांच त्यास दुप्पट हुरूप आला. पुरुषांप्रमाणें स्त्रियांत जागृति उत्पन्न व्हावी याची त्यास जाणीव भासावयास लागली. स्त्री-समाजांत काम करण्याचें त्याला अद्याप ठाऊक नव्हतें व या कामीं मालतीची योजना करावी असें त्यास वाटूं लागलें.

माधवाचें पत्र गेल्यानंतर ताबडतोब मालती मुंबईस आली. आल्याप्रमाणेंच व्यापारी मंडळ, वर्तमानपत्रांचे संपादक व लोकनायक यांची त्यानें तीस ओळख करून देऊन तिच्या येण्याचा हेतु त्यांस कळविला. मुद्दाम स्त्री-वर्गाच्या उन्नतीसाठीं चाललेल्या मासिकांच्या संपादकांनींही तिची भेट घेऊन मनोभावें सहाय्य करण्याचें कबूल केलें. माधवाप्रमाणेंच तिचीही लोकप्रियता वाढावयास सुरवात झाली. या दोघांचीं व्याख्यानें केव्हां ऐकावयास मिळतात म्हणून लोक उतावीळ झालेले होते. गांवांतील वजनदार व थोर गृहस्थांच्या सहीचीं हस्तपत्रकें वांटण्यांत येऊन अखेरीस शानदार व्याख्यानाचा दिवस प्रसिद्ध करण्यांत आला. व्याख्यानाचा विषय " भौतिक उन्नतीच्या दृष्टीनें व्यक्तिविषयक जबाबदारी " हा

होता व व्याख्यानाची जागा सायंकाळीं मध्यम स्थितींतले सर्व लोकांचें जमण्याचें ठिकाण जी बॅकबे ती ठरविण्यांत आली होती. अध्यक्षस्थानीं एका सन्माननीय वयोवृद्ध देशभक्ताची योजना करण्यांत आलेली होती. श्रोतृसमुदायानें बॅकबेचें वाळवंट चिकार भरून गेलेलें होतें. माधवाची कीर्ति ऐकून मोठमोठे सरकारी अधिकारीही त्याचें भाषण ऐकण्यास आले होते. समोर मुद्दाम मांडलेल्या दोन-अडीचशें खुर्च्या सर्व भरून गेल्या होत्या. अध्यक्ष व माधव व्यासपीठावर येतांच समुद्रलाटांच्या कर्कश आवाजासही लुप्तप्राय करणाऱ्या टाळ्यांच्या गर्जनेनें त्यांचें स्वागत करण्यांत आलें. व्याख्यान सुरू झालें. माधवाच्या शाब्दिक विचारतरंगांच्या लाटा श्रोतृमंडळाच्या अंतःकरणावर आपटावयास लागल्या. युक्तिवाद, विषयाची फोड करण्याची त्याची अप्रतिम भाषणशैली, शब्दांत उतणारा त्याच्या अंतःकरणांतील कळवळा व साधकबाधक प्रमाणांचा योग्य विचार, ह्यांनीं श्रोतृवृंदाचीं अंतःकरणें विदीर्ण झालीं. त्याच्या बोलण्याची यथार्थता त्यांस भासली. त्यानें प्रतिपादलेलीं तत्त्वें त्यांना पूर्ण पटलीं. माधवाचे इच्छेप्रमाणें श्रोतृमंडळाच्या मनावर चांगला परिणाम झाला.

दुसरे दिवशीं मोतीबागेंत ' स्त्रियांचें कर्तव्य' या विषयावर मालतीचें व्याख्यान झालें. स्त्री—समुदाय पुष्कळ जमला होता. त्या सर्वांस इंग्लिश भाषा समजणें शक्य नव्हतें. मालतीस गुजराथी येत नसल्यामुळे तिचें भाषण मराठींतच झालें. तेथें जमलेल्या गुजराथी, पारशी, वगैरे स्त्रियांस हें तिचें भाषण साग्र समजणें शक्य नव्हतें. तेव्हां व्याख्यानाचे अखेरीस याबद्दल तिनें त्यांचें मत विचारून पुढील भाषण त्यांच्याच विचारानें हिंदींत देण्याचें ठरविलें व आपल्या मुसलमानी भगिनींस मुद्दाम निमंत्रण देऊन घेऊन येण्याबद्दल तिनें त्यांस सांगितलें.

मालती व माधवाची वर्तमानपत्रकारांनी त्यांच्या भाषणाचा समग्र वृत्तांत देऊन खूप तारीफ केली. त्यांच्या मुंबईच्या कामगिरीस कायमचें स्वरूप येण्याचा रंग दिसूं लागला.

मुंबईच्या एकंदर वस्तीचें व्यापारी स्वरूप असल्यामुळें माधवानें ह्या बाबतींतच तेथें कामगिरी करण्याचा विचार ठरविला. हिंदुस्थानच्या औद्योगिक उन्नतीस जरूर असणाऱ्या शास्त्रीय ज्ञानाचा अभ्यास करण्यासाठीं परदेशीं विद्यार्थी पाठविण्यासाठीं, मोठमोठ्या लोकांच्या मदतीनें त्यानें तेथें एक मंडळ स्थापिलें. मंडळाच्या आर्थिक स्थितीस बळकट स्वरूप देण्यासाठीं, मासिक वर्गणीदार मिळवून त्यांनीं

एकंदर व्यवस्था चोख राहण्यासाठीं, मंडळास कायमचा पगारी सेक्रेटरी नेमून दिला. धनिक लोकांच्या गांठी घेऊन त्यांजकडून मोठमोठ्या देणग्या मिळविण्याची त्यानें खटपट केली. या मंडळासच जोडून हिंदुस्थानांतील कच्च्या द्रव्यांपासून कोणत्या तऱ्हेचा व्यापारी माल तयार करता येईल वगैरे ज्ञानाची होतकरू व धाडशी व्यापाऱ्यांस माहिती करून देण्यासाठीं तेथीलच तज्ञ शास्त्रज्ञांची एक कमेटी नेमली. ह्या कमेटीनें योग्य फी घेऊन सल्ला देण्याचें काम करावयाचें ठरविलें होतें. कला–कौशल्याची, व्यापार–उद्यमाची चर्चा करणारें एक पाक्षिक-पत्र वरील मंडळामार्फत सुरू करण्याचें ठरविलें असून त्याचें संपादकत्व तेथीलच एका सुशिक्षित व प्रगमनशील व्यापारी सद्गृहस्थाकडे सोंपविलें होतें.

वरील कामगिरी बजावण्यास माधवास जवळ जवळ सहा महिने लागले. मध्यंतरीं वेळ मिळाल्यास तो दक्षिण महाराष्ट्रांतील प्रमुख गांवीं जात असे. व तेथें व्याख्यान देऊन लोकजागृति करण्याच्या आपल्या कामांत तो नेहमीं तत्पर असे.

वरील सर्व वेळ मालती तेथें राहिली नाहीं. १० -१५ व्याख्यानें दिल्यानंतर ती नागपुरास परत आली.

---

## प्रकरण ५ वें.



शामरावाची मालतीसंबंधींची लालसा आतां पहिल्यापेक्षां जास्त प्रज्वलित झाली होती. कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारानें ती शेवटास न्यावी असें त्यास वाटूं लागलें. तरी पण तिला पळवून नेण्यास त्याचें मन कचरत असे. आपला मालतीनें इतरांबरोबर अव्हेर केला; तेव्हां आपणास कोणीतरी प्रतिस्पर्धी असावा असें त्यास वाटूं लागलें व त्याचा तपास काढण्याचा त्यानें बेत केला. आपल्या कांहीं हस्तकांमार्फत त्याच्या सिद्धयर्थ तो खटपट करूं लागला. आनंदरावांकडे अगर मालतीकडे तिच्या लालसेनें तेथें कोणी तरुण जात नाहीं हें त्याला माहीत होतें. मालतीकडे येणाऱ्या बहुतेक स्त्रिया असून त्या सर्व थोर कामदार लोकांच्या व इतर सुशिक्षित आणि इज्जतदार कुटुंबांतील अशाच असत. क्वचित् वेळीं गांवांतील सुशिक्षित मंडळी तिजकडे येत असे. परंतु आपल्यास त्यांत कोणी प्रतिस्पर्धी असेल असें त्यास वाटेना.

माधव नाहींसा होईपर्यंत तिची व त्याची ओळख असल्याचें त्यास समजलें.

माधव नाहींसा झाला तेव्हां मालतीचें वय अजाणस्थितीचें नव्हतें. त्या वयांत तिच्या मनास प्रेमबाधा होणें शक्य होतें. माधव गेला त्या दिवशीं तो तिला भेटावयास गेल्याचेंहीं त्यास कळलें. ह्या सर्व प्रकारावरून मालतीच्या प्रेमाचा ओघ माधवाकडेच असला पाहिजे अशी त्याची पूर्ण खात्री झाली. माधवाचा तपास काढण्याचा त्यानें निश्चय केला. माधवाच्या वडिलांस त्याची माहिती कदाचित् असेल हें त्यास संभवनीय दिसून त्यानें त्याप्रमाणें त्यांजजवळ माहिती विचारली. माधवासंबंधानें गोष्ट काढतांच त्याचे वडील फार संतापले व त्याचे व आपले पितापुत्रांचें देखील आतां नातें राहिलेलें नाहीं असें त्यांनीं स्पष्ट सांगितलें.

मालतीकडे माधवाबद्दल स्पष्ट विचारून तपास काढावा हें त्यास योग्य दिसेना. म्हणून त्यानें युक्ति लढवून आपला कार्यभाग साधण्याचा बेत केला.

एके दिवशीं सकाळीं तो त्यांचे घरीं गेला. यावेळीं आनंदराव व मालती हीं घरांत नव्हतीं. तीं दोघेंही स्टेशनवर गेलीं असल्याचें त्यास समजलें. मला त्यांच्याशीं जरूरीचें काम आहे असें नोकरांस सांगून तो तेथेंच दिवाणखान्यांत त्यांची वाट पहात बसला.

शामरावास फार वेळ तिष्ठत बसावें लागलें नाहीं. मालती, आनंदराव व एक अपरिचित गृहस्थ अशीं तिघेंही दिवाणखान्यांत आलीं. शामरावास पहातांच आनंदराव व मालती यांच्या कपाळांस आंठ्या पडल्या. तरीसुद्धा त्यांनीं सभ्यतेचें उल्लंघन होईल अशा तऱ्हेचें त्याच्याशीं न वागतां त्यास कुशल प्रश्न विचारले. घरोब्यांतील माणसांप्रमाणें, आलेला नवीन मनुष्य तेथें पाय वगैरे पसरून पडला.

" आनंदराव आपणांस कांहीं माहिती विचारण्यासाठीं मी आलेला असून आपण मला रिकामें परत पाठविणार नाहीं अशी आशा आहे. " त्यांजकडे वळून शामराव म्हणाला.

" मला माहीत असेल तर मी आपणांस मोठ्या आनंदानें सांगेन. "

कालरोजीं येथून पंधरावीस कोसांवर असलेल्या एका खेड्यांत एका तरुणाचें प्रेत सांपडल्याची बातमी आलेली आहे. मृत शरीर ओळखण्याच्या स्थितींत नसल्यामुळें ह्या तरुणाच्या नातलगाचा अगर त्याच्या घरादाराचा तपास लागणें अशक्य दिसत आहे. प्रेताजवळ फाटक्या इंग्रजी पुस्तकाचे कागद सांपडले असून, त्याचा पोषाख व इतर गोष्टींवरून तो मनुष्य सुशिक्षित व सुखवस्तु घराण्यांतला असावासें वाटतें. पोलीसांस मृत मनुष्याचें नांवगांव व त्याचा मृत्यूचें अगर खुनाचें

कारण समजणें जवळ जवळ अशक्य दिसत आहे. हा मनुष्य आपले माहितींतलि असावा असा माझा तर्क आहे व तसें असल्यास त्याची ओळख पटविणारी वस्तुही मी आपणांस दाखवावयास तयार आहे. "

शामरावाच्या वरील गोलाकार बोलण्याचा आनंदरावास अर्थ कळेना. मालतीनें केलेल्या अव्हेराचे तर हे शेपूट नसावें ना, अशा तऱ्हेचे तर्क त्यांच्या मनांत यावयास लागले व असें असेल तर त्याची योग्य कानउघाडणी करण्याच्या हेतूनें ते त्यास म्हणाले,

" शामराव, माहिती काढण्याच्या सद्धेतूनेंच आपण माझ्याकडे आलां आहात कीं आपल्या व्यक्तिविषयक दागणुकीचा वचपा काढण्यासाठीं पोलिसची पोलिसगिरी लढविण्यासाठीं आपण येथें आलां आहांत ? कोणी एखादा मनुष्य मरतो व त्याचा तपास काढण्यासाठीं आपण माझेकडे येतां ! जणुं काय, पृथ्वीवरील सर्व मनुष्यांची मला माहिती आहे. आपलें हें करणें तऱ्हेवाईक नव्हे का ! ! "

" आनंदराव, असे रागावूं नका. सदरहू मनुष्य आपला माधव असावा अशी मला शंका आली व तो आपल्या पूर्ण परिचयांतला, म्हणून मुद्दाम आपणांकडे आलो. "

खिशांतील अंगठी काढून ती त्यास दाखविण्यासाठीं त्यानें पुढें केली.

शामरावाचें बोलणें ऐकून मालती व आनंदराव खदखदां हंसावयास लागलीं. नवीन आलेला गृहस्थ—आपल्या परिचयांतले पंडित सदानंदजी—त्याजकडे आश्चर्यचकित मुद्रेनें पाहूं लागला. क्षणभर तो स्तंभितच झाला. नंतर एकदम शामरावाकडे वळून तो म्हणाला,

" शामरावजी, ज्याला आपण मृत समजतां तो मी माधव मृत नसून जिवंत आहें. माझें माधव नांव मात्र मृत झालेलें असून सदानंद-पंडित सदानंदजी ह्या नावानें मी जिवंत आहें. "

" व्याख्यानें व लेख ह्यांनीं लोकांत जागृति करणारे आपणच का ? " आश्चर्यानें भरावलेल्या शामरावानें विचारलें.

" होय तोच मी. "

" मग आपण ही संन्यासवृत्तीची दीक्षा केव्हांपासून घेतलीत ? " अद्याप आशा असलेल्या शामरावानें विचारलें.

" मी संन्यासी नाहीं. मात्र माझें वर्तन संन्यासवृत्तीस योग्य अशाच लोकजागृतीचें आहे. " शांतपणानें माधव म्हणाला.

शामरावचा आशातंतु तुटावयास लागला. त्याच्या चेहऱ्यावर उदासीनतेचे पटल पसरावयास लागलें. जास्त वेळ त्या ठिकाणीं बसणें बरें वाटेना.

" आपल्या ओळखीबद्दल मला फार आनंद वाटत आहे व ही अशीच कायम राहील याची मला पूर्ण उमेद आहे. मला काम आहे त्यामुळें जास्ती वेळ आपल्या संगतींत मला घालवितां येत नाहीं याबद्दल मला फार दिलगिरी वाटते. "

शामराव खिन्न अंतःकरणानें उठून बाहेर पडला.

आचाऱ्यानें चहाचे पेले आणून मंडळापुढें ठेविले. चहा पीतपीत माधवानें आपल्या पश्चातच्या नागपूरच्या हालहवालीबद्दल विचारण्यास सुरुवात केली. माधव गेल्यापासून घडलेल्या सर्व गोष्टी मालतीनें त्यास सांगितल्या. ओघानें माधवाच्या वडिलांसंबंधींचा सर्व प्रकार त्यास तिनें सांगितला. तो ऐकून त्यास फार वाईट वाटलें. तो चिंतित बसला.

पोस्टमननें पत्रें आणून दिलीं. मालतीस शामरावासंबंधीं सूचना देणाऱ्या गृहस्थाचें त्यांत पत्र होतें. तें वाचून तिनें आनंदरावांचे हातीं दिलें.

" शामरावासंबंधीं पुन्हा आपणास सूचना करणें मला जरूर दिसत आहे. आपणांस नाहीं तर दुसऱ्यास देखील नकों अशा वृत्तीचा हा मनुष्य असून आपले हेतूसाठीं आपल्याशीं अशा तऱ्हेनें वागण्यास हा मागेंपुढें पहाणार नाहीं, तरी योग्य खबरदारी घ्यावी. कळावें. "

पत्र वाचून आनंदरावांचे चेहऱ्यावर क्रोध, भीति वगैरे विकार दिसावयास लागले.

मागीलप्रमाणेंच त्या गृहस्थाचे आभार मानून त्यानें आपणास नेहमीं सूचीत करीत असावें अशा प्रकारचा मजकूर वर्तमान पत्रांत देण्यास त्यांनीं मालतीस सांगितलें. शामरावसंबंधीं व्यवस्था करण्याचा बेत त्यांनीं आपल्या मनाशीं ठरविला; त्याची व अज्ञ गृहस्थाची आलेली पत्रें आपणास दुसऱ्या दिवशीं देण्याबद्दल मालतीस सांगितलें.

शामरावसंबंधींचा व मालतीच्या इतर मागणीदारांबद्दलचा सर्व व्यवहार त्यांनीं माधवास सांगितला व त्या संबंधींची व्यवस्था करण्याचा आपला बेतही त्यास कळविला.

माधवानें नागपूरास आल्यावर जवळ जवळ एक आठवडाभर पूर्ण विश्रांती घेतली. आनंदरावांकडून आपले वडिलांस भेटणें योग्य होईल कीं नाहीं याची

त्यानें बातमी काढविली. त्याच्या वडिलांचा दुराग्रही स्वभाव अद्याप मूळपदावरच होता. आनंदरावांनीं माधवासंबंधानें त्यांजवळ गोष्ट काढतांच त्यांनीं त्यांची योग्य संभावना केली व " त्या दुष्ट कारट्याबद्दल आपणांस मजजवळ बोलणें असेल तर आपण माझे घराची पायरी चढणें चांगले नव्हे. " असें सांगून " त्याजबद्दल आपली सहानुभूति असेल तर माझ्याशीं बोलणें अगर कोणच्याही तऱ्हेचा संबंध ठेवणें योग्य होणार नाहीं. " असें निक्षून बजाविलें. स्वभाववैचित्र्याचा विचार करीत आनंदराव परत आले. अशा स्थितींत माधवास आपले वडिलास भेटणें अर्थात् श्रेयस्कर दिसेना.

माधव व मालती नेहमी महाराजबाग वगैरे सार्वजनिक ठिकाणीं फिरावयास जात असत. त्यांजबरोबर गांवांतील संभावित मंडळी व आनंदराव बहुतेक असावयाचे. क्वचित् प्रसंगीं नसतही. महाराजाबागेंतल्या फिरण्यासाठींच मुद्दाम केलेल्या वाकड्या तिकड्या छोटेखानी सडकेनें फिरतांना त्यांस नेत्रांनीं कितीदा तरी पाहिले असेल. आपापल्या विचाराप्रमाणें कोणी ह्या त्यांचे दर्शनास नांवे न ठेवीत तर कित्येक ठेवीत. एकमेकांच्या सहवासांत अशा शांत व उत्साही वेळीं निरनिराळ्या विषयांवर त्यांचे वादविवाद चालत असत. आपले बोलण्यापासून दुसऱ्यांस त्रास होऊं नये म्हणून तीं हळू हळू बोलत किंवा एकीकडे जाऊन बसत. वादविवाद करतांना सुचणाऱ्या नवीन विचारांनीं त्यांचे चेहऱ्यांवर केव्हा केव्हा स्मितही चमकत असे. त्यांस अशा स्थितींत एकदा एकांतांत असलेलीं शामरावानें पाहिलें. उच्चतम विचारांचा संसर्ग नसलेल्या शामरावास ह्या त्यांच्या एकांताचें स्वरूप प्रणयी असावें असें वाटलें व आपल्या संशयाप्रमाणें आपला प्रतिस्पर्धी माधवच आहे ह्याची त्यास खात्री वाटली. माधवाच्या स्थितीबद्दल त्यास हेवा वाटावयास लागून त्याचा मत्सराग्नि भडकावयास लागला. माधवास मालतीचा लाभ न व्हावा, असें त्यास वाटावयास लागून माधवाचा नाश करण्याची तो युक्ति शोधूं लागला.

आनंदरावांनीं सी. आय. डी. च्या सुपरिंटेंडेंटकडे जाऊन शामरावाच्या वर्तनाबद्दल कागाळी केली. त्याची त्यांस व मालतीस आलेली व त्याचप्रमाणें अज्ञ हितचिंतकाचीं पत्रे त्यांनीं साहेबास दाखविलीं. शामराव व मालतीमधील संभाषणाचा गोषवारा त्यांस सांगितला. माधवाचा तपास करण्याच्या वेळचा सर्व प्रकार व खुनासंबंधींची बनावट बातमी ( ह्या बातमीबद्दल त्यांनीं तपास केलेला होता. ) वगैरे सर्व माहिती त्यांनीं साहेबाजवळ ठेविली. ह्या बाबतींत आपण कसें वागावें याजबद्दलची त्यांनीं पृच्छा केली.

फेअरब्रेनसाहिबानें आनंदरावांचें सर्व बोलणें शांतपणें ऐकून घेतलें. मालती-संबंधानें आपलें मत चांगलें असल्याचें त्यानें कळविलें व तिच्यासारख्या मुलीस आपले खात्यांतील मनुष्याकडून त्रास होत असेल तर त्याचा योग्य बंदोबस्त करण्याचेंही त्यानें त्यांस अभिवचन दिलें. मात्र शामरावसंबंधानें बघतां मालतीस प्रत्यक्ष त्रास झाला अशा तऱ्हेचें वर्तन त्याचे हातून अद्याप घडलें नसल्यामुळें त्यास शासन करणें अनुचित होईल म्हणून त्यानें सांगितलें.

"शिवाय असें पहा, आतांच जर मी त्याला ह्या गोष्टीबद्दल बोललों तर मला बातमी कळली आहे अशी त्याची समजूत होऊन, तो आपला डाव साधण्यासाठीं कांहीं काळपर्यंत स्तब्ध बसेल अगर ज्यांत त्याचा कोणत्याही तऱ्हेनें हात सांपडणार नाहीं अशी कांहीं तरी युक्ति लढवील. अशा तऱ्हेचीं माणसें आम्हांला आमचे खात्यांत नको आहेत. येथील काम जोखमीचें व कर्तबगार मनुष्याचें असून त्याला नैतिक हिमतीचें पाठबळ लागतें. शामरावसारख्या खुशालचंदाचे हातून तें बरोबर निभणार नाहीं. आपल्या क्षुद्र मनोवृत्तीस बळी पडून आम्हीं दिलेल्या सत्तेचा दुरुपयोग अशा कामीं करून लोकांच्या निंदेस मात्र आम्हांस हे वेळोवेळीं पात्र करतात. शामरावनें अशा तऱ्हेनें आपल्या सत्तेचा दुरुपयोग केल्याचा पुरावा मला सांपडला म्हणजे मी त्यास योग्य शिक्षा करण्यास मागें-पुढें पहाणार नाहीं." फेअरब्रेनसाहेब म्हणाले.

"आमच्यामुळें शामरावाचें नुकसान व्हावें, हें मला बरें दिसत नाहीं."

"आनंदराव, असल्याच नेभळट नीतीनें तुम्हीं हिंदुलोकांनीं आपणास जगाच्या उपहासास पात्र करून घेतलें आहे. ' जें आपणास त्रासदायक अगर हानिकारक होईल त्याचा उच्छेद केलाच पाहिजे ' अशा तऱ्हेची तुमची नैतिक भावना होईपर्यंत तुमची सुधारणा होणें शक्य दिसत नाहीं."

आनंदरावांनीं साहेबाचा निरोप घेऊन घरचा रस्ता धरला. घरीं आल्यावर झालेली सर्व हकीगत त्यांनीं माधव व मालती यांस सांगितली.

आठवार दिवसांची विश्रांति घेतल्यानंतर माधव पुन्हा आपल्या कामगिरीस लागला. त्याच्या व्याख्यानमालिकेस लवकरच सुरवात होऊन त्यांतील पहिलें पुष्प ' शिक्षणाचें ध्येय ' हें होतें. शहराच्या मध्यवस्तीवर पडणाऱ्या स्टेशनजवळ कॉटन मार्केटच्या मैदानांत त्याचें व्याख्यान व्हावयाचें होतें. व्याख्यानास श्रेष्ठ समुदाय चांगलाच जमला होता. फेअरब्रेनसाहेब स्वतः व्याख्यानासाठीं येणार होते, परंतु ऐनवेळीं जरूरीच्या कामासाठीं त्यांस बाहेरगांवीं जावें लागल्यामुळें

त्यांचें येणें झालें नाहीं. व्याख्यानांत माधवानें शिक्षणानें येणारी संस्कृति, वाढणारी नीतिमत्ता, मनोधैर्य, वगैरे गोष्टींचा उहापोह करून शिक्षणाचें ध्येय राष्ट्राची समाजाची व आपली उन्नति करून घेण्याचें असावें म्हणून सांगितलें. पारमार्थिक स्वरूपाची आपली उन्नति जरी झालेली आहे तरी तीस भौतिक उन्नतीची सांगड नसल्यामुळें ती एकांगी बनून राष्ट्राची व समाजाची अवनति होत आहे. पारमार्थिक प्रगतीचें पाऊल अचल झालेलें आहे. त्यानें व्यक्तिश: कर्तबगारीस थंडगार करून सोडलें नसून, अर्धपोटी राहावयाची पाळी आली तरी ती ईश्वरेच्छा समजून दुःखानें दिवस कंठावयाचें जनतेच्या अंगवळणी पडल्यासारखें दिसत आहे. तेव्हां अशा हताश स्थितीत आशा वाढवून मार्ग दाखविणारें शिक्षणासारखें दुसरें कांहीं नाहीं. तेव्हा सुशिक्षित मंडळींनीं आपल्या देशांत शिक्षणाचा प्रसार जितका जास्त होईल तितका वाढविण्याची खटपट करून आपल्या अभागी देशास सुखी करण्याचें श्रेय घ्यावें व आपल्या सुशिक्षित स्थितीचें हेंच ध्येय असें जेव्हां सुशिक्षित मंडळीस वाटावयास लागेल तो सुदिन होय अशा तऱ्हेचा श्रोतृमंडळीस अखेरीस उपदेश करून त्यानें आपलें व्याख्यान संपविलें.

माधवाच्या-पंडित सदानंदजी—यांच्या विद्वत्तेबद्दल व व्याख्यानशैलीबद्दल श्रोतृगण तारीफ करीत चांगला. त्यानें प्रतिपादिलेल्या तत्त्वांबद्दल विचार करून त्याप्रमाणें आपल्या वर्तनक्रमास वळण लावण्याबद्दलचा विचार व इच्छा मात्र त्यांपैकीं बोटांवर मोजण्याइतक्याच गृहस्थांच्या मनांत आला असेल.

मालतीस दुसऱ्या दिवशीं दुपारच्या डाकेनें खालील पत्र आलें होतें.

"शामरावनें आपला डाव साधण्याचा विचार केला असून तो त्या तयारींत आहे. पंडित सदानंदजी हें नांव खरें नसून खोट्या नांवानें लोकांत राजकीय चळवळ अयोग्य प्रकारांनीं सुरू करण्याचा त्याचेवर आरोप घेण्यांत आलेला असून बहुतकरून आज अगर उद्या त्याजवर वारंट बजावण्यांत येईलसें वाटतें. माधवाचे वडिलांशिवाय इतर सर्व वरिष्ठ अधिकारी बाहेर असल्याचा फायदा घेऊन माधवाच्या वडिलांच्या सहीनेंच वारंट घेण्यांत येईलसें दिसतें. पंडित सदानंदजी व माधव यांचा संबंध मला ठाऊक आहे व म्हणून आपल्याप्रमाणेंच माधवाचे वडिलांस मी पत्र लिहिलें असून त्यांस सूचना केलेली आहे. मात्र माधवाचे वडिलांचे आशेवर आपण राहूं नये. आपणांस योग्य दिसेल ती तजवीज करावी. फेअरब्रेनसाहेब आज संध्याकाळचे गाडीनें वर्ध्याहून येऊन कामटीकडे पुढें जाणार आहेत."

माधवाच्या वडिलांस गेलेल्या पत्रांत खालील मजकूर होता.

"पंडित सदानंदजी म्हणजे आपला मुलगा माधव. ह्याच्यावर निव्वळ व्यक्ति-विषयक द्वेषानें व त्याचा घात करण्याच्या हेतूनें येथील पोलीस इन्स्पेक्टर शामराव हे वारंट मागावयास येतील. माधवाची वागणूक गुन्हेगार या स्वरूपाची बिलकूल नाहीं, अशी माझी पूर्ण समजूत असून पुढें हें प्रकरण चालल्यास न्यायाधीशही खात्री करून देतील. तेव्हां वारंट देणें झाल्यास निदान कागदपत्र पाहून व योग्य चौकशी करून दिल्यास बरें. माधवाच्या निष्कलंक कीर्तीला डाग लागून आपली फजगत होऊं नये म्हणून आपणांस मुद्दाम कळविलें आहे."

माधवाच्या वडिलांनीं वारंट दिलें नसेल असें वाचकांस वाटणें साहजिक आहे. परंतु माधवाच्या वडिलांचें हृदय दगडापेक्षांही कठीण असून अभेद्य होतें. तेथें दयेचा पाझर फुटणें अशक्य होतें. आपल्या अपमानास व जनांत छीः थू: उडविण्यास कारणीभूत झालेल्या आपल्याच हाडामासांपासून झालेल्या मुलाबद्दल त्यांस यत्किंचित् प्रेम व दया हीं वाटत नव्हतीं. आपल्यापेक्षां जगांत माधवाची जास्ती योग्यता व मानमान्यता वाढल्यापासून आनंद वाटणाऱ्यांपैकीं हे नव्हते, तर त्याबद्दल अपमान वाटून घेणाऱ्यांपैकीं हे एक होते. त्यांनीं कांहीं एक विचार न करतां शामराव वारंट मागावयास आल्याबरोबर त्यास तें दिलें.

अव्हेर केल्याबद्दल आपणांसारख्यास सूड कसा उगवितां येतो हे मुद्दाम मालतीस भासविण्यासाठींच संध्याकाळीं शामराव पोलीस घेऊन पंडित सदानंदजी—माधव—यांजवर वारंट बजाविण्यासाठीं मोठ्या दिमाखानें आला. परंतु त्रयींपैकीं कोणीच घरीं नाहीं हें पाहून त्याचा दिमाख जागच्या जागींच जिरून गेला. घरास बाहेरून कुलूप घातलेलें होतें.

बाहेरच्या व्हरांड्यावर त्यास जवळ जवळ अर्धा तास बसावें लागलें. साडेपांच वाजून गेल्यावर आनंदराव्यांचा आचारी बाहेरून आला. शामरावास पहातांच त्यानें गंभीर चेहरा केला.

"कायरे, घरांतील सर्व मंडळी कुठें गेली आहेत. मुख्यतः तो पंडित सदानंदजी कुठें आहे. हें पहा कडी-तोंड; त्याची कशी वाट पहात आहेत." मग्रुरीच्या स्वरांत शामराव बोलला.

"तर मग हे कडी—तोंडें घेऊन आपण स्टेशनवर जा. समजलांत पोलीससाहेब. मात्र लवकर जाहो. नाहीं तर फसाल." आचाऱ्यानें स्मितमुद्रेनें पण उद्धटपणानें सांगितलें.

त्याच्या उद्धटपणाबद्दल शामरावास राग आला पण तो तसाच गिळून हातातलें सावज निसटूं नये म्हणून त्यानें तडक स्टेशनचा मार्ग धरला. स्टेशनवर येऊन तपास करतां पंडित सदानंदजी वगैरे मंडळी वेटिंग रूममध्यें असल्याचें समजताच शिपायास पुढें होण्यास सांगून आपण त्यांचे मागें झाला.

वेटिंगरूमचा दरवाजा शिपायानें उघडला. अधीर शामराव पुढें झाला. पण.........

---

## प्रकरण ६ वें.



तो ज्या दिमाखानें येथपर्यंत आला तो दिमाख जाऊन शामराव गर्भगळित झाला. त्याचा चेहरा खरकन् उतरला.

फेअरब्रनसाहिबाचा स्वभाव त्याला पूर्ण माहीत होता. ते, माधव, मालती व आनंदराव एके ठिकाणीं बसलेले व मोठ्या प्रेमानें एकमेकांशीं संभाषण करीत असलेले पाहून त्याची पाचावर धारण बसली.

शामरावास दरवाज्यांत पाहून माधव आपल्या जागेवरून उठला तो शामरावाजवळ आला.

" शामराव, मला धरण्यासाठीं आपण येणार आहात हें मला येथें आल्यावर कळलें. मी बाहेरगांवीं जाणार होतों. पण आपणांस विनाकारण त्रास पडेल म्हणून तो बेत रहीत करून आपली वाट पहात येथें बसलों होतों. मला कोणत्या आरोपावरून धरणार तें सांगा ! मी आपले स्वाधीन होण्यास तयार आहे. "

माधव एकेक शब्द जरी शांतपणें उच्चारीत होता व त्याच्या आवाजांत धाकधपटशा दिसत नव्हता तरी इकडे शामरावाची भयानें तारंबळ उडावयास लागली होती. तो थरथर कांपूं लागला.

" शामराव, तूं इतका नीच मनुष्य असशील ही मला कल्पना देखिल नव्हती. आम्हीं तुझ्या हातांत दिलेल्या सत्तेचा असा दुरुपयोग तुझेकडून होईल असें मला वाटलें नव्हतें. बोल, खरा प्रकार काय आहे तो. माझ्याशीं गांठ आहे एवढें मात्र लक्षांत असूं दे. "

आपल्या जागेवरून उठून त्याजकडे येत येत साहेब न्यायीस्वरानें म्हणाले.

कांहीं तरी बोलल्याशिवाय चालावयाचें नाहीं, ह्या समजुतीनें व निर्वाणीच्या वेळच्या कचरणाऱ्या धैर्यपुष्टीनें शामराव म्हणाला.

" कालच्या पंडितजींच्या व्याख्यानांत मला आक्षेपार्ह भाग बराच आहेसे वाटलें; तेव्हां ह्यांचा वेळींच बंदोबस्त करणें चांगले, या समजुतीनें मीं आपली कामगिरी बजाविली.

" पण वारंट घेण्याबद्दल तुला परवानगी कोणी दिली होती ? " रागानें पाय आपटीत साहेब म्हणाले.

" कोणी नाहीं. शिवाय आपणही येथे नव्हतां तेव्हां माझ्या प्रामाणिक समजुतीला जें योग्य दिसलें तें मीं केलें. आपण सांगत असाल तर वारंट आतांचे आतां परत घेण्याबद्दल मी तजवीज करतों. " जिकीरीच्या स्वरानें तो म्हणाला

" वारंटा संबंधीं पहातां येईल, पण आणखी तुझ्या प्रामाणिक समजुतीला काय काय वाटलें ? " क्रोध-तिरस्कार-विकारांबरोबत तीक्ष्ण नजरेनें त्याजकडे पाहात साहिब बोलले.

शामराव स्तब्धच राहिला. आपल्या बुटाच्या काळ्या पॉलिशकडे तो पाहात होता.

" वारंट कोणाच्या सहीचे आहे. ? "

" फर्स्ट क्लास माजिस्ट्रेट रावसाहिब मोगरे यांच्या. "

" आणि पंडित सदानंदजी म्हणजे त्यांचा मुलगा माधवच होय, हे तुला माहीत असतां बापाकडूनच मुलावर हत्यार उगारलेंस. शाबास. " कांही वेळानें थांबून ते म्हणाले.

" आण तें वारंट इकडे आणि ऑफिसमध्यें जाऊन माझी वाट पाहात बैस. "

वारंट घेऊन साहेब, माधव, आनंदराव, मालती वगैरे यांसह माधवाचे वडील मोगरे-यांच्या घरीं आले.

रावसाहिब मोगरे घरींच होते.

साहेब व त्याजबरोबर आनंदराव वगैरे मंडळीस पाहून त्यांचें येण्याचें कारण लागलीच रावसाहेबांचें ध्यानांत आलें. त्यांना आपले वर्तनाची लाज वाटावयास लागली व इतके मंडळी देखत प्रत्यक्ष मुलगा व मालतीसारखी मुलगी यांचे देखत

साहेब आपली संभावना केल्याशिवाय रहावयाचे नाहींत, या विचारानें ते मेल्यापेक्षां मेले झाले.

साहेबांचें योग्य स्वागत झाल्यावर साहेबांनीं त्या दिवशीं सकाळीं माल्तीला आलेलें पत्र वाचण्यासाठीं त्यांचे हातीं दिलें.

रावसाहेबांनीं समग्र पत्र वाचलें.

" रावसाहेब मोगरे, पंडित सदानंदजी हा व्यक्ति कोण आहे याची आपणांस माहिती असलीच पाहिजे असें असून एका हलकट मनुष्याच्या मागणीवरून तुम्ही त्यांना धरण्याचें वारंट देता या आपल्या कृतीस काय म्हणावें. न्याय्य दृष्टीनें आपण हें केलें असें म्हणावें तर त्याच्या भाषणासंबंधानें रिपोर्ट आपण वाचला होता काय ? त्यांच्या भाषणांत आक्षेपार्ह भाग खरोखर होता कीं नाहीं याची तुम्ही खात्री करून घेतली होती काय ? माझी खात्री आहे, यांपैकीं आपण कोणचीच गोष्ट केली नसेल. माधवासारख्या मुलाचे बाप म्हणवून घेण्यांत कितीतरी लोकांस धन्यता वाटेल. त्याच्यासारखा मुलगा असावा असें कितीक नवस करीत असतील. असें असतां तुमच्यासारख्या अधिकाऱ्यानें, इभ्रतदार गृहस्थानें त्या मुलाच्या आयुष्याची राखरांगोळी करण्याची इच्छा धरून तसें वागावें हें किती तरी वाईट व शोचनीय होय. तुमच्या विचित्र स्वभावासंबंधानें मी पुष्कळ एकिलें होतें. पण तो इतका विचित्र व दुनरशी असेल याची मला कल्पना नव्हती. "

साहेबांचे शब्द तापलेल्या डागण्यांप्रमाणें रावसाहेबांचें अंतःकरण डागीत चालले होते. मंडळीकडे नजर फिरवून पहाण्याचेसुद्धां त्यांनीं सोडलें होतें. आपल्या वागणुकीबद्दल आपणास पश्चाताप झाला असून आतां माधवावर आपण मुलाप्रमाणें प्रेम करूं अशी भावना दर्शविणारी एकही गोष्ट त्यांचेकडून झालेली दिसेना. आपल्या होत असलेल्या अपमानाबद्दल त्यांस अतिशय वाईट वाटत होतें. साहेबाच्या जागीं दुसरा कोणीही गृहस्थ असता तर त्यांनीं त्यास केव्हांच धुडकावून लाविलें असतें.

सदानंदजीस जामिनावर सोडण्याबद्दल साहेबांनीं त्यांस सांगितलें. आनंदराव जामीन राहिले व सदानंदजींची त्यांनीं जामीनावर सुटका केली.

तेथून त्या मंडळीसह साहेब ऑफिसमध्यें आले. तेथें शामराव बसलेला होताच.

" शामराव, कायद्यानें तुझ्याकडे दिलेल्या अधिकाराचा दुरुपयोग करून आपली नालायकी करून घेतलीस. यापुढें तुला नोकरींत राहूं देणें योग्य नाहीं. आजपासून मीं तुला कामावरून काढून टाकलें आहे व यापुढें अशा तऱ्हेच्या भानगडी करून लोकांस त्रास देणार नाहीं अशाबद्दल माझी खात्री करून देण्यास जर तूं तयार असशील तर बरें आहे, नाहींतर मला तुजवर खटला करावा लागेल. जा, तुला दोन दिवसांची मुदत दिली आहे. तोपर्यंत गांवांतील दोन वजनदार गृहस्थांचीं सर्टिफिकिटें भावी चांगल्या वर्तणुकीबद्दल घेऊन ये. तीं घेऊन नाहीं आलास तर तुझ्यावर खटला आलाच म्हणून समज. हा घे, आपल्या बडतर्फीचा हुकूम. "

साहेबांनीं त्याच्या अंगावर कागद फेकला.

" ज्या अज्ञगृहस्थानें मालतीबाई, तुम्हांस इतकें महाय्य केलें त्यास आणण्याची जर तुम्ही व्यवस्था कराल तर त्याला शामरावचे जागीं नेमण्याचा माझा विचार आहे. मी एक महिनाभर ही जागा भरीत नाहीं. तोपर्यंत त्या मनुष्याचा पत्ता आपणांस लागेल नाहीं ? " मालतीकडे वळून ते म्हणाले.

" मी वर्तमानपत्रांत माझे मागील पत्राप्रमाणें पत्र छापून त्यास भेटण्यास बोलाविते व आपलें म्हणणें त्यास कळविते. पोलिसच्या नोकरींस अशीच मनुष्यें पाहिजेत. " मालती म्हणाली.

वरील सर्व गोष्टी होईपर्यंत आठ वाजून गेले. साहेब नवाचे गाडीनें कामटीस जावयाचे होते.

साहेबांचे अत्याग्रहामुळें सर्व मंडळी साहेबांचे घरीं गेली. तेथें चहापान करण्यांत आलें. मालती, माधव वगैरे मंडळींची व आपल्या पत्नीची साहेबांनीं ओळख करून दिली. पंधरावीस मिनिटें एकमेकांशीं बोलण्यांत त्यांचा वेळ गेला. माधव व मालती यांचें दुसरे दिवशीं दुपारीं आपले घरीं येण्याबद्दलचें, आश्वासन साहेबांचे पत्नीचें घेतल्यानंतर मंडळी स्टेशनवर आली. गाडी स्टेशनवर तयार होतीच. साहेबांचे आभार मानण्यांत व एकमेकांच्या भेटीबद्दलच्या इच्छा प्रदर्शित करण्यांत गाडीची शीळ ऐकूं आली. माधव, मालती व आनंदराव खालीं उतरलीं. गाडी चालू झाली.

साहेबाच्या गुणवर्णनांत गुंग झालेली मंडळी घरीं आली.

## उप  ार.

मालतीची इच्छा दिसल्यावरुन आ  मनांत असलेल्या गोष्टीस माधवानें दृश्य स्वरुप दिलें. मालतीशीं विवाह के.शा. रावसाहेबांचा कोणाकडून अद्याप निवा-लला नसून ते लग्नास हजर नव्हतेच.

फेअरब्रिनसाहेबांना कामांहून परत आल्यानंतर मुकदमा काढून देण्याची व्यवस्था केली त्यांच्या पद्धतीप्रमाण त्यांना नूतन वधूवरांस योग्य देणग्या दिलेल्या होत्या.

लग्न झाल्यानंतर माधव मालतीसह कलकत्त्यास राहूं लागला.

मालतीचा अज्ञातहितचिंतक आतां प्रगट झाला असून शामरावच्या नोकरीवर आहे हा मनुष्य शामरावच्या मित्रांपैकींच एक होता. मात्र त्याच पाहण्यापासूनचें वागणें नीतीचें व सच्चालच्या वर्तनाचें असे.

वरील गोष्टीस आज पांच वर्षें झालीं. माधव व मालती यांच्या परिश्रमानें स्थापन आलेले मालतीमांत मंडळ भरभराटीस येत चाललें आहे. देशाच्या औद्योगिक व शिक्षणविषयक प्रगतीत खटपट करणे हा त्या मंडळाचा मुख्य हेतु आहे. पैशाच्या दृष्टीने मंडळाची स्थिति पार उत्तम असून देशहितार्थ स्वार्थत्याग करणाऱ्या लोकांस देशाच्या उन्नतीचे काम करण्यावें वरील मंडळ मोठे साधन झालेलें आहे. मंडळामार्फत सर्व देशीं भाषांत शिक्षणाची व व्यापाराची चर्चा करणारें दैनिक सुरू केलेलें असून सर्व लोकांस ते घेतां यावें म्हणून त्याची दर्श  मुद्दाम कमी ठेवली आहे. प्रांताच्या व जिल्ह्याच्या मुख्य शहरीं मंडळाच्या शाखा उघडण्यांत आलेल्या होत्या. सारांश काय, तर लोकांची प्रगति ज्या बाजूनें होईल त्या सर्व बाजूंनीं प्रयत्न चालू केले.

माधवाच्या वर्तनगाचें बक्षीस त्यास चांगल्या तऱ्हेने मिळालें असून त्याच्या मंडळाची भरभराट चालली आहे. मालतीचा सुखसमागम त्यास उत्साही होत आहे.

---

# “बहाद [illegible] ूराव”

( लेखक—भालचंद्र [illegible]म गुर्जर-मुंबई. )



प्रातर्विधि आटोपून गरम गरम चहाची मार्गप्रतीक्षा करीत मी व बाबुराव, नुकताच आलेला 'टाईम्स' वाचीत बसलों होतों. इतक्यांत जिन्यांत कोणाचीं तरी पावलें ऐकूं आलीं व पाठोपाठ आमच्या राघवेन्द्राचा शब्द ऐकूं आला. “खालीं एक गृहस्थ आपली–” पुढील शब्द त्या नवख्या गृहस्थाचे पदाघातांत आम्हांला ऐकूंच आले नाहींत. ते गृहस्थ आमच्या पुढ्यांतच येऊन उभे राहिले.

“एका अतिशय भयंकर बाबतींत आपली मदत मला पाहिजे आहे. एक भयंकर खून करण्यांत आलेला आहे! आपण मजबरोबर आतांच आलें पाहिजे.” तो मनुष्य अगदींच घाबरलेला दिसला.

बाबुरावानें विचारिलें “त्या मनुष्याचें प्राणोत्क्रमण झालें आहे काय?”

“अगदीं अगदीं थंडगार तो पडला आहे. पोलिसांचा असा समज आहे–”

“तुम्ही माझ्याकडे आलांत हें पोलिसास ठाऊक आहे एकूण?”

“होय. तरी पण आपण येईपर्यंत कोणतीही गोष्ट करावयाची नाहीं, असें ठरलें आहे.”

नेहमीं लागणारी सामुग्री बाबुरावानें आपल्याबरोबर घेतली. आम्हीं दोघेही तयार झालों. इतका वेळ तो नवखा गृहस्थ मोठ्या उत्कंठेनें आमची वाट पहात बसला होता. आम्ही खालीं उतरलेले पहातांच, तो पुढें तयार असलेल्या गाडींत जाऊन बसला. आम्हींही आंत चढतांच गाडी चालू झाली.

गाडी चालू असतांच त्यानें आपली हकीकत सांगितली. माझें नांव वीरेन्द्रगुप्त–असें आहे. ही माझ्या नांवाची कार्ड. ही दुसरी कार्ड मी आपणाला अगोदरच दिली पाहिजे होती, ही माझे वकील सिंहबाबु यांचें नांवाची आहे. ज्या वेळीं ह्या अमानुष गोष्टीचा स्फोट झाला त्या वेळीं ते माझ्याबरोबर होते, व त्यांनींच मला आपणाकडे पाठविलें. आपण तेथें जाऊन पोहोंचेपर्यंत, कांहीं गडबड होऊं नये म्हणून ते तेथेंच राहिले आहेत. ज्याचा खून करण्यांत आला आहे तो माझा मेहुणा आहे. त्याचें नांव “सुकुमारचंद्र.” तो अतिशय वाईट

वर्तणुकीचा मनुष्य होता. सिंहबाबु तुम्हांला सांगतीलच पण-त्याचा व माझा हल्लीं एका त्रासदायक बाबीसंबंधांत पत्रव्यवहार चालला होता. नुकत्याच लिहिलेल्या एका पत्रांत-दुर्दैवानें हें शेवटचेंच होतें-"मला सकाळीं ८ वाजतां आपल्याला भेटावयाचें आहे." असा मजकूर मी लिहिला होता. एका चमत्कारिक पत्रानें माझ्या मेहुण्यानें मला "मी त्या वेळीं आपणाला घरीं भेटेन" असें कळविलें. माझा त्याला भेटण्याचा बेत कायम झाला; सिंहबाबूंनींही माझ्याबरोबर येण्याचें कबूल केलें.

ठरल्याप्रमाणें आम्हीं दोघेहीं त्याच्याकडे जाण्याकरितां, सकाळींच निघालों व अगदीं आठ वाजतां आम्हीं तेथें पोंचलों. खोलीचा दरवाजा आंतून बंद केलेला होता. आम्हीं फार मोठ्यानें घंटा वाजविली. शेवटीं दारावर धक्केही दिले. तरीही कांहीं दाद लागेना; तेव्हां आम्हीं भैय्याला बोलवून आणून त्याच्या जवळ चौकशी केली. 'सुकुमारचें खोलींत रात्रभर चक्क उजेड होता,' येवढेंच त्याच्यापासून आम्हांला कळलें. आमच्याप्रमाणें त्यानेंही जोराजोरानें धक्के देऊन पाहिले. शेवटीं, त्याच्याजवळ असणाऱ्या किल्लीनें त्यानें दरवाजा उघडण्याचा प्रयत्न केला. पण दरवाज्याला आंतून कडी होती. दरवाजा फोडण्याशिवाय आतां दुसरा उपायच नव्हता. अर्थात् आम्हीं पोलिसाला बोलावून आणिलें. दरवाजा फोडण्यांत आला. आम्हीं आंत शिरलों अन् बाबुराव, किती भयंकर देखावा आमचे दृष्टीस पडला! आपले खोलींत सुकुमार जमिनीवर निचेत मरून पडला होता. बरगडींत खंजीर खुपसून कोणी त्याचा खून केला होता; त्या दुष्टानें तो खंजीरही बाहेर काढला नाहीं. तेथेंच तो अजूनही आहे!

गुप्तबाबूंनीं आपलें तोंड रुमालानें पुसलें. ते फार घाबरल्यासारखे दिसत होते. ते पुढें हकीगत सांगणार होते, पण गाडी इच्छित स्थळीं आली. तांबड्या विटांच्या भव्य व उंच वाड्यासमोर येऊन उभी राहिली.

"माझ्या मेहुण्याची खोली दुसऱ्या मजल्यावर आहे," आम्हीं गाडींतून खालीं उतरतां उतरतां गुप्तबाबु म्हणाले. लिफ्टमधूनच आम्हीं वर गेलों. नुकत्याच फोडलेल्या दरवाज्यावर "सुकुमारचंद्र" ही पाटी अजूनही होती. आम्हीं त्याच खोलींत येऊन दाखल झालों.

"आपण आलांत, फार उत्तम झालें." पोलिसचे इन्स्पेक्टर आमच्या बाबुरावांना उद्देशून म्हणतात, "सिंहबाबु आंत बसले आहेत. व ते अगदीं स्फ

पहारा करीत आहेत. खोलींत कोणी गेलें तरी तें त्यांना आवडत नाही." ते पुढें म्हणाले. इन्स्पेक्टरांचें वरील बोलणें जरा तक्रारी स्वरूपाचें दिसलें खरें, पण एकंदर त्यांच्या बोलण्याच्या झोकावरून स्वारी खुनाचा उलगडा करण्यास पूर्वीच लागली असावी असा तर्क होत होता.

आम्हीं लहानशा दिवाणखान्यांत आलों; व तेथून पुढें झालेल्या खोलींत गेलो. याच ठिकाणीं सिंहबाबु व एक शिपाई पहारा करीत असलेले आम्हांला दिसले. आम्ही तडक आंत शिरलों. सिंहबाबूंनीं आम्हीं आल्याबद्दल संतोष प्रदर्शित केला—पण नुसता सांकेतिक काहीं वेळपर्यंत आम्हांपैकी कोणीच बोलेना. तेथील त्या भयानक देखाव्यांत स्वाभाविक उग्रता आली होती. तेथील नेहमीच्या अगदीं क्षुल्लक गोष्टी पण आता अगदीं भयप्रद वाटूं लागल्या. प्रत्येक परिचयाची वस्तु आतां अगदीं भयंकर स्वरूपाची भासूं लागली. क्षणभंगुरत्वाची भीषण कल्पना त्या वेळीं प्रत्येक व्यक्तीच्या मनांत घोळत होती असें पहाणाराला भासत होतें. एक अगदीं सामान्य व्यक्ति. तिचा आयुष्यमार्ग खुंटला! एका क्षणांत त्या व्यक्तीला हा लोक सोडून परलोकाचा मार्ग स्वीकारावा लागला!

खिडक्यांतून, प्रभावशाली क्षितीजनाथाची आरक्त किरणें जरी, दृग्गोचर होत होतीं, तरी त्या भयानक खोलींतील दीप अजून जळतच होते. अर्धारिक्त झालेलें तें पात्र, त्या रिकाम्या खुर्चीजवळील तो ग्रंथ, हीं नुकत्याच झालेल्या अतिशय भयंकर अपघाताची पूर्णपणें साक्षीदार होतीं; आणि या सर्वांत अतिशय भयंकर—भीषण—अशी एक आकृति जी नुकतीच कांहीं तासांपूर्वीं आपली जीवनक्रिया सुरळीत चालवीत होती, आतां निचेष्ट जमिनीवर पडली होती!

" हें फार चमत्कारिक प्रकरण दिसतें." शेवटीं इन्स्पेक्टरसाहेबांनीं शांततेचा भंग करून म्हटलें. " तरी पण कांहीं गोष्टी अगदीं उघड आहेत. प्रत्यक्ष हें शरीरच आपणाला बऱ्याचशा गोष्टी सुचवीत आहे."

आम्हीं पुढें सरकलों व तें प्रेत निरखून पाहूं लागलों. ती एका वयांतील माणसाचीच गोष्ट होती. ती भीषण आकृति—खालीं डोकें करून दोन्ही हात पुढें ताणून—निचेत उपडी पडलेली होती! डाव्या कुशींत खुपसलेल्या खंजिराची बारीकशी मूठ वरच होती; व तोंडावर कांहीं रक्त सांडलें होतें. खंजीर मारून खून करण्यांत आला या गोष्टीशिवाय, दुसरा कांहीं प्रकार उघड दिसून आला नाहीं. मृतदेहापासून कांहीं अंतरावर एक किल्ली पडली होती; व आमची दृष्टि घड्याळाकडे गेली त्या वेळीं त्याचें पुढील झांकण उघडें आहे असें दिसून आलें.

इन्स्पेक्टर म्हणतात "मृतमनुष्य, आपणच पहा, घड्याळाला चावी देण्यांत गुंतला होता ही संधि साधून खुनी मनुष्य पाठीमागून फार सावधगिरीनें आला. घड्याळाचे चावीच्या आवाजामुळें त्याच्या चालण्याचा आवाज मृत मनुष्याला ऐकूं आला नाहीं. अशा रीतीनें छपून येऊन खुनी मनुष्यानें त्याचे पाठींत खंजीर खुपसला; आणि ज्या अर्थी हा खंजीर डाव्या कुशींत मारलेला आहे त्या अर्थी खुनी माणूस डावखुरा असला पाहिजे. अर्थात् या सर्व गोष्टी उघड आहेत. पण तो खुनी इसम आंत आला कसा व नंतर तो बाहेर कोठून गेला. हें एक गूढ आहे."

"या शरीराला कोणी हात लावलेला नाहीं?" बाबुरावानें विचारिलें.

"नाहीं. फक्त डॉक्टरांनीं मृत्यूचा दाखला देण्याकरितां तें प्रेत पाहिलें, येवढेंच. डॉक्टर तुम्ही आल्यावर पुढील व्यवस्था करण्याकरितां पुन्हां येणार आहेत."

"तर मग तुम्ही तें येईपर्यंत प्रेत हालवूं नका. मी फक्त त्याची उष्णता घेतों व या खंजीराच्या मुठीवरील धूळ काढून टाकितो." बाबुराव म्हणाला.

इतकें म्हणून त्यानें आपल्या ' बॅग ' मधून एक ' थर्मामीटर ' बाहेर काढलें. त्याचप्रमाणें धूळ झाडण्याचें एक यंत्र त्यानें काढिलें. तें थर्मामीटर त्यानें त्या मृतशरीराला लाविलें. नंतर त्या यंत्रानें त्या खंजीराचे काळ्याकुट्ट मुठीवर एक प्रकारची सुंदर पिवळी पूड घातली. नंतर त्या मुठीवर इकडे तिकडे पडलेली ती पूड बाबुराव फुंकीत असतां, इन्स्पेक्टर तो मूठ तपासण्याचे इरादानें पुढें सरकले.

निराशाव्यंजक स्वरानें इन्स्पेक्टर म्हणतात "हाताच्या बोटांच्या खुणा या मुठीवर कोठें दिसत नाहींत! बहुधा खुनी मनुष्यानें हातमोजे घातले असावे. यापासून आपल्याला एक मोठा शोध लागला." बोलतां बोलतां त्यांनीं त्या खंजीराचे मुठीवर असलेलीं अक्षरें दाखविलीं.

त्यावर "सूड" एवढींच अक्षरें होतीं.

"हा हिंदुस्थानी शब्द आहे" इन्स्पेक्टर पुढें म्हणतात. मला भय्यापासून कांहीं माहिती मिळाली आहे. आपण त्याला बोलावून विचारूं म्हणजे प्रत्यक्ष आपल्याला पुष्कळ गोष्टी समजण्यासारख्या आहेत.

"इतक्या अवधींत, मी या शरीराचा ' फोटो ' काढून घेतों. शरीरासंबंधीं वस्तुस्थिति कदाचित् महत्त्वाची असणें संभवनीय आहे. येथें कांहींही हल-

विलेलें नाहीं असें तुम्हीं म्हणाला? खिडक्या कोणी उघडल्या?" बाबुरावानें विचारिलें.

"आम्हीं आंत आलों त्या वेळीं त्या तशाच उघड्या होत्या." सिंहबाबू म्हणाले.

"गेल्या रात्रीं उष्मा फार होत होता. या ठिकाणची कोणचीच वस्तु हलविलेली नाहीं."

बाबुरावानें आपल्या पाकिटांतून एक लहानसा 'कॅमेरा' स्टँड, मोजावयाचे टेप, एक बोर्ड, वगैरे जिन्नस तयार केले. खोलीच्या कोपऱ्यांतून एकदां त्यानें सबंध खोलीच्या देखाव्याचें चित्र काढून घेतलें. तेथून तो दरवाज्याजवळ गेला व तेथून त्यानें एक फोटो घेतला. नंतर माझ्याकडे वळून तो म्हणाला "शरत्, तूं त्या घड्याळापुढें उभा रहा. मृतमनुष्य घड्याळाला चावी देण्यांत गुंतला होता असें समजून तूं तशी चावी देत रहा. या स्थितीचा त्यानें एक फोटो घेतला. नंतर मी उभा राहिलों होतों तेथून त्यानें २।३ फोटो काढून घेतले; शेवटीं त्या मृतशरिराचा फोटो त्यानें काढून घेतला.

हें "फोटोग्राफीचें" काम झाल्यावर बाबुरावानें त्या जागेचा 'प्लन' काढून घेतला. इतक्या सर्व गोष्टी होईपर्यंत इन्स्पेक्टर मोठ्या अधीरतेनें पहात होते.

"आपण श्रमाकडे अथवा वेळाकडे मुळींच पहात नाहीं." इन्स्पेक्टर घड्याळाकडे पहात पहात म्हणाले.

"विशेष कांहीं नाहीं" तो प्लॅन बोर्डवरून काढीत बाबुराव म्हणाला. "कोणत्याही प्रकरणांत संबंध असणाऱ्या प्रत्येक गोष्टीचें स्पष्टीकरण करण्याची माझी रीतच आहे. कदाचित् त्या सर्व निरुपयोगी असतील अथवा त्या फार महत्त्वाच्या असूं शकतील. भविष्यकाळच्या गोष्टी आपणांस कांहीं समजत नाहींत. अर्थात् आपणाला तूर्त सर्वच त्या महत्त्वाच्या आहेत. हे पहा, डॉक्टर आलेच."

डॉक्टरनें बाबूरावाला घेऊन त्या मृतशरीराची तपासणी करण्याला प्रारंभ केला. पूर्वींच लावून ठेविलेलें 'थर्मामिटर' बाबुरावानें काढलें व पाहिलें; व ते तसेंच डॉक्टरसाहेबांच्या पुढें केलें.

"प्राणोत्क्रमण होऊन १० तास झाले आहेत." डॉक्टर म्हणाले. "हा खुनाचा प्रकार कांहीं विलक्षण दिसत आहे.

"फारच विलक्षण" बाबुराव म्हणाला. "शरद त्या खंजीराला हात लाव पाहूं."

मी त्या मुठीला हात लावला. हाडांचा चमत्कारिक आवाज मला ऐकूं आला. " खंजीर बरगडीचे हाडांतून आंत गेला असावा ?" मी म्हटलें.

"होय. तो फार जोराने मारण्यांत आला आहे. आणि पहा, कीं मृत-शरीराच्या अंगावरील कापड त्याबरोबर वाटोळें फिरलें आहे. जणूं काय तो पात आंत जातांना फिरत होती."

" ही फार चमत्कारिक गोष्ट आहे; व या जखमेचा विचार केला म्हणजे तर ती फारच भयंकर व चमत्कारिक वाटते."

" ही फार चमत्कारिक आहे हे खरें; पण या मुद्द्याचा आपणाला कितीसा उपयोग आहे; हे मात्र मला समजत नाहीं ! शरीर हलविल्याशिवाय खंजीर काढून घेतां येईल काय ?" डॉक्टरांनीं विचारिलें.

"अर्थात्. कारण जर शरीर हललें तर जखम जास्त खोल होईल. पण थांबा" बाबुराव म्हणाला. आपल्या खिशांतून त्याने एक दोरी काढिली व कांहीं इंच तो खंजीर बाहेर काढून त्याने त्याच्या पात्याशीं समांतर अशी ती दोरी बांधिली; व तिचा टोंक माझ्याजवळ धरायला देऊन त्याने तो खंजीर पूर्णपणें बाहेर काढला. खंजीर बाहेर आल्याबरोबर त्या कपड्याला पडलेली गुंत सुटली.

तो म्हणाला "पहा ! या दोरीवरून आपल्याला त्या जखमेची दिशा कळली. आतां कपड्याला पडलेलें भोंक त्या जखमेवर येत नाहीं. हा जो फरक पडला त्यामुळें पात्याचें फिरण्याचें प्रमाण आपल्याला समजेल."

" होय. हें खरें. तरी पण याचा कांहीं उपयोग आहे असं मला वाटत नाहीं !" डॉक्टर म्हणाले.

"सध्यां" बाबुराव म्हणाला. "सध्यां आपण फक्त घडलेल्या गोष्टीची पहाणी करीत आहोंत."

"बरोबर !" डॉक्टर जरा लाल होऊनच म्हणाले. "आतां आपण हें शरीर त्या निजण्याचे खोलींत नेऊं व तेथें त्याची तपासणी करूं."

आम्हीं तें प्रेत बिछान्यावर नेऊन ठेविलें. डॉक्टरांनीं ती जखम तपासली. आम्हांला नवीन अशी कांहींच माहिती मिळाली नाहीं. तें शरीर झांकून आम्हीं सर्व बाहेरच्या खोलींत आलों.

इन्स्पेक्टर म्हणाले " तुम्ही तें मृत शरीर व त्यावरची ती जखम ही सर्व तपासली. त्याचप्रमाणें या ठिकाणचे फोटो, प्लॅन वगैरे सर्व गोष्टींची बारकाईनें पहाणी केली आहे. पण यापुढें कोणत्याच गोष्टीचा उलगडा झालेला नाहीं. या मनुष्याचा स्वतःचे खोलींत खून झालेला आहे. या खोलीला एकच प्रवेशद्वार आहे. व तें द्वारही खून झाला त्या वेळीं बंद होतें; असें आपणाला दिसत आहे. प्रस्तुत खोलीच्या खिडक्या जमिनीपासून ४० फुटांच्या उंचीवर आहेत. तेव्हां त्या मार्गानें वर चढण्याला कोणतीच सोय दिसत नाहीं. व्हेन्टिलेशन करितां ठेविलेलीं हीं भोंकें नवीनच आहेत व त्यांतून एखाद्या लहशा मांजराचा सुद्धां शिरकाव होणें अशक्य आहे. तेव्हां पहिला मोठा प्रश्न म्हणजे खुनी मनुष्याचा आंत प्रवेश कसा झाला व हें भयंकर कृत्य केल्यानंतर तो बाहेर कोठून पडला ?"

" असें जरी आहे तरी तो आंत आला होता; ही गोष्ट निर्विवाद आहे; कारण खून झाला आहे. पण तो आंत येथे नाहीं. तेव्हां तो बाहेर पडला असलाच पाहिजे. अर्थात् त्या खुनी माणसाला बाहेर पडणें शक्य होतें. तेव्हां तो बाहेर कसा गेला हें शोधून काढणें कांहीं अशक्य नाहीं." वकीलसाहेबांनीं आपलें लॉजिक येथेंच थांबविलें.

इन्स्पेक्टर जरा तुच्छताव्यंजक स्वरानें हंसले. पण त्यांनीं कांहीं उत्तर केलें नाहीं.

" ज्या कांहीं गोष्टी आपणाला दिसत आहेत त्या अशा आहेत. " बाबुराव म्हणाला. " मृतमनुष्य या खोलींत एकटाच होता असें दिसत आहे. खोलींत दुसऱ्या मनुष्याचा प्रवेश झाला होता किंवा काय याचा पत्ता लागत नाहीं. त्याचप्रमाणें ह्या अर्धांगिक भाऊच्याचा पत्ता लागला नाहीं. मृतमनुष्य वाचीत बसला असावा व वाचतांना त्याची दृष्टि घड्याळाकडे गेली, त्या वेळीं तें बंद पडलें आहे असें त्याला दिसलें, त्यावरून तो उठला. त्या वेळीं घड्याळांत १२ वाजण्यास १० मिनिटें होतीं. आपल्या हातांतील पुस्तक त्यानें खालीं ठेविलें. खालीं तोंड करून घड्याळाला चावी देत असतां त्याला मृत्युमुखीं पडावें लागलें. "

" पाठीमागून हळूच पायांचे चवड्यावर चालत येऊन एका डाव्या हाताचे मनुष्यानें खंजीर मारल्यामुळें " इन्स्पेक्टरांनीं वरील विधानाला हा मजकूर जोडलाच.

बाबुरावानें जरा कुचेष्टेनेंच म्हटलें " असें दिसतें खरें. पण आपण त्या भय्याला बोलावूं व तो काय म्हणतो तें ऐकूं. "

भय्याला शोधून आणणे कांहीं कठिण नव्हतें. कारण तो भिंतीच्या पडद्यांतून आंत काय चाललें आहे त्याचें मोठ्या उत्सुकतेनें निरीक्षण करीत होता !

तो आंत आल्याबरोबर बाबुराव म्हणाला " काल्या रात्रीं या खोलींत कोण कोण माणसें आलीं, हें तुला सांगतां येईल काय ? "

" बरेच लोक जात येत होते; पण या खोलींत कोण आला होता हें मला सांगतां येणार नाहीं. मी फक्त गुप्त बाबुसाहेबांचे मुलीला इकडे येतांना पाहिलें होतें. त्या वेळीं ९ वाजण्याचा सुमार होता. "

" माझी मुलगी ! " गुप्तबाबु आश्चर्यानें म्हणतात. " मला हें ठाऊक नाहीं. "

" त्या अर्धतासानें येथून परत गेल्या " भय्या म्हणाला.

" त्या कोणत्या कामा करितां आल्या होत्या हें तूं सांगूं शकशील काय ? " इन्स्पेक्टरसाहेबांनीं प्रश्न केला.

" कदाचित् मला कल्पना करितां येईल. " गुप्तबाबु म्हणाले.

" तरी पण तुम्हीं गप्प रहा " वकील म्हणाले. " कांहीं उत्तर देऊं नका. "

"वकीलसाहेब, तुम्ही तर अगदीं आपल्या कायदेशीर धोरण्यावर आलांत!" इन्स्पेक्टर म्हणाले. " आम्हांला त्या बाईचा संशय येत नाहीं. त्या डाकखुऱ्या आहेत किंवा काय हें आम्ही विचारीत नाहीं ! " हे बोलत असतां ते गुप्त-बाबूंचे चेहऱ्याकडे कुत्सितपणानें पहात होते. आमचे बाबुसाहेब अगदीं फिक्के पडले असें माझ्या लक्षांत आलें.

" त्या पंजाबी लोकांसंबंधीं आम्हांला फिरून सांगा " बाबुरावानें विचारिलें. " त्यांपैकीं पहिला येथें केव्हां आला ? "

" एक आठवड्यापूर्वीं " भय्यानें उत्तर दिलें. " तो अगदीं साधारण मनुष्या-पैकीं दिसत होता. तो वाद्य वाजविणारा दिसला. त्यानें एक पत्र येथें आणलें. त्या पत्राचें पाकीट अगदीं घाणेरडें होतें. त्याचेवर " श्रीयुत सुकुमारबाबु; कॉलेज स्ट्रीट मॅन्शन्स् " असें अगदीं घाणेरड्या अक्षरांनीं लिहिलें होतें. त्या मनुष्यानें तें पत्र माझ्या स्वाधीन करून तें सुकुमारबाबूंना देण्याविषयीं मला सांगितलें. नंतर तो तेथून निघून गेला. मीं तें पत्र " बॉक्स ( Letter Box ) मध्यें टाकून दिलें. "

" पुढें काय झालें ? "

" पुढें या पत्र देणाऱ्या पंजाब्यानंतर दोनतीन पंजाबी मनुष्यें, ( हीं वेष-

धारी होतीं असें मला वाटतें. ) येथें आलीं होतीं. एक हेडंबा हात पहाण्याच्या मिषानें आली; नंतर एक मिठाई विकणारा आला व तिसऱ्या दिवशीं एक माकडाचा खेळ करणारा इसम आला. हीं सर्व मनुष्यें अत्यंत क्रूर, गलिच्छ व लोचट होतीं. त्यांना येथून घालवून लावण्यास मला फारच त्रास पडत असे; इतकीं तीं लोंचट होतीं ! "

" आणि हाच माकडाचा खेळ करणारा मनुष्य शेवटचा होता ? " इन्स्पेक्टरनें विचारलें. त्या भय्यानें आपल्या मानेनेंच होय म्हणून सांगितल्यावर ते पुढें म्हणतात " त्या पंजाबी इसमानें दिलेले पत्र तुला ओळखतां येईल काय ?"

" ओळखीन " जरा आस्थेनेंच त्या भय्यानें उत्तर दिलें.

इन्स्पेक्टर झपाट्यानेंच खोलीच्या बाहेर गेले व ताबडतोब परत आले. त्यांच्या हातांत एक पत्रांचें पुडकें दिसत होतें. तें पुडकें त्यांनीं शेजारच्या टेबलावर ठेवलें. एक खुर्ची जवळ ओढून तीवर ते बसले. " हें त्या मृतमनुष्याचें चोरखिशांत होतें. हीं तीन पत्रें एकत्र बांधिलेलीं आहेत. हेच तें पत्र असावें ! " त्यांनीं त्या पत्रांसभोंवतालचा दोरा सोडला व एक पत्र बाहेर काढलें.

" श्रीयुत सुकुमारगुप्त " असें घाणेरड्या अक्षरांनीं त्यावर लिहिलें होतें.

" त्या पंजाब्यानें जें पत्र तुला दिलें तें हेंच काय ? " इन्स्पेक्टरांनीं त्या भय्याला विचारलें.

त्यानें तें पत्र अगदीं बारकाईनें पाहिलें. " होय. तेंच हें पत्र " तो सरतेशेवटीं म्हणाला.

इन्स्पेक्टरांनीं आंतील कागद बाहेर काढला. उघडतांच त्यांना कांहीं तरी आश्चर्य वाटलें असें त्यांच्या चेहेऱ्यावरून दिसलें.

" आपल्याला त्यावरून काय बोध होतो ? " बाबुरावाकडे तें पत्र देऊन त्यांनीं विचारलें.

बाबुरावानें तें पत्र अगदीं बारकाईनें पाहिलें. नंतर तो तें खिडकीजवळ घेऊन गेला. व त्यानें खिशांतून 'मॅग्निफाईंग ग्लास' Magnifying glass काढून तें पत्र तो अगदीं काळजीपूर्वक पाहूं लागला.

" तुम्हांला तो नुसत्या डोळ्यांनींच दिसला असता त्यांतील अक्षर बऱ्याच मोठ्या प्रमाणावर लिहिलेलें आहे; असें मला वाटतें " इन्स्पेक्टर जरा हंसत म्हणाले.

" तें खरें आहे " बाबुराव म्हणाला. " फार चित्ताकर्षक हें चित्र आहे. आपलें काय मत आहे सिंहबाबु ? "

सिंहबाबूंनीं तें पत्र आपले हातांत घेतलें. त्यांच्या पाठीमागें उभा राहून मीं तें पहात होतों. खरोखरच ती मला फार चमत्कारिक आकृति वाटली. अगदीं साध्या कागदावर तांबड्या शाईनें लिहिलेलें होतें. पत्त्यावरील अक्षराप्रमाणें तेंही अक्षर घाणेरडें होतें. " आपल्याला, योग्य तें करण्यास सहा दिवसांचा अवधि देत आहे. जर त्याप्रमाणें आपण करणार नाहीं तर पुढील प्रकाराची कल्पना अग्रभागीं असलेल्या आकृतीवरून करावी " असा आंतील मजकूर होता.

कपाळाचा भाग दाखवून त्याच्यावर दोन हाडांची फुली काढून दाखविली होती ! ही आकृति अगदीं स्पष्ट काढलेली होती. पण त्या पत्राच्या शिरोभागीं गलिच्छ रीतीनें ती काढलेली होती.

तें पत्र गुप्तबाबूंजवळ देऊन सिंहबाबु म्हणतात " यावरून त्यानें आपणांला काल लिहिलेल्या चमत्कारिक प्रश्नाचा उलगडा होतो. मला वाटतें तें पत्र तुमच्याजवळ आहे. "

" होय, हें पहा. " असें म्हणून गुप्तबाबूंनीं तें पत्र खिशांतून बाहेर काढलें व त्यांनीं तें मोठ्यानें वाचलें.

" कबूल. येण्याची मर्जी असल्यास यावें. ही जरी वाईट वेळ आहे तरी कांहीं हरकत नाहीं. आपल्या धमकावणीच्या पत्रांनीं मला मोठी करमणूक होत असते ! "

' सुकुमार. '

" सुकुमारबाबु कधीं पंजाबमध्यें राहिले होते काय ? " इन्स्पेक्टरनीं विचारलें.

" अगदीं खरें. " गुप्तबाबु म्हणतात " गेलें सर्व वर्ष ते लाहोरला रहात असत. "

" वः ! मग बराच उलगडा झाला. हीं पहा दोन पत्रें; यांच्यावर लाहोरचा छाप आहे. " असें म्हणून त्या विलक्षण पत्रांपैकीं एक अखेरचें पत्र त्यांनीं पुढें केलें. त्यांत फक्त तीन शब्द होते. " याद राखा ! लाहोरची आठवण असूं द्या ! "

" आपलें काम झालें असेल, बाबुराव ! तर मी लाहोरला जाणार आहें. त्या चार पंजाब्यांना शोधून काढणें फारसें कठिण नाहीं. आपला भय्या त्यांना ओळखील. " इन्स्पेक्टर मोठ्या उतावळींत दिसले.

" आपण जाण्याचे पूर्वी कांहीं लहानसहान गोष्टींचा शेवट लावण्याचा माझा

विचार आहे. त्यांपैकीं पहिली–हा खंजीर मला वाटतें तो तुमच्याजवळ आहे. मला जरा तो दाखवाल काय ? " बाबुरावानें विचारलें.

इन्स्पेक्टरांनी तो खंजीर—जरा नाखुषीनेंच त्याला दाखविला.

" हें फार चमत्कारिक शस्त्र आहे बुवा ! " बाबुराव म्हणाला.

" आकृति व शस्त्राची धातू—सर्वच चमत्कारिक. अल्युमिनिअमची पात मी खंजीराला पूर्वी पाहिली नव्हती; व मोरोक्कोचें चामडेंही मुठीला घातलेलें मी पहिल्यानच पहात आहें. "

" अल्युमिनिअमचा उपयोग हलकेपणाकरितां आहे. व तो अरुंद करण्याचें कारण शर्टचे आंतून तो नेतां यावा असा आहे " इन्स्पेक्टर म्हणाले.

" संभवनीय आहे ! " बाबुराव म्हणाला. तो खंजीर त्यानें बारकाईनें तपासला, बाबुरावानें त्या खंजीराचा नकाशा काढून घेतला. प्रत्येक भाग पूर्णपणें मोजून घेऊन कांहीं वर्णनही लिहून घेण्यास चुकला नाहीं. खंजीर त्यानें परत दिला.

" दुसरी गोष्ट म्हणजे " बाबुराव म्हणाला " पुढें दिसणाऱ्या घरासंबंधीं. " तो खिडकीजवळ गेला. आम्ही होतों त्याच घराप्रमाणें हें घर होतें. त्याचा पार्श्वभाग त्यानें निरखून पाहिला. सुमारें ५० यार्डांचे अंतरावर तें घर होतें. तें घर व प्रस्तुत घर यांच्यामधील जागेंत झाडें, फुटपाथ वगैरे होतीं.

" जर या खोल्यांपैकीं एखाद्या खोलींत कोणी मनुष्य होता असा सुगावा आपणांस लागेल तर हा खून प्रत्यक्ष पाहिलेला मनुष्य सांपडेल. या खोलींत स्पष्ट उजेड होताच. खिडक्यांचे पडदे सर्व वर केलेले होते. अर्थात् त्या समोरच्या खिडक्यांतून पहाणाराला या खोलींतिल सर्व प्रकार दिसत होता व हा सर्व प्रकार त्याला अगदीं स्पष्ट दिसला पाहिजे. या गोष्टीची चवकशी केली असतां आपला फायदा होणार आहे. " बाबुराव थांबला.

" होय, हें खरें आहे. " इन्स्पेक्टर म्हणतात " पण माझी अशी कल्पना आहे कीं, त्या खिडक्यांतून कोणी पाहिलें असल्यास, खुनाची हकीगत वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाल्यावर तो पुढें येईलच—मला आतां गेलेंच पाहिजे. या खोलीला कुलूप घालणें जरूर आहे. "

आम्ही सर्व खोलीच्या बाहेर आलों.

" या मनुष्याचें मृत्यूपासून कोणाचा फायदा आहे ? " बाबुरावानें विचारिलें.

" ती एक चमत्कारिक गोष्ट आहे ? " खोलींतून आपणांला जी बाग दिसली तेथें येत असाल तर मी आपणाला सर्व सांगतो. " सिहबाबु म्हणाले.

सर्व मंडळी गेल्यावर आम्हीं बागेकडे गेलों.

त्या उंच घराकडे पहात पहात बकीलबुवा म्हणाले " आपण विचारिलेल्या प्रश्नाचें उत्तर अगदीं सरळ आहे. नरेन्द्रनाथ नांवाचा एक एजंटाचा धंदा करणारा मनुष्य आहे. त्यालाच या मृत्यूपासून फायदा आहे. त्याचें व मृत मनुष्याचें कांहीं नातें नाहीं, पण तो त्याचा अगदी जिवलग मित्र आहे. सुकुमाराचे मरणानंतर त्याच्या ३,००,००० तीन लाख रुपयांच्या इस्टेटीचा तो मालक होणार आहे. तो प्रकार असा. सुकुमार हा दोन भावंडांपैकी मोठा होय. लहान वीरेन्द्र हा आपल्या वाडलांचे ह्यातींतच मृत्यु पावला. त्याच्या पश्चात् त्याची विधवा स्त्री व तीन मुलें इतका परिवार होता. नंतर १५ वर्षांनी वडील मरण पावले. त्यांनीं आपली सर्व संपत्ति सुकुमारला दिली. त्या वेळीं त्यांचा असा समज होता कीं, सुकुमार आपल्या भावजयीचें व तिच्या मुलांचें संगोपन करील. "

" मृत्युपत्र झालें नाहीं ? " बाबुरावानें विचारिलें.

" आपल्या मृत मुलाचे लेकांच्या सांगण्या वरून मरणापूर्वी कांहीं दिवस त्यानें ( बापानें ) मृत्युपत्र तयार केलें होतें. पण तो अतिशय म्हातारा झाला होता. त्यामुळें पराधीन होता. अशा स्थितींत सुकुमारानें आपलें वर्चस्व त्याच्यावर बसवून तें मृत्युपत्र मरणसमयीं रद्द करून घेतलें ! त्या वेळेपासून त्यानें आपल्या बंधूच्या कुटुंबाला एक पैसुद्धां दिला नाहीं. गुप्तबाबूंच्या औदार्यानें वीरेन्द्राचे विधवेला व तिच्या मुलांना अन्न मिळत आहे ! या कुटुंबाचें ओझें सर्वस्वीं आतां त्याच्यावर पडलें आहे. हल्लीं या स्थितीला दोन बाजूंनी अगदीं तीक्ष्ण स्वरूप आलें होतें. वीरेन्द्राचा वडील मुलगा आतां वयांत आला होता व गुप्तबाबूंनीं त्याला एका व्यापारी ' फर्म ' मध्यें नोकरी लावून दिली होती. आपल्या कामामध्यें तो वाकबगार झाला व त्या ठिकाणीं त्याच्या चलाखीची छाप पडली. ' फर्म ' चा भागीदार घेण्याचा फर्म तयार झाली. अर्थात् येथें पैशाचा प्रश्न उभा राहिला. आम्ही वडिलांच्या इच्छेप्रमाणें सुकुमारानें पैसे द्यावे, असें सांगत होतों. पण तो कबूल करीना. व याच बाबतींत त्याच्याकडे आज सकाळीं आम्हीं जाणार होतों

" दुसरी गोष्ट म्हणजे विलक्षण व लज्जास्पद आहे. ही या नरेन्द्रासंबंधीं होय. मीं सांगितलेंच कीं मृतमनुष्याचा तो एक जिवलग स्नेही होता. हा

अति निंद्य वर्तनाचा माणूस आहे. याची मैत्री दोघांनाही भूषणास्पद नव्हती. एक स्त्री आहे, तिचा व या मृतमनुष्याचा कांहीं वाईट संबंध होता. पण सध्या आपल्याला त्याची जरूर नाहीं. सुकुमार व हा नरेन्द्र यांच्यामध्यें एक ठराव झाला होता. ”

“ ( १ ) नरेंद्रानें त्या स्त्री-बरोबर लग्न करावें व म्हणून ( २ ) सुकुमारनें आपली सर्व संपत्ति नरेन्द्राला द्यावी व ( ३ ) सुकुमारचे इस्टेटीचा ताबा नरेन्द्राला सुकुमारचे मरणानंतर मिळावा. ”

“ हा सर्व करार पूर्ण झाला होता ? ” बाबुरावानें विचारिलें.

“ दुर्दैवानें तो झाला होता ! पण सुकुमारचे हयातींत त्या विधवेची व तिच्या मुलांची कांहीं व्यवस्था झाल्यास आम्ही प्रयत्न करीत होतों. व याच प्रकरणांत माझी मुलगी गेल्या रात्रीं त्याच्याकडे आली असावी. माझी मुलगी विवाहित आहे. त्यांच्या भेटींत मोठाच कडाका उडाला असा माझा समज आहे. ”

बाबुराव स्वस्थ होता. आपली दृष्टि खालीं लावून अति हळूहळू व चौकस दृष्टीनें पहात जात होता. जणू काय तो कांहीं शोधीत होता. “ नरेन्द्र कोणत्या तऱ्हेचा मनुष्य आहे ? ” शेवटीं त्यानें विचारिलें. “ तो नीच वृत्तीचा मनुष्य आहे हें तर उघडच आहे, पण त्याची वस्तुस्थिति कशी आहे ? ”

“ तो फार शहाणा व विद्वान् मनुष्य आहे. ” गुप्तबाबु म्हणाले. “ तो पूर्वी ‘ इंजिनियर ’ होता. आपल्या धंद्यांत तो पूर्ण वाकबगार होता. त्यानें बराच पैसा सांठविला, पण तसाच आपला वेळ व सर्व पैसा जुगारांत व व्यसनांत त्यानें खर्च केला. हल्लीं त्याला पैशाची बरीच निकड लागली असावी असा माझा तर्क आहे. ”

आणि त्याचें बाह्य स्वरूप ? ” बाबुरावानें विचारिलें.

“ मीं त्याला एकदांच पाहिलें आहे व मला आठवतें त्याप्रमाणें तो जरा ठेंगूच व सडपातळ असा आहे. तो देखणा असून रहाणीनें स्वच्छ आहे. त्याच्या डाव्या हाताचें मधलें बोट तुटलेलें आहे असेंही मला आठवतें. ”

“ त्याचें रहाण्याचें ठिकाण ? ”

“ कलकत्त्यांतच. ” वकिलांनीं उत्तर दिलें. असें म्हणून त्यांनीं व गुप्तबाबूंनीं आपला मार्ग धरला. जाते वेळीं आमच्या घरीं येण्याचे त्यांनीं कबूल केलें.

बाबुराव एका फुलाचे ताटव्याकडे टक लावून पाहूं लागला.

" हें फार चमत्कारिक व मजेचें प्रकरण आहे." त्या ताटव्याखालीं डोकावून पहात पहात बाबुराव म्हणतो " इन्स्पेक्टर अगदीं सक्त चौकशी करीत आहे. ही ' केस ' आपल्या मुठींतच आहे असा त्याचा समज आहे ! हा पहा, भय्या इकडेच येत आहे. आपणाजवळून बातमी काढण्याचा त्याचा विचार आहे. पण–" त्या भय्याकडे पाहून हंसत " या घराचा पुढील भाग कोणत्या ठिकाणांत आहे म्हणतोस ? "

" कॉलेज स्ट्रीटमध्यें साहेब. " तो उत्तरला. 'तेथें सर्व कचेऱ्याच आहेत.'

" आणि त्या घरांतील खोल्यांचे नंबर ? ती खिडकी उघडी असलेल्या खोलीचा नंबर ? "

" तो ६ नंबर आहे महाराज. पण सुकुमार बाबूंचे खोलीसमोर असलेल्या खोलीचा नंबर ८ आहे " तो पुढें म्हणाला.

" शाबास " इतकें म्हणून बाबुराव पुढें चालूं लागला. पण मागें वळून त्यानें त्याला उद्देशून म्हटलें " या खिडकींतून माझ्या हातून आतांच एक जिन्नस पडला. यासारखी लोखंडी कडी आहे " असें म्हणून त्यानें एक आकृति त्याला दाखविली. " तो कोठें पडला हें मला माहीत नाहीं, पण तो अशा तऱ्हेचा आहे. बागेच्या माळ्याला तो तूं शोधावयास सांग. तो माझ्या घरीं आणून दिला तर मी त्याला १० रुपये इनाम देईन; कारण दुसऱ्या मनुष्याला जरी तो महत्त्वाचा नसला तरी तो मला फार महत्त्वाचा आहे. " सलाम करून तो भय्या निघून गेला. आम्ही दरवाज्याजवळ आलों, त्या वेळीं मी मागें पाहिलें तों भय्या तो तुकडा शोधूं सुद्धां लागला होता !

त्या तुकड्यासंबंधानें मला फार बिकट कोडें पडलें होतें. बाबुरावाला खालीं टाकतांना मीं कांहीं पाहिलेलें नाहीं. व महत्त्वाची वस्तु बाबुराव इतक्या निष्काळजीपणानें हातांत धरील हें मला संभवनीय वाटेना. मी त्याला विचारणार होतों, पण इतक्यांत त्या ' कॉलेज स्ट्रीटमध्ये तो झपाट्यानें वळला. तो ६ नंबरच्या घराजवळ येऊन दाखल होईपर्यंत थांबलाच नाहीं. बाहेर लावलेल्या नांवाच्या पाटीजवळ जाऊन ती त्यानें लक्षपूर्वक वाचिली. " तिसरा मजला " त्यानें मोठ्यानें वाचलें " बाबू अविनाश, कमिशन एजंट. " हं मला वाटतें आपण याच मनुष्याची भेट घ्यावी " बाबुराव म्हणाला.

आम्ही त्या दगडी जिन्यावरून तडक तिसऱ्या मजल्यावर येऊन उभे राहिलों. त्या कमिशन एजंटाच्या खोलीजवळ गेलों. आम्ही प्रथम आंतील बडबड ऐकत

उभे राहिलों. कांहीं वेळानें बाबूरावानें हलकेंच दरवाजा उघडला आणि आंत डोकावलें; क्षणभर तसाच राहून नंतर माझ्याकडे वळून तो हसला व अगदीं हलकेंच त्यानें तो दरवाजा अगदीं ताठ उघडा केला.

त्या खोलीत सुमारे एक १४ वर्षांचा मुलगा कांहीं हस्तकौशल्याच्या खेळाची 'प्रॅक्टीस' करीत होता. आपल्या त्या खेळांत तो इतका गढून गेला होता, कीं आम्हीं खोलीचा दरवाजा उघडून आंत येऊन तो बंद केला, तरी सुद्धां त्याला कांहीं समजलें नाहीं! इतक्यांत ज्या चेंडूबरोबर तो खेळत होता, तो त्या दोरीपासून सुटला व एका मोठ्या टाकाऊ कागदांच्या टोपलींत पडला. अर्थात् त्याची दृष्टि आतां त्या ठिकाणाहून निघाल्यामुळें आमच्याकडे वळली. तो अगदीं गोंधळून गेलेला दिसला. या संधीचा फायदा घेऊन बाबुरावानें कांहीं संबंध नसतां त्या टोपलींतील तो चेंडू त्याला काढून दिला व त्यानें त्या पोऱ्याला विचारिलें "अविनाशबाबु घरीं आहेत किंवा काय अथवा ते घरीं केव्हां येणार तें विचारावयास नकोच!"

तो पोऱ्या अतिशय घाबरल्यामुळें अगदीं घामानें भिजलेला दिसला. "ते आज परत येणार नाहींत. मी घरीं येण्याचे आधींच ते गेले. मला जरा येण्यास उशीर झाला!" तो पोऱ्या उत्तरला.

"अस्से!" बाबुराव म्हणाला, लवकर जाणाराचें काम फते होतें व उशीरां येणाराला खेळावयास सांपडतें. ते परत येणार नाहींत हें तुला कसें समजलें?"

"त्यांनीं एक चिठ्ठी लिहून ठेविली होती. ती ही पहा" असें म्हणून त्यानें बाबुरावाला ती चिठ्ठी दाखविली. तांबड्या शाईनें नीटनेटकी ती लिहिलेली होती. बाबुरावानें ती काळजीपूर्वक तपासून पाहिली. व नंतर तो त्या पोऱ्याला उद्देशून म्हणाला 'मला येथें येण्याचें कारण असें आहे कीं माझी व एका अविनाश नांवाच्या गृहस्थाची ओळख आहे व तेच हे आहेत किंवा काय याचा तपास लावावा या हेतूनें मी येथें आलों आहें. मला वाटतें ही माहिती तूं मला सांगूं शकशील. माझा मित्र उंच असून सडपातळ होता व त्याचा वर्ण काळा होता. त्याला दाढी वगैरे कांहीं नाहीं."

मग ते हे नव्हेत." तो पोऱ्या म्हणाला "हे अंगानें सडपातळ आहेत खरे, पण हे उंचही नाहींत व काळेही नाहींत; शिवाय यांना दाढी आहे. यांना चष्मा लावावा लागतो तसेच डोक्याला Wig वापरण्याचा यांचा परिपाठ आहे. 'विग्' वापरतात, हें मी कशावरून सांगतों म्हणाल, तर, ते ज्या वेळीं केंस विंचरतात त्या वेळीं मीं तो पुष्कळदां पाहिला आहे.

" माझ्या मित्राचा डावा हात अधू आहे. " बाबुराव पुढे म्हणाला.

" यासंबंधीं मात्र मला कांहीं सांगतां येणार नाहीं. कारण ते सदा हातमोजे घालून असतात; व डाव्या हातांतील हातमोजा तर ते कधींच काढीत नाहींत ! "

" बरं, पण मी एक त्यांना पत्र लिहून ठेवितों. पाहूं, एक कागद दे पाहूं थोडी शाई सुद्धां असेलच ? " बाबुरावानें विचारिलें.

" बाटलींत थोडीशी आहे. मी तो टांक आपणांला आंत बुडवून देतों. "

त्यानें एक अगदीं स्वस्त मिळणाऱ्या नोटपेपरचें पुडकें काढलें व ताबडतोब प्रतीचें एक पाकीट काढिलें, नंतर तो टांक बाटलींत बुडवून ते सर्व बाबुरावाचे हातीं दिलें. घाईतच त्यानें तीनचार ओळी त्यावर खरडल्या. त्यानें नतर त्या कागदाची घडी केली पाकीटावर पत्ता लिहिण्याचे तो बेतांत होता इतक्यांत त्याचा तो बेत फिरला असें दिसलें.

तो घडी केलेला कागद खिशांत घालतां घालतां म्हटलें " चिठ्ठी ठेवावी असें मला वाटत नाहीं; नाहींच मी ठेवीत ! त्यांना तूं तोंडीच सांग कीं, राघवेन्द्र या नावाचे कोणी इसम आले होते व ते एकदोन दिवसांनंतर आपणाला पुन्हा भेटण्यास येणार आहेत. "

आम्ही जाऊं लागलों त्या वेळीं तो पोऱ्या आमच्याकडे अगदीं टक लावून पहात होता. बाबुरावानें मागे पाहिलें तेव्हां त्याची व त्या पोऱ्याची दृष्टादृष्ट होताच तो अतिशय त्वरेनें आंत गेला. स्पष्ट सांगावयाचें म्हणजे मी सुद्धां कांहीं थोडा गोंधळलों नव्हतों. या सर्व गोष्टी व ज्या खुनाचे तपासांत बाबुराव गुंतला होता त्याचा काय संबंध आहे हेंच मला समजेना. एका ठिकाणीं बाबुराव उभा राहिला. त्यानें ही चिठ्ठी बाहेर काढली व आपल्या दुर्बिणीनें ती तपासली. त्यानें ती वर उजेडांत धरली, त्या वेळीं तो मोठ्यानें हंसला. त्या वेळीं तर माझ्या अचंब्याचा कळस झाला.

" आपले श्रम कांहीं व्यर्थ गेले नाहींत. " बाबुराव म्हणाला. " आपली प्रगति बरीच होत आहे ! "

" आम्हीं दोघेही खालीं गेलों. तेथील एका खोलीजवळ बाबुराव उभा राहिला. त्यानें आंत डोकावलें. त्यांना नमस्कार करून तो म्हणाला " आम्हीं वर अविनाशबाबूंना भेटण्याला नुकतेंच गेलों होतों. ते फारच लवकर बाहेर निघून गेले असें दिसतें. "



" त्यानें तीन चार ओळी त्यावर खरडल्या." [पृ. १७७]

" होय. ते सुमारें ८॥ वाजतां बाहेर गेले. "

" हें जरा लवकरच. पण ते आलेही लवकरच असें मला वाटतें. आम्हीं ज्या वेळीं येथें आलों त्याच वेळीं ते परत गेले असावे. त्यांचेबरोबर कांहीं सामान होतें ?"

" होय, दोन पेट्या होत्या, एक चौकोनीच होती व दुसरी लांब असून अरुंद सुमारें ५ फूट लांबीची—अशी होती. आम्हींच त्या गाडींत नेऊन ठेविल्या. "

" अविनाशबाबु, मला वाटतें, येथील रहिवासी नसावेत. "

" नाहींत, सुमारें ६ आठवड्यांपूर्वी ते येथें आले. "

" बरं आहे. पुन्हा केव्हां तरी मी त्यांच्याकडे येणार आहें " असें म्हणून आम्हीं तेथून निघालों ते थेट स्टँडजवळ आलों. एका गाडींत आम्हीं बसलों, बाबुरावानें एका चमत्कारिक दुकानाचें नांव सांगतांच गाडी चालू झाली.

इच्छित स्थळीं पोंचल्यावर बाबुरावानें कांहीं जिनसाची खरेदी केली. त्यांत एक संगिनीप्रमाणें तरवार व एक बंदूक हीं खरेदी केलेली पाहून मला आश्चर्य वाटलें. बाहेर आल्यानंतर मला तो म्हणतो " या सर्व वस्तु राघवेन्द्राकरितां आहेत. "

" पण हीं शस्त्रें घेण्याचें काय कारण ? " मी त्याला अधीरतेनें विचारिलें.

" गृहसंरक्षण " त्यानें ताबडतोब उत्तर दिलें. " तूंच पहा, कीं बंदुकीची गोळी व लागोपाठ संगिनीचा मारा यांनीं सर्वांत शूर अशा भामट्याचा सुद्धां पाडाव करितां येतो ! "

मला तर हसूं आलें. माझ्या मित्राच्या या चमत्कृतीबद्दल मी तर्क करूं लागलों. या सर्वांचा अर्थ काय हें जरी मला समजणें शक्य नव्हतें तरी त्यांचा खुनाचे प्रकरणातच संबंध आहे, हें मी समजून चुकलों होतों.

बाबुराव, जेवणानंतर ड्राइंगचें सामान घेऊन बसला ! जवळच राघवेंद्र हुकुमाची मार्गप्रतीक्षा करीत उभा होता. मी प्रस्तुत प्रकरणांतील कांहीं शिल्लक राहिलेलीं कामें करण्याकरितां बाहेर निघून गेलों.

परत येत असतां वाटेंत सिंहबाबु मला भेटले. " हस्ताक्षराचा नमुना बाबुरावानें मागितला होता. तो घेऊन मी आलों आहें " ते मला म्हणाले.

आम्हीं आंत शिरलों त्या वेळीं बाबुराव राघवेन्द्राजवळ बोलण्यांत अगदीं गढून गेला होता; व ज्या खंजिरानें खून करण्यांत आला होता तोच खंजीर टेबलावर पाहून मी विलक्षण आश्चर्यांत पडलों !

" तुम्हीं हस्ताक्षराचा नमुना मागितला होता तो मी आणिला आहे." वकील म्हणाले " हा आम्हाला सांपडेल असें वाटलें नव्हतें, पण तो सुदैवानें सांपडला. गुप्तबाबूंनीं त्यांच्याकडून आलेलें एक पत्र सुदैवानें जपून ठेविलें होतें. " आपल्या खिशातून पत्र काढीत वकील बाबुरावाला म्हणाले. बाबुरावानें तें पत्र निरखून पाहिलें. त्याला बरेंच समाधान झाल्यासारखें दिसलें.

" मला वाटलें हा खंजीर त्या इन्स्पेक्टरांनीं आपल्याबरोबर नेला ? " सिंह-बाबूंनीं बाबुरावाला विचारिलें.

" तो तर त्यांनीं नेलाच. पण हा राघवेन्द्रानें या प्लॅनप्रमाणें तयार केलेला आहे. " बाबुराव उत्तरला.

" खरोखर " वकीलसाहेब राघवेन्द्राकडे वळून म्हणतात, " ही हुबेहूब नक्कल आहे आणि तो तूं अगदां थोड्याच अवधींत तयार केलास ! "

" हा तर एक मुख्य मुद्द्यांतील विषय आहे " बाबुराव म्हणाला.

वरील प्रकारचीं आमचीं बोलणीं होत आहेत तोंच गुप्तबाबु अगदीं वेगानें व धापा टाकीत तेथें आले.

" वकीलसाहेब " सिंहबाबूंना उद्देशून ते ओरडले. " वकीलसाहेब, अति भयंकर प्रकार झाला आहे. खुनाचा आरोप, माझ्या मुलीवर लादण्यांत आला आहे ! इन्स्पेक्टरांनीं तिला कैद करून नेली. मी मात्र आतां खास वेडा होणार ! " ते अतिशयच घाबरलेले दिसत होते.

बाबुरावानें त्या क्षुभित झालेल्या बाबूंच्या खांद्यावर आपला हात ठेविला. " बाबुसाहेब, आपण काळजी करूं नका. आपल्या मुलीबद्दल संशय घेण्याला कोणत्याच प्रकारची जागा नाहीं. हें मी तुम्हाला खात्रीनें सांगतों. आपली मुलगी डावखुरी आहे ? " बाबुरावानें त्यांचें सांत्वन करीत विचारिलें.

" होय, ती आहे खरी. पण हा तिचा अपराध नव्हे ! त्यांनीं तिला आपल्या ताब्यांत घेतली ! " गुप्तबाबु अगदीं गर्भगळीत झाले होते.

" आपण तिची लवकरच सुटका करूं " बाबुराव त्यांना आश्वासन देत होता, इतक्यांत प्रत्यक्ष इन्स्पेक्टरच आमचे समोर येऊन उभे राहिले. ते गुप्तबाबूंना नेण्याकरितां आलेले दिसले. गुप्तबाबूही त्यांच्याबरोबर जाण्याच्या तयारींत दिसले.

" जरा थांबा इन्स्पेक्टरसाहेब ! " बाबुरावानें त्यांना म्हटलें. "माझें तुमच्या-जवळ काम आहे."

“ बाबुसाहेब तुम्ही मात्र आतां जा व एका तासानें परत या. त्या वेळीं तुम्हाला आम्ही पुष्कळ माहिती सांगूं ” बाबुराव गुप्तबाबूंकडे वळून म्हणाला.

गुप्तबाबु तेथून निघून गेले.

“ तुम्ही तर अगदीं सक्त शोधांत गुंतलेले दिसतां इन्स्पेक्टरसाहेब ? ” बाबुरावानें विचारलें

“ होय. ” ते म्हणाले. “ क्षणही फुकट न दवडतां खुनी मनुष्य म्हणजे गुप्तबाबूंची मुलगीच होय असें मीं शोधून काढलें आहे. अर्थात् माझ्याजवळ तसा पुष्कळ पुरावा आहे ! तुम्हांला ठाऊकच असेल कीं मृतमनुष्याचे खोलींतून जाणारी ती शेवटलीच होती. तिचें व त्याचें कडाक्याचें भांडण झालें होतें. ती डावखुरी आहे. खून डाव्याच हातानें करण्यांत आला आहे ! ”

“ आणि पुढें ? ” बाबुरावानें विचारलें.

“ पुढे, मीं त्या पंजाबी इसमांना पाहिलें आहे. एका विधवा बाईनें त्या भय्याला लांच दिली व त्याच्यावरून तें पत्र मृतमाणसाला पोंचेल अशी तजवीज केली. अशा रीतीनें त्या पंजाब्याचा त्या बाईनें आंत शिरकाव केला. त्या स्त्रीला अजून आम्हीं शोधून काढलेली नाहीं. पण तिच्यांत व या गुप्तबाबूंच्या मुलींत पुष्कळ साम्य आहे असें आम्हांला परिस्थितीवरून कळलें आहे ! ”

“ पण दरवाज्याला आंत कडी लावून खुनी इसम बाहेर कसा आला ? ” बाबुरावानें विचारलें.

“ वः ! हाच तर चमत्कार ! आम्हीं ज्या वेळीं दरवाजा फोडला त्या वेळीं आमचें लक्ष चुकवून खुनी इसम बाहेर पडला असावा ! ही गोष्ट आपल्याला सुद्धां नाकबूल करतां येणार नाहीं ! ”

“ कांहीं असलें तरी मला हें नाकबूल करणें भाग आहे. ” बाबुराव म्हणाला. “ आपण तर चकित झालेले दिसतां. पण हें प्रकरण अगदीं उघड आहे. त्या शरिराकडे पाहिल्याबरोबर मला बऱ्याच गोष्टी कळून आल्या. खोलींतून बाहेर कोणीच गेलेलें नाहीं हें अगदीं उघड आहे. तुम्ही आंत आलां त्या वेळीं आंत कोणीच नव्हतें. अर्थात् खुनी इसम त्या ठिकाणीं मुळीं आलेलाच नाहीं ! ”

“ आपल्याला हें कांहीं समजत नाहीं ” इन्स्पेक्टर उद्गारले.

" ठीक आहे " बाबुराव म्हणाला. " आपल्या हातीं ज्या वेळीं मी हें प्रकरण देईन त्यावेळीं सर्व गोष्टी क्रमशः सिद्ध करून दाखवीन. पण हें मात्र खरेंच आहे कीं मृतमनुष्य, ज्या वेळीं त्याला मृत्युमुखीं पडावें लागलें, त्या वेळीं घड्याळाला चावी देत होता. खंजीर डाव्या कुशींत गरगर फिरत शिरलेला आहे. तुम्हांला स्मरत असेल तर पहा; कीं, त्या मुठीची दिशा त्या उघड्या खिडकीकडे होती. "

" सदरहू खोली ४० फूट उंचीवर आहे ! "

" होय. आतां आपण ज्या चमत्कारिक हत्यारानें खून केलेला आहे त्याच्याबद्दल पाहूं. " बाबुरावानें त्या टेबलावरील खंजिराच्या मुठीला हात घातला इतक्यांत भग्या तिथें आला.

" आपण शोधांत होता ती ही वस्तु. माझें नशीब म्हणूनच ती सांपडली ! त्या झुडपाचे पानाला चिकटून ती राहिली होती. " तो तडक बाबुरावजवळ गेला व त्यानें एक पुडी त्याच्याजवळ दिली.

देऊं केलेलें बक्षीस घेऊन भग्या निघून गेला.

" खंजीरासंबंधें म्हणावयाचें म्हणजे " बाबुराव तो हातांत घेत म्हणाला. " ही त्या खंजीराची दुसरी प्रतिमा आहे " बाबुरावानें तो खंजीर इन्स्पेक्टराकडे करीत करीत म्हटलें. इन्स्पेक्टर तर आश्चर्यानें थक्क झालेले दिसले. बाबुराव पुढें म्हणाला " हा खंजीर अगदीं असाधारण धातूचा बनविलेला आहे. साधारण प्रतीच्या यांत्रिकानें तो केलेला नाहीं. त्याची मूठ यंत्रावर तासून अल्युमिनिअमची केलेली आहे. हें सर्व काम कोणा प्रवीण इंजिनिअरचें दिसत आहे. आतां या प्लॅनमध्यें दिलेले मेज पहा. पातींपेक्षां पुढें वाढलेले हे जे दोन भाग दिसत आहेत ते मुद्दाम ठेविलेले आहेत. त्याचा मेज घेतला असतां १०—९ मिलीमीटर भरतें. हा व्यास Chascpat नामक बंदुकीच्या व्यासाइतकाच आहे. त्या बंदूकी सर्व ठिकाणीं विकत मिळतात. ही पहा, येथें एक आहे. " असें म्हणून त्यानें ती विकत घेतलेली बंदूक पुढें केली. त्या बंदुकीच्या नळींत त्यानें त्या खंजिराची मूठ घातली. त्यानें पातीवरचा हात सोडतांच तो खंजीर नळीच्या तळाला जाऊन बसला !

" चमत्कारीक ! " वकीलबाबु ओरडले.

" खंजीर बंदुकीनें उडविला असें सिद्ध करण्याचा तर आपला विचार नाहीं?" त्यानीं विचारलें.

" मी तर तेंच सिद्ध करणार आहे ! " अल्युमीनिअमची मूठ घालण्याचें कारण काय तें तुमच्या ध्यानांत आलेंच असेल ? बाबुराव म्हणाला. " पात्या-च्या पोलादामुळें आणि या तुकड्यामुळें आधींच जड असलेला हा खंजिर जास्त जड होऊं नये म्हणून ! "

" नाहीं, मला असें वाटत नाहीं. तुम्हीं अशक्य अशा गोष्टी सिद्ध करूं पहात आहांत ! " इन्स्पेक्टर एकदम म्हणाले.

" आपण जर कबूल करीत नसाल तर मला प्रत्यक्ष सिद्ध करून दाखविलें पाहिजे. " बाबुराव आवेशानेंच म्हणाला. या पुढें वाढविलेल्या भागाचें कर्तव्य फिरण्याचें होतें व तें त्यानें केलें हें त्या कपड्याला पडलेल्या पिळावरून आपण कबूल कराल. खंजीर उडवियास त्या मुठीचा उपयोग करितां येईना, तेव्हां ही लोखंडी वर्तुळाकृति तक्ती करावी लागली. हा तुकडा त्या षट्कोणावर बसविलेला होता. या कृतीनें बंदूक उडविल्याबरोबर खंजिराला आपल्याभोंवतीं गरगर फिर-ण्याची गति मिळाली. तो तुकडा अर्थात् खंजीर उडाल्याबरोबर खालीं पडला. आमच्या राघवेन्द्रांनहो हें वर्तुळ तयार केलें आहे. " असें म्हणून त्यानें एक वर्तुळाकृति तुकडा टेबलावर ठेविला.

" हें फार चातुर्याचें द्योतक आहे " इन्स्पेक्टर म्हणाले. " पण हें सर्व अशक्य व वेडेपणाचें आहे ! "

" हें जरा अशक्यच दिसत आहे " वकीलसाहेबांनीं इन्स्पेक्टराना पाठिंबा दिला.

बाबुरावानें त्या मुठीला तें वर्तुळ बसविलें व बंदूक तयार केली. दरवाज्याच्या बाहेर एक तार्जेट ठेविलें होतें.

" त्या दोन खोल्यांमधील अंतर ३२ फूट आहे. ती खिडकी बंद कराल काय ? " बाबुराव म्हणाला.

बाबुरावानें त्या तार्जेटाकडे ( Target ) नेम धरिला व बंदूक उडविली. माझी कल्पना होती तपेक्षां फारच मंद आवाज झाला. आम्हीं त्या तार्जेटाकडे पाहिलें. खंजीर मूठीपर्यंतच आंत गेलेला दिसला !

" तुम्हीच आतां पहा " बाबुराव बंदूक खालीं ठेवीत म्हणाला. " कीं हें अगदीं शक्य आहे ! आतां प्रत्यक्ष पुराव्याकडे आपण वळूं प्रथम बंदुकीच्या नळीच्या घर्षणानें त्या खंजीरावर ओरखडे उठले आहेत. खंजीर फिरण्याची गति उजवीकडून डावीकडे आहे. आतां नुकतीच ही वस्तु कुण्यानें आणून दिली. ती

त्यानें बागेंत सांपडली असें सांगितलें; हें आपणाला ठाऊक आहेच." असें म्हणून आम्हीं ती भय्यानें दिलेली पुडी उघडली. वर्तुळाकृति एक चकती—आंत षट्कोणी भोक असलेली–त्यांत होती. राघवेन्द्रानें तयार केलेल्या तुकड्याबरहुकूम अगदीं हा तुकडा होता.

त्या तुकड्याकडे पहात इन्स्पेक्टर म्हणाले "बाबुराव निःसंशय आपण म्हणतां तेंच खरें आहे! पण या सर्व गोष्टी आपणांला कशा समजल्या याचेंच मला मोठें आश्चर्य वाटतें. प्रश्न एवढाच कीं बंदूक झाडली कोणी व आवाज कसा ऐकूं आला नाहीं?"

"आपल्या दुसऱ्या प्रश्नासंबंधीं म्हणावयाचें म्हणजे" बाबुराव म्हणाला "त्यानें हवेच्या बंदुकीचा उपयोग केला यांत शंका नाहीं. कारण नुसता आवाज झाला नाहीं इतकेंच नव्हें तर त्या खंजिराला कोणताच स्फोटक पदार्थ लागलेला नाहीं. आतां पहिल्या प्रश्नासंबंधीं सांगावयाचें म्हणजे खुनी मनुष्याचें नांव सुद्धां मी तुम्हांला सांगू शकेन. पण आपण क्रमानेंच सर्व गोष्टींचा खुलासा करीत जाऊं." बाबुराव म्हणाला.

"तुम्हीं पाहिलेंतच." तो पुढें म्हणाला "मी फोटो घेतला त्या वेळीं शारदूला घड्याळाला चावी देत उभा राहण्यास सांगितलें. त्या जागेवर मी खडूनें खूण केली. त्या खुणेवर मी उभा राहिलों त्या वेळीं मला पलीकडील घरांतील दोन खिडक्या दिसत होत्या. त्या दुसऱ्या व तिसऱ्या मजल्यावरच्या होत्या. दुसऱ्या मजल्यावरची खोली एका चित्राचे कंपनीची आहे; असें मला तपासाअंतीं कळून आलें. तिसऱ्या मजल्यावरील सदरहू खोली एका 'कमिशन एजंट' ची आहे. त्या कमिशन एजंटनां भेटण्याकरितां मी गेलों होतों. पण पुढील हकीगत सांगण्याचें आधीं आपण दुसऱ्या कांहीं गोष्टीकडे वळूं" असें म्हणून तो इन्स्पेक्टरानां म्हणाला "तीं धमकावणीचीं पत्रें तुमचे जवळ आहेत?"

"आहेत." इन्स्पेक्टरानीं त्या पत्रांचें पुडकें काढीत उत्तर दिलें.

"आपण पहिलें पत्र पाहूं." बाबुराव म्हणाला तुम्हीच पहा, कीं हा कागद व हें पाकीट हीं दोन्हीं अगदीं हलक्या प्रतीचीं आहेत. ज्या शाईनें हें पत्र लिहिलें आहे ती तांबडी आहे. या प्रकारच्या शाईचा उपयोग बहुधा नकाशा काढणारे, सरवेअर्स, इंजिनिअर्स वगैरे करितात. आणि शिवाय ही शाई 'स्टायलोग्राफिक पेन' मधून वापरलेली आहे.

"यांत अती मजेची वस्तु म्हणजे शिरोभागीचें चित्र होय. चित्रकलेच्या दृष्टीनें हें चित्र अगदीं हास्यास्पद आहे. पण तें फार सफाईदार काढलेलें आहे. तें कांणी तरी प्रवीण माणसानें काढलेलें दिसत आहे. 'मॅग्निफाईंग ग्लास' मधून पाहिलें म्हणजे प्रथम मध्य रेषा काढलेल्या असून इतर रेषा मागाहून काढलेल्या आहेत, असें दिसून येतें. शिवाय रबराचा उपयोग केलेलाही दिसून येतो. अर्थात् या चित्र काढण्याचे रीतीवरून मीं असें अनुमान केलें की, कांणी प्लॅन वगैरे काढणाऱ्या-इंजनीअरनें-हें चित्र काढिलेलें आहे.

"आतां आपण त्या अविनाशबाबु 'कमिशन एजंट' कडे वळूं. आम्हीं ज्या वेळीं त्याच्याकडे गेलों त्या वेळीं तो घरीं नव्हता. अर्थात् त्याच्या सर्व खोलीची पहाणी माझ्या मनाप्रमाणें करण्याची संधि मला मिळाली. त्या ठिकाणीं मी तर्क केल्याप्रमाणें इंजिनअर्सना लागणारें सामान माझ्या दृष्टी पडलें. अर्थात् मी पुढें जास्त चौकशी केली. त्या वेळीं मला कळून आलें कीं, 'अविनाश' हे त्या खोलींत नवीनच भाडोत्री आले होते. ते टकल्या असून 'विग्' घालण्याचा त्यांचा परिपाठ आहे. त्याचप्रमाणें ते चष्मा वापरतात व त्यांच्या डाव्या हातांत नेहमीं हातमोजा असतो. ८॥ वाजावयाचे सुमारास तो घरांतून बाहेर गेला तो परत आलाच नाहीं. जातांना त्याच्याबरोबर एक चौकोनी पेटी असून पांच फूट लांबीची दुसरी एक पेटी होती. त्यानें गाडी केली व तो स्टेशनवर गेला. ८-५१ ची गाडी त्याला मिळाली. तो येथून चालता झाला."

"अ!" इन्स्पेक्टर उद्गारले.

"आतां आपण या तीन पत्रांविषयीं पाहूं." बाबुराव पुढें म्हणाला. "त्या अविनाशबाबूच्या घरीं मी लिहिण्याचा बहाणा करून कागद व पाकीट मिळविलें आहे, तें व हीं पत्रें पहा. या सर्वांचे कागद अगदीं एकसारखे आहेत, पण यांत कांहीं महत्वाचें नाहीं. महत्वाची गोष्ट म्हणजे या कागदांचे टोंकाला अगदीं लहान भोकें आहेत. यावरून हें सर्व कागद एका ठिकाणींच 'पिन्' मध्यें दाबून ठेविले होते असें दिसतें. आपण जर हे सर्व कागद एकावर एक ठेऊन आंतून टांचणी घातली तर हीं सर्व भोकें सारखींच व बरोबर आहेत असें दिसून येईल." बाबुरावानें तसें करून दाखविलें. तो पुढें म्हणाला—

"माझ्याजवळ कागदालाही त्याच प्रकारची खूण आहे" त्यानें आपल्या

जवळचा कागद त्या कागदाशीं जमवून दाखविला. "कोण हा अविनाशबाबू?" इन्स्पेक्टर एकदम ओरडले.

" तें आतां आपण ठरवा ! " बाबुराव म्हणाला " पण प्रथम एक उपयुक्त माहिती मी तुम्हांला सांगतों. मृत सुकुमारचें मरणानंतर फायदा होणारा एकच माणूस आहे. सुकुमारचे पश्चात् त्याच्या ३,००,००० तीन लाख रुपयांच्या संपत्तीचा तो मालक होणार आहे. त्याचें नांव 'नरेंद्रनाथ !' मला या सिंहबाबूकडून कळलें. तो अति नीच मनुष्य आहे. तो जुगारी आहे. त्याचा धंदा इंजिनीअरचा असून तो त्यांत मोठा प्रवीण आहे. त्याचा बांधा सडपातळ असून तो ठेंगूच आहे. तसाच तो सुंदर आहे. त्यानें दाढी वगैरे राखलेली नाहीं. हा नरेन्द्रनाथ Wig घालतो. तसेंच त्याला चष्मा वापरावा लागतो. डाव्या हातांत सदा हातमोजा घालण्याचा त्याचा प्रघात आहे. मीं या दोन्ही व्यक्तींचीं हस्ताक्षरें पाहिलीं व माझा असा ग्रह झाला कीं एका हस्ताक्षरापासून दुसरें ओळखणें फार कठिण आहे." बाबुरावानें आपलें बोलणें येथेच थांबविलें.

" अर्थात् प्रस्तुत अविनाश म्हणजेच नरेन्द्रनाथ होय, हें अगदीं उघड आहे ! इन्स्पेक्टर म्हणाले. " मला त्याचा पत्ता द्या मी त्याला पकडतो. त्याचप्रमाणें गुप्तबाबूंच्या मुलीचीहि सुटका आपणांला आतांच केली पाहिजे." इतकें म्हणत ते निघून गेलेच.

* * * * *

त्याच रात्रीं नरेंद्रनाथाला पकडलें. त्या वेळीं एका बागेंत तो एक हवेची मोठी बंदूक पुरीत होता. त्याला इहलोकच्या न्यायासनापुढें केव्हांही यावें लागलें नाहीं. त्या बंदुकीपेक्षांहि भयंकर असें पिस्तुल त्याचे खिशांत होतें ! त्यानें लगेंच आत्महत्या केली. आपल्या नीचतम आयुष्याचा त्यानें शेवट केला ! !

# इंदुताईंचा हलवा !



( लेखक—त्रिंबक वासुदेव हर्षे. )

१



"बस्स, तें कांहीं नाहीं, काय वाटेल तें झालें तरी हरकत नाहीं; परंतु ह्या उपर म्हणून येथें रहाण्यांत मौज राहिली नाहीं. मला अजूनपर्यंत हिची थोडीशी आशा होती आणि म्हणूनच मी झालों तरी इतकें सोसून गप्प बसलों; नाहींपेक्षां ह्यांच्या घरीं पाणी प्यायला राहिलों नसतों पार्णी ! पण हिनें सुद्धां ज्याअर्थी आज आपल्या अकलेचें प्रदर्शन केलें, त्याअर्थी आतां आपलें येथें काय राहिलें आहे ? आई-बाबा, ह्यांच्या वचनांत गुंतलें म्हणून, माझी इच्छा नव्हती तरी मी मुकाट्यानें हो म्हटलें, आणि सगळें कांहीं त्यांच्या मनाप्रमाणें होऊं दिलें; परंतु अवघ्या तीनच वर्षांत तीं दोघेंहीजण मला सोडून जातील आणि माझी आज अशी दशा होईल हें कुणाला ठाऊक ?

काय बेटें ह्या वर्षीं एक पेल्युअर तें काय आलें, आणि त्याबद्दल साऱ्या घरादारानें अन्तांडतांडव करावें ! पण सगळ्यांत अत्यंत लाजिरवाणी गोष्ट म्हणजे त्या मंडळींत माझ्या इंदिरेनें सुद्धां सामील व्हावें ! ऊ:थवा ह्यांत नवल कशाचें ? ती तरी त्यांचीच मुलगी ना ? मी जर त्यांच्या दारांत असा तुकडे मोडीत बसलों नसतों, तर हा प्रसंग कशाला येता ? पण जाऊं द्या आतां त्याचें काय ? घरांत चाललेल्या ह्या कावट्ळींचा इंदिरेकडून जर मला अगोदर खासगी रीतीनें थोडासा सुगावा लागता तर-पण तें कसें होणार ? तिच्या बापाच्या जिवावरच माझी सारी चैन चालली आहे इतकें तिला प्रत्यक्ष दिसत असतां, माझे कान उपटण्याची ही अनायासें आलेली सोन्यासारखी संधि तिच्यासारख्या खऱ्या मातृपितृभक्त मुलीकडून कशी फुकट घालविली जाईल !

केव्हांना केव्हां तरी हा प्रसंग यायचाच होता-आतां तो आज आला ह्यापेक्षां जरा उशिरानें येता तर जास्त अभिनंदनीय झाला असता-परंतु एवढ्यानें म्हणजे माझें मन माघार घेईल असें मुळींच नाहीं-नो नो, आय कान्ट—आय शान्ट-फॉर गॉडस् सेक--आय मस्ट नॉट्—

सायंकाळीं सुमारें सहा साडेसहा वाजले असतील. दिवस शाळू असल्यामुळें जिकडे तिकडे दीपप्रकाश झाला होता; व मलबार हिलवर फिरावयास आलेली मंडळी, आतां थंड गार वारा सुटल्यामुळें हळुहळूं परत चालली होती. अशा शांत वेळीं हँगिंग गार्डनच्या दगडी पॅरॅपॅटवर समुद्राकडे तोंड करून एक तरुण बसला होता. त्याच्या सचिंत मुद्रेवरून तो बराच वेळपर्यंत कसला तरी विचार करीत बसला असावा असें दिसत होतें. पण त्याबद्दल संशय कशाला ? आतांच आम्हीं वर दिलेले विचार त्याच्या डोक्यांत घोळत होते, व शेवटीं शेवटीं तर त्या विचारांना वाच्यता आली होती. कोणत्या तरी गोष्टीसंबधानें त्याचा कांहीं तरी ठाम निश्चय झाला असावा व तदनुरोधानेंच त्याच्या तोंडून ते शेवटचे उद्गार निघाले होते. त्या झपाट्यांत तो आणखीही कांहीं बोलून जाता; परंतु तितक्यांत, आतांपर्यंत जवळच आड उभी राहिलेली एक व्यक्ति पुढें होऊन तिनें त्या तरुणाच्या खांद्यावर हात टाकून हटकलें, " हलो, सुंदर, काय, चाललें आहे तरी काय ? आय बिलीव्ह यू आर ऑन स्म बिग होल ! ए ? " मी केव्हांचा येथें उभा राहून पहातों आहे; पण तूं आपला आपल्याच नादांत ! एक्सक्यूज मी फॉर शॅकिंग यू ओफ युवर ब्राऊन स्टडी. "

हें ऐकतांच तो पूर्वोक्त तरुण एकदम चपापला व आपण काय बोललों व त्यापैकीं ह्या व्यक्तीनें कांहीं ऐकलें तर नसेल ना अशी शंका येऊन किंचित् कातर स्वरानें म्हणाला " माफ कर वसंत, तूं केव्हां आलास तें माझ्या लक्ष्यांत आलें नाहीं खरें ! "

" तें जाऊं दे रे, " तो दुसरा गृहस्थ—वसंतराव—विडीचा एक झुरका घेऊन म्हणाला, " पण एवढा विचार तरी कसला चालला होता ? अगदीं, " आय कान्ट, आय शान्ट-" चाललें होतें—तेव्हां म्हटलें स्वारी आज कसल्या लाटावर आहे कुणास ठाऊक ? "

" अरे कशाचा लाट आणि काय घेऊन बसलास वसंत ? " सुंदरराव जरा खिन्न स्वरानें म्हणाला, " तूंतें खरें म्हणशील तर—आय हॅव हॅड ए व्हेरी बॅड लॉट, ॲन्ड नथिंग एल्स—"

" अस्सें अस्सें—ओ आय हॅव इट नाऊ ! यू आर स्पीकिंग अबाउट दॅट ब्लडी एक्झामिनेशन—खरेंच इतका अभ्यास करून सुद्धां ऊंदरीस फेल झालास-आय ॲम रिअली सॉरी फॉर दॅट ! पण जाऊं द्या रे, नेक्स्ट इयर यू विल कम इन् ऑनर्स. "

" अरे पण एक वर्ष फुकट गेलें ना ? खर्च नाहीं कां वाटत तितका ? "

" हः डॅम दॅट " वसंत आणखी एक मोठा झुरका घेऊन म्हणाला. " तुझ्या सासऱ्याला काय भीक लागली आहे ? बेटा थोड्या करतां नाही म्हणेल कीं काय ? "

सासऱ्याचें नांव निघतांच सुंदरराव एकदम चरकले व सकाळपासूनचा एकंदर वृत्तांत ह्या वेळेस जणूं त्यांच्यापुढें मूर्तिमत उभा राहिला कीं काय असें होऊन ते कावरेबावरे झाले—परंतु त्यांच्या मनांत त्यासंबंधानें वसंतरावाजवळ कांहीं एक बोलावयाचें नव्हतें म्हणून, मनांत आलेले व तोंडांतून बाहेर पडण्यासाठीं उतावीळ झालेले विचार दाबून ते म्हणाले, " छे, छे ते कशाला नाहीं म्हणतील ? पण आपलें आपल्याला पाहिलें पाहिजे ना ? उगाच एकायावर किती बोजा घालावयाचा ! "

" समजलें रे ! बोजा बोजा तो काय ? आतां पुनः टर्म कांहीं भरायच्या नाहींतच. येऊन जाऊन राहिली पुस्तकें आणि फी ! तिला कां म्हातारा नाहीं म्हणतो ? "

" नाहीं नाहीं—त्यांच्याकडून मुळींच हरकत नाहीं—"

" मग एवढ्या पेंचांत कां पडलास बुवा ? आणि मग " आय कान्ट, आय मस्ट नॉट " तें कशाकरतां बाबा ! "

वसंतराव पिच्छा सोडीत नाहीं हें पाहून व सहज चुकून आपल्या तोंडून कांहीं भलतेच शब्द निघून जातात कीं काय या भीतीनें सुंदररावांनीं फार सावधगिरीनें तो विषय आजबात उडवून देण्याच्या उद्देशानें म्हटलें " छे, छे, बुवा ! मला वाटलें होतें कीं तूं तें विसरशील—पण नाहीं ! तूं ऐकायचा नाहींस. ऐक तर, हे फेब्रुअर आले, तुला माहीत आहेच. फर्स्टक्लासमध्यें येण्याकरतां थोडा तरी स्पेशल स्टडी हा केलाच पाहिजे ना ? इथें राहिलों तर बाकी सगळ्या सोई आहेत पण अभ्यास होणें शक्य नाहीं—"

" कां कां बुवा ? " वसंतरावांनीं मध्येंच अडवून विचारलें. " यू हॅव गॉट ए नाइस स्पेशल रूम—"

" होय, पण मी सासऱ्याच्या घरीं—म्हणजे बायकोच्या घरीं—आहें हें विसरतोस तूं -"" सुंदरराव हंसून म्हणाले.

" ओ, आय सी " वसंतरावही जरा मोठ्यानें हंसून म्हणाले, " पण निदान आपल्या क्वार्टर्स तरी आहेतच ना ? " " आहेत, पण माझें सारेंच कसें अवघड

आणि अशुद्ध. रात्रीं घरांत राहिलों तर अभ्यास होणार नाहीं, बोर्डिंगांत राहिलों तर विनाकारण टीका होणार—त्यापेक्षां पुण्यास जाऊन रहावें तें बरें नाहीं कां ? "

" हो, तेंही कांहीं वाईट नाहीं—पण इन दॅट केस यू विल हॅवटु संक्रिफिस—"

" समजलों मी तूं काय म्हणणार तें—पण परीक्षेकरतां म्हणून सर्व कांहीं केलें पाहिजे बाबा " सुंदरराव पॅरॅपेटवरून उतरून म्हणाले, " चला, आतां सात वाजलें असतील नाहीं ? "

" हो-सेव्हन टेन " " वसंतराव रिस्ट पाहून म्हणाले. " " चला बुवा—त्यांतून आज संक्रांत ! तुम्हांला लवकरच घरीं गेलें पाहिजे—राणीसरकारचा तिळगूळ वाट पहात असेल—"

" कांहींहि म्हण—तुला आपली सगळीच थट्टा वाटते-वसंत—"

यानंतर ते उभयतांही तरुण मित्र तेथून निघाले व गवालिया तलावावरून खालीं आल्यावर वसंतरावांना दादरवर जावयाचें होतें म्हणून लोकल गांठण्याकरतां ते ग्रँटरोड स्टेशनकडे वळले. व सुंदरराव घरीं जाण्याकरतां म्हणून पुलावरून गिरगांवच्या रस्त्याला गेले.

× × × ×

आमच्या ह्या कथानकाचे नायक सुंदरराव हे मूळचे कोंकणांत महाड तालुक्यांत राहणारे; पण त्यांच्या पूर्वींच्या दोन पिढ्या मुंबईसच झाल्यानें ते पक्के मुंबईकर बनले होते. यांचे वडील जी. आय. पी. रेल्वेवर नोकर होते. त्यांना पगारही बेताचाच होता; तरी पण घरांत माणसांचा बोजवारा फारसा नसल्यानें त्यांना खर्चाची विशेषशी ओढाताण झाली नाहीं. सुंदरराव लहानपणापासूनच ऐषआरामांत व आईबापांना ते एकुलते एक असल्यानें विशेष लाडांत वाढलेले असल्यानें शिक्षणाकडे प्रथम त्यांचें असावें तितकें लक्ष्य नव्हतें. वडील कांहीं दिवस जगते तर त्यांनीं सुंदररावांची कांहीं तरी सोय करून ठेवली असती; परंतु मुंबईस त्या वेळीं हाहाःकार करून सोडणाऱ्या दुसऱ्या प्लेगाला ते बळी पडल्यानें बिचाऱ्या सुंदररावाच्या मातुःश्रीवर वैधव्याच्या प्रखर कुठाराबरोबरच उदरभरणाचा व मुलाच्या शिक्षणाचा असे दोन बोजे लादले गेले !

सुंदरराव त्या वेळीं अगदीं लहान म्हणजे सुमारें दहा वर्षांचे होते. अशा वयांत, घरांतील कर्त्यासवरत्या पुरुषाच्या अचानक मृत्यूनें केवढी हानि झाली हें त्यांना काय समजणार होते ? वडिलांचा त्यांना फार लळा होता व त्यामुळें

ते मेल्यानंतर त्यांना बरेंच दुःख झालें ही गोष्ट खरी, परंतु कसें झालें तरी तें बालवयांतलें दुःख ! खाण्यापिण्याची चंगळ असली म्हणजे तें पार निघून जावयाचें. त्यांच्या मातुःश्रीवर मात्र मोठाच डोंगर कोसळला खरा ! नवऱ्याला पगार बेताचाच व मुंबईची राहणी, यामुळें जरी थोडीबहुत खेंचाखेंची होत असे, तरी त्या जात्या फार धोरणी असल्यानें मोठ्या बेतानें व काटकसरीनें प्रपंचाचा गाडा हांकून व मुख्यतः पतींची मर्जी सुप्रसन्न राखून त्यांतल्याल्यांत त्यांनीं एक हजार रुपये मागें टाकले होते. आणि तीच कायतीं त्यांच्या पतींची इस्टेट. त्या तुटपुंज्या रकमेवर, मुलाचा शिक्षणाचा खर्च व प्रपंच्याचा खर्च कसा भागवावा ह्याची त्यांना मोठी पंचाईत पडली. त्यांच्या अंगावर म्हणण्यासारखा एखादा दागिना सुद्धां नव्हता, किंवा त्यांच्या पतीनें अलीकडच्या पद्धतीप्रमाणें आपला विमाही उतरविला नव्हता. यामुळें आतां पुढें कसें करावें अशा फिकिरींत त्या होत्या !

परंतु जन्म दिलेल्या मानवी प्राण्याची उपेक्षा निदान ईश्वर तरी करीत नाहीं ! त्यांचे बंधु मोटाभाई हे मुंबईसच वकिली करून असत. वकिलीच्या धंद्यांत त्यांनीं चांगला पैसा मिळविला होता व ते मोठे सुखी होते. बहिणीवर अशा तऱ्हेचा दुःखाचा डोंगर कोसळलेला समजतांच ते त्यांच्या घरीं गेले, व मेहुण्याचा पुढील संस्कार आटपतांच त्यांना भाच्यासह बहिणीला आपल्या घरीं आणलें.

दुखवट्याचे दिवस संपल्यावर आणखीही कांहीं महिने लोटले तरी नवीन बिऱ्हाडाची सोय पहाण्याचें कोणीच बोलेना, असें पाहून त्यासंबंधानें सुंदररावांच्या आईनें आपल्या भावाजवळ सहज गोष्ट काढली. त्यांनींही ही गोष्ट प्रथम चालढकलीवर नेली; परंतु बहिणीचा जास्तच आग्रह पडल्यामुळें त्यांनीं एकवार आपला पुढचा बेत त्यांना साफ सांगून टाकला. ह्या बेतांत म्हणजे कांहीं विशेष होतें असें नाहीं. उलट त्या योगानें सुंदररावांचें सर्वस्वी कल्याणच होतें; कारण मोटाभाईनीं त्या उभयतां मायलेकरांना जन्मभर संभाळावयाचें कबूल करून सुंदररावांचा शिक्षणाचा खर्चही चालवीन म्हणून सांगितलें होतें; परंतु ही गोष्ट सुंदररावांच्या मातुःश्रीला पसंत पडली नाहीं; कारण भाऊ एक कदाचित् आपलें ऐकेल, पण त्याची बायको आपल्याला सदोदित बरी कशी पाहील ? आपल्या दोघांमुळें त्यांना बराच खर्च येणार होता, व तो प्रत्यक्ष दिसत असतां ती नेहमींच गप्प बसेल किंवा नाहीं याची तिला शंका होती; म्हणून अशा रीतीच्या मदतीची तिला अत्यंत जरूर होती तरी तिनें भावापासून वेगळें बिऱ्हाड केलें.

तथापि मोटाभाईनीं त्यांची उपेक्षा केली नाहीं. ते दिवसांतून नेमानें दोन वेळां जाऊन काय हवें नको त्याची विचारपूस करीत असत, व महिना भरतांच पुढील महिन्याची सोय करून ठेवीत असत. ती माउलीसुद्धा अगदींच गप्प न बसतां फावल्या वेळांत कोणाचें कांहीं शिवणकाम, चोळ्या, परकर वगैरे करून दोन पैसे मागें टाकीत असे. अशा तऱ्हेनें दिवस जात जातां सुंदरराव मॅट्रिकच्या परीक्षेला बसून तींत ते पसार झाले व त्यांना जगन्नाथ शंकरशेटची स्कॉलरशिप मिळाली—व यामुळे दोन वर्षपर्यंत त्यांच्या शिक्षणाची अनायासें सोय झाली.

याच सुमारास मोटाभाईंची एकुलती एक मुलगी इंदिरा हिच्या विवाहाचा लकडा त्यांच्या कुटुंबाकडून सुरू झाला व स्थळें पाहण्याची गर्दी सुरू झाली. त्यांचे कुटुंब रोज एक नवें स्थळ शोधून काढी व मोटाभाई कोणत्याना कोणत्या तरी सबबीवर तें मोडून काढीत याप्रमाणें कमीत कमी पंचवीस वरांची पीछेहाट झाल्यावर मोटाभाईंना एके दिवशीं आपल्या कुटुंबाजवळ हलकेच सुंदररावांचें नांव सुचविलें तें ऐकतांच मैनाबाईच्या [ मोटाभाईच्या कुटुंबाच्या ] अंगाचा भडका उडाला. व " अहाहा, काय पण माझ्या इंदूला नवरा शोधून काढला ? मेलें जसें कांहीं मला समजतच नाहीं ? आजपर्यंत त्यांच्याकडून घर धुवावलें तें वाटतें पुरें नाहीं झालें—म्हणून आतां हे दिवटे घरांत जांवई म्हणून आणायचा विचार दिसतोय ! काय कुठें एक परीक्षा पास झाली न स्कालरशिप कीं फालरशिप काय ती मिळाली म्हणजे तेवढ्यानें ते आपल्या बरोबरीचे का झाले ? घरांत एक फुटकें भांडें तरी आहे का ? आणि अशा भिकाऱ्याच्या गळ्यांत माझ्या इंदूला बांधायची त्यापेक्षां आपली कुंवारच का राहीना. " ह्या व अशाच तऱ्हेनें आणखी जळफळाट करून त्यांनी मोटाभाईंची चांगली पूजा बांधली.

मोटाभाई एवढे बाण्याचे होते. तरी पण ते बरेचसे कुटुंबाच्या मुठींत असल्या-कारणानें बहिणीची ही नालस्ती ऐकून त्यांचा जरी संताप झाला, तरी कुटुंबाच्या समोर ह्या वेळीं त्यांना एक शब्दसुद्धां काढण्याचें धैर्य होईना. त्यांनीं ती वेळ तशीच हंसण्यावारी नेऊन तें प्रकरण तेवढ्यावरच थांबविलें. ह्यानंतर दोन चार वेळ तोच विषय निघून मैनाबाईचा व त्यांचा बराच कडाक्याचा वादही झाला व अशा कामीं सुंदररावांना उघड बोलतां येत नव्हतें, तरी त्यांनीं प्रथम मातुःश्री-कडून व नंतर निर्भीडपणें स्वतःही एकदोन वेळ मामांना सांगून पाहिलें; परंतु मोटाभाई जात्या निग्रही असल्यानें अखेर " कांहींही असलें तरी मी माझी

मुलगी सुंदररावालाच देणार " हें त्यांचें वाक्य खरें ठरलें व वैशाख महिन्यांत इंदिरेचा सुंदररावांशीं मोठ्या थाटाचा विवाह झाला !

सुंदरराव ह्या वेळीं प्रीव्हियसची टर्म भरीत होते व एकव्याशा वयांत, आणि त्यांतूनही आपल्या अत्यंत परावलंबी स्थितींत, विवाहशृंखला अडकवून घेणें त्यांना मनापासून पसंत नव्हतें; परंतु सांप्रत पितृस्थानीं असलेल्या मामांच्या आग्रहास्तव त्यांना हो म्हणावें लागलें, व इंदिरेच्या रूपाकडे पाहून झालें हें एक-परी ठीकच झालें असें त्यांनीं समाधान करून घेतलें. तथापि लग्नाच्या आनंदाच्या भरांत अभ्यासाकडे त्यांचें थोडें तरी दुर्लक्ष झालें असें मुळींच नाहीं; उलट त्यांचा अभ्यास जास्तच नेटानें होऊं लागला. परंतु ह्यापुढें ईश्वर त्यांची कसोटीच पाहणार होता की काय कोणास ठाऊक ! ह्या वर्षी सुंदरराव पास झाले खरे, परंतु स्कॉलरशिप वगैरे कांहींच न मिळतां ते नुसतेच पास झाले व तेही निमच्या क्लासांत. ह्यामुळें त्यांचा विरस झाला तरी ते डगमगले नाहींत. मॅट्रि-कच्या वेळीं मिळालेली शिष्यवृत्ति आणखी एक वर्षपर्यंत चालणारी असल्यानें त्यांनीं लागलीच इंटरच्या टर्मस भरावयास सुरुवात केली व तोही अभ्यास ते मोठ्या नेटानें करूं लागले.

परंतु हा वेळ त्यांच्यावर येणाऱ्या संकटपरंपरेच्या सुरुवातीचाच असल्यानें इकडे पुन्हा प्लेगचा सपाटा सुरू झाला व त्यांत त्यांच्या मातुःश्री बळी पडून ते निरा-धार बनले. पण ह्या वेळीं त्यांना त्यांच्या मामाचा म्हणजे सांप्रत श्वशुरांचाच आधार असल्यानें—मोठाभाई ह्याही खेपेस धांवून आले व त्यांनीं सुंदररावांना सर्व सामानासह आपल्या घरीं कायमचें आणून ठेवलें. आतां तर मैनाबाईच्या चरफडण्याला पारावर नाहींसा झाला. जांवई कायमचा घरीं येऊन बसल्यानें तर त्यांची आग झालीच परंतु बिचारी इंदिरा सुद्धां त्यांना डोईजड वाटूं लागली.

सुंदररावांची स्कॉलरशिप ह्या वर्षापुरतीच होती, सबब मातुःश्रींचें दुःख गिळून त्यांना पुढील अभ्यासाच्या सोईकरतां ह्या वर्षी जिवापाड मेहनत करावी लागली. जेवणाच्या दोन वेळा खेरीज करून ते बाकीचा वेळ कॉलेजांत व कार्टर्स-कडे काढीत. निदान रात्रीं तरी कार्टर्समध्यें जाऊं नये म्हणून मोटाभाईनीं त्यांना बरेच वेळां सांगितलें; परंतु अभ्यासाची सबब दाखवून त्यांना त्यांना प्रत्येक खेपेला माघारें घ्यावयास लाविलें, परंतु पुढें जगाच्या रहाटीप्रमाणें सुंदरराव लोकलज्जेस्तव तरी घरींच राहतील असाच योग आल्यामुळें त्यांचा नाइलाज झाला. पण इतकें करून ही परीक्षेत त्यांच्या वाट्याला "पास इन धि थर्ड क्लास"

हेंच ठेवलें होतें हें पाहून ते अगदींच हताश बनले; व आतां कॉलिजच्या संबंद खर्चाचा बोजा मामांवर कसा घालावा ह्याचा त्यांच्यापुढें एक मोठा प्रश्न येऊन पडला.

मैनाबाईंनीं पुन्हा एकवार उमळी मारली व त्या रागांत पुढील अभ्यासाचा नाद सोडून देऊन सुंदरराव कोठें तरी नोकरी पाहण्याच्या उद्योगास लागले. परंतु मोटाभाईनीं ह्याही खेपेस आपलें सत्त्व ढळूं दिलें नाहीं. बायकोचा तामसी स्वभाव त्यांना माहीत होता, तरी ते त्याची इतकीशी फिकीर करणारे नव्हते. त्यांनीं सुंदररावांची नीट समजूत घातली व नोकरीच्या खटपटीपासून परावृत्त करून त्यांना त्यांना बी. ए. च्या टर्म भरावयास सांगितले. सासऱ्याचा हा आग्रह पाहून सुंदररावांनींही विशेष आढेवेढे घेतले नाहींत व ते कॉलिजमध्यें जाऊन पुनः पूर्ववत् विद्यार्थी बनले.

हां हां म्हणतां दोन वर्षें निघून गेलीं व सुंदररावांच्या फायनल बी. ए. च्या परीक्षेचे दिवसही जवळ येत चालले. ह्याच सुमारास इंदिराबाईनाही काहीं दिवस गेलेले असल्यानें त्यांच्या अभ्यासांत त्या बाजूने मुळींच व्यत्यय येण्यासारखा नव्हता. अखेर एकदाची परीक्षा झाली. ही एवढी परीक्षा झाली म्हणजे मात्र कोठें तरी जरूर नोकरी पहावयाची असा सुंदररावांचा निर्धार झाला होता; कारण मैनाबाईपासून अलीकडे त्यांना बराच त्रास होऊं लागला होता; व त्यांचें कुटुंब सुद्धा म्हणावें तसें संतुष्ट नसे. यामुळें जसजसे परीक्षेच्या निकालाचे दिवस जवळ जवळ येत चालले तसतशी त्यांची आतुरता जास्त वाढत चालली.

परंतु हीच वेळ सुंदररावांच्या दुर्दैवाच्या पूर्ण कमालीची असल्यानें त्यांच्या सर्व आशांचा भंग व्हावयाचा होता. परीक्षेचा निकाल लागला व सुंदररावांना युनिव्हर्सिटीनें पुन्हा एकवार त्याच परीक्षेकरतां पाचारण केलें व ह्याप्रमाणें त्यांचें सर्व मनोराज्य जेथल्या तेथेंच राहिलें. आतां मात्र मैनाबाईचा तडफडाट जाहीर होऊं लागला. त्या सपाट्यांत सुंदररावांचे वडील, त्यांच्या मातुःश्री, त्यांच्या घरची गरीबी, वगैरे सर्व बारिकसारिक छिद्रांवर यथेच्छ तोंडसुख घेऊन खुद्द मोटाभाईना सुद्धां त्यांनीं बरीच पुष्पांजली वाहिली.

सुंदरराव नापास झाले हें पाहून मोटाभाईचा सुद्धां दिल बराच खचला. परंतु आपली ही स्थिति उघड दिसूं दिल्यानें जावयाच्या मनावर कदाचित् त्याचा परिणाम भलताच होईल ह्या भीतीनें त्यावर ते मुळींच बोलले नाहींत, इतकेंच नव्हे तर " ह्या गडगडाटाकडे तुम्ही मुळीं सुद्धां लक्ष्य देऊं नका; व पुढील

वर्षासाठीं अभ्यास जारीनें सुरू ठेवा, उद्योगी मनुष्याला धंद्यांत थोडीबहुत बूड लागायचीच; त्यांतून ही पडली परीक्षा; नापास झालों म्हणून तेवढ्यानें उदास होऊन बसूं नका" असें त्यांनीं सुंदररावाचें उलट समाधान केलें.

सासऱ्याच्या ह्या आश्वासनानें सुंदररावांना बरीच हुषारी आली; व खरें पाहिलें तर त्यांच्या मनाला जिच्या योगानें थोडें तरी समाधान होईल अशी तेवढीच कायती गोष्ट होती; कारण अलीकडे त्यांच्या पत्नीकडून सुद्धां त्यांना थोडा थोडा त्रास पोंचावयास सुरवात झाली होती. पत्नी ह्या नात्यानें इंदिराबाईचें आपल्या पतीवर प्रेम होतें; परंतु कसें झालें तरी त्या श्रीमंतांत वाढलेल्या असल्यामुळें पतीच्या गरीब स्थितीसंबंधानें त्या बहुतेक नाखूषच असत. ही त्यांची मानसिक स्थिति प्रथम प्रथम सुंदररावांच्या मुळींच लक्षांत आली नाहीं; परंतु अलीकडे आणि त्यांतूनही विशेषतः त्यांच्या बी. ए. च्या परीक्षेचा विपरीत निकाल लागल्यापासून ती त्यांना चांगलीच भासूं लागली होती.

सुंदररावांनीं, अशा तऱ्हेनें होणाऱ्या कोंडमाऱ्यापासून प्राप्त झालेली उद्विग्नता आपल्या पत्नीच्या नजरेस यत्किंचितही येऊं दिली नाहीं; परंतु पुन्हा परीक्षेला बसायचें म्हटलें तरी कॉलेजाच्या टर्मची अडचण नव्हती, म्हणून निवळ गप्प बसण्यापेक्षा कोठें तरी तात्पुरती नोकरी पहावयाची खटपट मात्र जारीनें सुरू केली.

पांचसात ठिकाणीं त्यांनीं अर्ज केले होते; व त्यांपैकीं एक दोघांकडून त्यांना बोलावणें येऊन तेथें ते जाऊनही आले होते; आणि एवढ्या थोरल्या मुंबईत आणि थोड्या वेळांत त्यांची कुठें तरी सोयही झाली असती; परंतु "आपण चिंतात असतों एक आणि ईश्वराची योजना असते निराळीच !"

संक्रांतीच्या दिवशीं मोटाभाईच्या शेजारीं असलेल्या एका गृहस्थाच्या नुकत्याच लग्न झालेल्या मुलीला तिच्या सासरहून एक जरीचें पातळ आलें व तें नेसून ती मुलगी मैनाबाईंना नमस्कार करावयास—पण खरें म्हटलें तर तें दाखवावयास—आली, आणि झालें ! तेवढ्यावरून मैनाबाईच्या तडफडाटानें पुन्हा उचल खाल्ली. "हे मेले असे जन्मदरिद्री ! सोन्यासारखी पोर, डागदागिने अंगावर घालून ह्याच्या घरांत घातली, पण आमचें जळ्ळें, राहूंद्या—पोरीला तरी लग्न झाल्यापासून एक वीतभर चिंधी आली आहे का ? आणि आमचे हे पुरुष अजूनही त्यांचें कौतुकच करतात ! काय त्या स्कॉलरशिपला एवढे भुलून गेले होते कुणास ठाऊक ! त्यांतला एक तांब्याचा पैसा तरी आमच्या संसाराला

लागायचा होता का ? पण ती तरी कुठे टिकली ? आतां तर मुळी नापासच होऊन घरीं बसले. ह्यांच्या परीक्षा होणार—हे नोकऱ्या शोधणार—आणि मग म्हणे बायकांना सुख लागणार ! कुणीं बघितलें आहे हें ? काय म्हणे " रामाला राज्य आणि हणमंताला बाचा ! " त्यांतलेंच कीं नाहीं ? माझा जीव कसा तिळतीळ तुटतो. पण आमच्या घरच्यांना आहे का कांहीं त्याचें ? "–याप्रमाणें पहिलें नमन झालें. नंतर इंदिराबाई वेणीफणीला आल्या, तेव्हां त्यांच्या भावी बाळंतपणाला पुढें करून पुन्हा एक फैर झडलीच—आणि जें कांहीं उरलें सुरलें होतें त्याची हजेरी दोन प्रहरीं जेवणाचे वेळीं झाली. सारांश त्या दिवशीं सकाळपासून सुंदरराव व त्यांची गरिबी ह्याशिवाय मैनाबाईंना दुसरा विषय नव्हता.

सकाळचा प्रकार सुंदररावांना परभारें कळला आणि दोन प्रहरचा गोंधळ तर ऐन पंक्तीवरच झाला होता. सणाचा दिवस आणि त्यांतून जेवणाच्या वेळीं झालेली ही पूजा सुंदररावांच्या वर्मी लागली; त्यांना बरोबर जेवणसुद्धां गेलें नाहीं. अगोदर उठल्यास शिष्टाचाराचा भंग होईल आणि तेवढ्यावरूनही एखादे वेळीं ताशेरा झडायचा. ह्या भीतीनें ते सर्वांच्या बरोबर उठले व झालेल्या तळमळीचा कांहीं तरी उपशम होईल, निदान आजच्या ह्या एकंदर प्रसंगाचें मूळ काय आहे तें तरी समजेल ह्या अंदाजावर ते आपल्या खोलीकडे वळले तों तेथें इंदिराबाई तयार होत्याच. त्यांना अलीकडे नवऱ्याला थोडें थोडें वर्मी बोलावयाची संवय झालीच होती–आणि त्या जोरावर त्यांनी हंसत हसतच पण सुंदररावांच्या हृदयाला झालेल्या जखमेवर उलट मीठ टाकलें !

इंदिराबाई कदाचित् थट्टेनें बोलल्या असतील पण आधींच संतप्त झालेल्या सुंदररावांना तें सारें विपरीत भासलें व " आज कळस झाला ! सारें घरच आपणावर उलटलें—व थोडीबहुत आशा होती तीही नष्ट झाली " असें त्यांना वाटून संतापातिरेकांत ते तसेच बाहेर पडले. दोन प्रहरची वेळ बोरीबंदरवरच्या बागेंत व फ्री लायब्ररींत त्यांनीं बसून काढली, व सायंकाळीं पांच वाजले तरीही मनाला शांतता येत नाहीं असें पाहून ते तसेच मलबारहिलकडे वळले. वाचकहो, मलबार हिलवर त्यांचे काय विचार चालत होते व त्या भरांत त्यांचे स्नेही वसंतराव भेटल्यानंतर ते पुढें कुठे गेले किंवा जाण्याकरतां म्हणून निघाले [illegible]रे मजकूर सुरवातीला आलाच आहे. ते त्यानंतर सरळ घरींच आले किंवा [illegible]न्य ठिकाणीं निघून गेले ती सर्व हकीकत क्रमानें पुढें येणार आहे—पण तूर्त अ[illegible]णास त्यांना

तसेंच सांङ्गन देऊन मोटाभाईंच्या घरीं संक्रांतिचा तिळगूळ यावयास अगोदर गेलें पाहिजे.

---

२

इंदिराबाईंच्या खोलींतून सुंदरराव बाहेर पडल्यानंतर त्याही जेवावयास निघून गल्या. थोरामोठ्याची एकुलती एक मुलगी त्यांतून पहिल्याच खेपेला गर्भार—आणि त्यांतही आज संक्रांतीसारखा सणाचा दिवस ! मग काय विचारता ? मैनाबाईंनी हिकडे सुंदररावांच्या दारिद्र्यावर ताशेरा झाडला होता खरा, पण त्याच वेळीं जेवण आटपतांच मोटाभाईंना तशा उन्हांतून बाहेर काढून व त्यांच्या दिवशाला चांगला तीस रुपयांचा खार बसवून इंदिरेकरतां मुद्दाम सुंदररावांना लाजविण्याकरतां एक सुंदर कोइमतुरी जरीचें पातळ आणवून ठेवलें होतें ! त्या भरांत व हळदीकुंकवाच्या गर्दीत सायंकाळची वेळ केव्हांच निघून गेली. आंत बायकांची गर्दी जमली होतीच व आतां बाहेरही मोटाभाईंना तिळगूळ देण्याकरितां लोकांची ये जा चालू होती. अर्थात् ह्या धांदलींत बिचाऱ्या जांवईबुवांची कोण आठवण करतो ?

पण अखेर रात्रीं दहा वाजले व मंडळी यावयाची बंद होऊन रात्रींच्या फराळाची वेळ झाली तेव्हां सुंदररावांचा शोध सुरू झाला. मोटाभाईंनीं कुटुंबाला विचारलें पण त्या काय सरळ उत्तर देणार होत्या ? " झालें आहे दुपारीं यथेच्छ, तेव्हां नसेल संध्याकाळीं कांहीं खायचें ? " असें तात्पुरतें ठोकून देऊन त्या मोकळ्या झाल्या. पण कसें झालें तरी ते पडले मामा आणि त्यांतूनही सासरे, तेव्हां मोटाभाईंच्यानें कसें गप्प बसवेल ? त्यांनीं इंदिरेजवळ शोध केला पण ती काय सांगणार. " जातांना मला सांगून जाणें झालें नाहीं. " एवढें लाजत लाजत सांगून तीही नामानिराळी झाली.

आतां येतील, मग येतील—म्हणून वाट पहातां पहातां बारा वाजले, तरी जांवयाचा पत्ता नाहीं हें पाहून मोटाभाईंनीं लागलीच एक व्हिक्टोरिया केली, व एलफिन्स्टन् कॉलेजच्या क्वार्टर्समध्यें जाऊन तपास केला, पण तेथेंही जेव्हां पत्ता लागला नाहीं तेव्हां ते घाबरले व आतां आणखी अपरात्रीं कुठें शोध करावा म्हणून विन्मुख होऊन घरीं परत आले. मैनाबाई व इंदिरा ह्यांना जणू कांहीं त्याचें कांहींच वाटलें नाहीं असें होऊन त्या उभयतांही केव्हांच झोंपी गेल्या होत्या—पण मोटाभाईंनीं मात्र ती सारी रात्र काळजींत काढली.

उजाडलें, चहाची वेळ झाली, व होतां होतां दोन प्रहरच्या जेवणाचीही वेळ झाली; परंतु सुंदररावांचा पत्ता नाहीं–तेव्हां मात्र सर्वांचे धाबें दणाणलें व आदल्या दिवशीं यःकश्चित् शेजारच्या मुलीच्या पातळावरून एवढें रण माजविल्याबद्दल मोटाभाई मैनाबाईवर पुष्कळ संतापले. त्या मोठ्या अभिमानी होत्या; त्यांनीं त्या वेळीं या संतापाकडे फारसें लक्ष्य घातलें नाहीं; परंतु संध्याकाळीं जेव्हां वसंतराव [ पहिल्या प्रकरणांतले सुंदररावांचे स्नेही ] सहज सुंदररावांना भेटावयास म्हणून आले, व त्यांनीं मलबार हिल्वरील एकंदर वृत्तांत सांगितला तेव्हां–सासुच्या व विशेषतः इंदिराबाईंच्या बोलण्यानें चिडून जाऊन दुःखावेगांत जांवई निघून गेले खास अशी सर्वांची खात्री झाली. आपण कुठून बोललों असें मैनाबाईंना होऊन गेलें; व केवळ आपल्याच बोलण्याला त्रासून हा परिणाम झाला हें पाहून त्यांना अत्यंत वाईट वाटलें ! इंदिरेच्या दुःखाला तर पारावार नव्हता, सहज थट्टेच्या भाषणाला हें स्वरूप येईल, याची त्या बिचारीला काय कल्पना ? अशा चकमकी अलीकडे वरचेवर उडत असत, पण फार झालें तर दोन तासांनीं त्यानंतर पतिपत्नीचा लागलीच समेट होत असे; परंतु आजचा हा प्रकार फारच भयंकर ! भर पंक्तींत आईनें तोंडसुख घेतलें व त्यांतच आपणही भर घातली, आणि त्यामुळें पतीनें घर सोडलें हें अत्यंत दुःखावह ! आपल्याला तर सुंदरराव अंतरलेच पण वरती शेजारीपाजारी आतां घालून पाडून बोलतील व तें दुःख असह्य होईल हें पाहून त्यांना 'दे माय धरणी ठाय' होऊन गेलें. मोटाभाई तर वेडपिसे होऊन गेले, त्यांचें कचेरींतल्या कामावर लक्ष्य लागेना व घरांत ते ज्याच्या त्याच्यावर तोंड टाकूं लागले–तात्पर्य सुंदररावांच्या नाहींसें होण्यानें–आणि तेंही संक्रांती सारख्या भर सणाच्या दिवशीं—त्या घरांत सर्वत्र उदासीनता पसरली ! ! !

मोटाभाईंनीं आपल्या व सुंदररावांच्या स्नेही मंडळींना तारा केल्या, पत्रें पाठविलीं, जांवयांच्या चेहरेपट्टीचें वर्णन देऊन वर्तमानपत्रांत जाहिराती दिल्या. याप्रमाणें त्यांनीं शोध करण्याची शिकस्त केली. परंतु त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. आपल्या बायकोच्या त्रासाला वैतागून जांवई निघून गेला हें दुःख त्यांना शल्यासारखें टोंचूं लागलें. त्यांच्या अंतःकरणाला कोणत्याहि गोष्टीनें समाधान होईना व घरीं येणें त्यांना विषवत् वाटूं लागलें.

मैनाबाईंना बराच पश्चात्ताप झाला, पण कसा झाला तरी तो "पश्चात् ताप.', ' आधीं जाते बुद्धि आणि मग जातें भांडवल " त्यांपैकींच त्यांची गती झाली !

नवरा आपल्या कह्यांत आहे असे पाहून केलेल्या स्वैरवर्तनाचा हा परिणाम होईल, याची त्यांना कल्पनासुद्धां नव्हती. आपल्याच अन्नावर वाढलेला व सर्वस्वी आपला गुलाम बनलेला जांवई रुसला म्हणून जातो कुठे? आज नाहीं उद्यां चुंबित येईल; इतर कोणाकरतां नाही तरी बायकोकरतां तरी गोंडा घोळीत येईलच, अशी त्यांना मोठी घमेंड होती, व त्या जोरावर, कोणीही त्यांना जांवयाबद्दल विचारलें, तर "सोडाहो, कोण घालतो आहे खायला. सगळी सोंगे करतां येतील, पण पोट भरल्याचें सोंग मोठें कठीण आहे? गेले आहेत मोठे रुसून! जातात कुठे, आज नाही उद्यां झक्कत येतील!" असें मोठ्या दिमाखानें सांगत असत; परंतु आतां तो तोरा, तो दिमाख पार निघून जाऊन आतां त्यांना शेजाऱ्यापाजाऱ्यांचे टोमणे खावे लागत होते.

पण मैनाबाईंचे हाल एवढ्यावरच संपले नव्हते! आतांपर्यंत त्यांच्या अगदीं मुठींत असलेले मोटाभाई आतां त्यांना हरघडीस टाकून बोलत. "तूंच जांवई घालविलास, उनके तुझे तोंड खराव! आतां एकदां मला कुठे तरी घालीव म्हणजे मोकळी झालीस" वगैरे कुशब्दांनी ताडण करीत; ते सारे त्यांना मुकाट्याने ऐकून घ्यावे लागे!

तिकडून इंदिरा कांहीं कमी बोलत होती असें नाहीं. सुंदररावच घरांत व्यवस्थित होते, तेव्हां कांहीं आईच्या मतानें तर कांहीं स्वतःच्या थिल्लरपणानें केव्हां केव्हां ती त्यांना टाकून बोलत असे व ते गेल्यावर सुद्धां–बसले रुसून तर बसले–फार फार तर दोन दिवस–पण मग तरी येतीलचना–असे म्हणून एक दोन दिवस फुरंगटूनच होती; परंतु आतां तिचा तो भ्रम दूर झाला व नवरा निघून जावयास आईचा तोंडाळपणा व आपला मूर्खपणाच कारणीभूत झाला हें पाहून तिचे डोळे उघडले व ती जेव्हां तेव्हां आईला टोचून बोलूं लागली. तात्पर्य, बिचाऱ्या मैनाबाईंचे आतां न्हंकडून हाल आले! त्या आतां पूर्वीसारख्या इतर बायकांना आपले श्रीमंतीचें वैभव दाखवावयास बाहेर जाइनात; व घरांत सुद्धां इकडून नवरा व तिकडून मुलगी–दोघे दोहोकडून त्यांना हरवाबतींत पेंचांत धरूं लागल्यामुळे त्या अगदीं दीन झाल्या व त्यांतच त्यांनीं अंथरूण धरलें.

× × × × ×

सुंदररावांना जाऊन आठ दिवस झाले, आठांचे पंधरा व पंधरवड्याचा महिना होऊन हां हां म्हणतां पांच वर्षें केव्हांच निघून गेलीं. काल कोणाचीच वाट पहात

नसतो; व व्हायच्या त्या गोष्टी त्या त्या वेळीं नियमित होत जातात, त्याप्रमाणें दिवसाची रात्र व रात्रीचा दिवस होऊन हीं वर्षें केव्हांच लोटून गेलीं! पण ह्या चार वर्षांत केवढी घडामोड झाली होती! इंदिराबाई योग्य कालीं प्रसूत होऊन त्यांना सुंदर पुत्ररत्न झालें होतें, व धाकटा मधुकर आपल्या बोबड्या व मधुर मधुर बोलांनीं आईला व आजीला भंडावून सोडीत होता. आज सुंदरराव घरीं असते व सर्व कांहीं व्यवस्थित असतें तर धाकट्या मधूचें किती तरी कौतुक झालें असतें; परंतु त्या गोजिरवाण्या बालकाच्या बालक्रीडा पाहून त्याच्याविषयीं हृदयांत प्रेम उत्पन्न होण्याऐवजीं त्याच्या मातेच्या नेत्रांतून संतत अश्रुधारा कां वहात असत याची त्या बिचाऱ्याला काय कल्पना? त्या बालकाकडे पाहिलें म्हणजे इंदिरेला पतीचें स्मरण होई व भर संक्रांतीच्या दिवशीं घडलेल्या त्या हृदयविदारक प्रसंगाचें भेसूर चित्र तिच्या पुढें मूर्तिमंत उभें राही. हेंच बालक आपल्या उदरांत गर्भावस्थेत असतांना आपले पति आपणाला टाकून गेले. ही कल्पना इंदिरेच्या समोर नेहमीं असल्यामुळें धाकटा मधु तिला नेहमीं वाईट पायगुणाचा वाटे. पण वेडे इंदिरे, ह्यांत त्या बालकाचा काय बरें दोष? त्याचा जन्म टाळणें किंवा घडवून आणणें कोणाच्याही स्वाधीन होतें काय? सुंदरराव निघून जाण्याशीं व त्याच्या जन्माशीं काय संबंध? त्या वेळीं तुम्ही मायलेकरांनीं आपल्या ओठाळ जिव्हेला थोडासा तरी आळा घातला असता तर आज हा प्रसंग कां येता? श्रीमंती कुणाला जन्माची बोलून चुकली नाहीं! लक्ष्मी चंचल आहे! ती आज एकाच्या तर उद्यां दुसऱ्याच्या घरीं अशा रीतीनें सदा परदार शोधणारी! मग ती सहज चुकून क्षणमात्र मुक्कामाकरितां तुमच्या घरीं उतरली असतां–तिच्या जोरावर तुम्ही त्या बिचाऱ्याचा पदोपदीं अपमान करावयास तयार झालां; पण मूर्ख पोरी, पति म्हणजे तुझें दैवत, तुझ्या सकलसुखाचा आधार, व तुझ्या सौभाग्याचा उज्ज्वल रवि हें तूं कसें विसरलीस? त्याला दुःसह वाक्प्रहारांनीं ताडण करतांना तुला मागला पुढला विचार आला नाहीं काय? तुझ्या अविचाराचीं हीं कटु फळें आतां तुझ्यावांचून कोण चाखील? त्या बिचाऱ्या मधूला पदोपदीं दोष लावीत बसण्यापेक्षां तूं एकवार आपल्याकडेच पहा म्हणजे ह्या साऱ्या अनर्थाच्या मुळाशीं कोण आहे तें समजून येईल!!!

असो, वाचक हो, इंदिरा ह्याप्रमाणें नेहमीं दुःखीकष्टी असे. सणवार, खाणेंपिणें, नटणेंमुरडणें वगैरे गोष्टींचा तिला आतां वीट आला होता. फार



त्या बालकाकडे पाहिलें म्हणजे इंदिरेला पतीचें स्मरण होई !

काय, पतीच्या सर्वस्वी नुकसानीला कारणीभूत झालेलें हें जीवित सुद्धां तिला आतां भारभूत झालें होतें!

मोटाभाईंची स्थिति त्याहूनही शोचनीय होती. त्यांच्या कुटुंबाच्या तामसी स्वभावाची पुष्कळांना चांगलीच ओळख होती, यामुळें जांवई निघून जाण्याचें कारण जगजाहीर होण्याला फारसा वेळ लागला नाहीं. मोटाभाईंचें मित्रमंडळही बरेंच होतें, आणि त्या सर्वांनीं जेव्हां त्यांच्या विलक्षण स्त्रैणत्वाबद्दल त्यांची वरचेवर कानउघाडणी केली, तेव्हां तर ते अगदीं हतबुद्ध होऊन गेले! त्यांना कोणीहि बाहेर तोंड काढूं देईनात; व आतां ही वकिलीहि नको आणि हा चहूंकडून माराही नको असें होऊन त्यांनीं आपल्या धंद्यावर पाणी सोडलें व इतक्या कष्टानें व अतिश्रमानें थाटलेलें आपलें मुंबईतलें वडिलोपार्जित घरदार सारें कांहीं आटोपून ते आपल्या मंडळीसह ठाण्याच्या थंड हवेंत जाऊन राहिले!

पण हवेचा परिणाम बाह्य प्रकृतीवर होणार! ज्याचें हृदय विषारी चिंता-भुंग्यानें पोखरून टाकलें आहे, अशाला ठाणें काय किंवा महाबळेश्वर काय? इंद्राचें नंदनवनसुद्धां सुखकारक होणार नाहीं! त्यांतून मोटाभाईंच्या मनाची उद्विग्नता कमी करण्यापेक्षां ती वाढविणारींच साधनें त्यांच्या जवळ होतीं. श्रीमंतीच्या तोऱ्यांत साऱ्या जगाला तुच्छ लेखणारी व ह्या अनर्थाची मूलभूत झालेली त्यांची पत्नी मैनाबाई, तारुण्यमदानें धुंद होऊन पतीचें नातें सपशेल पायांखालीं तुडविणारी त्यांची अविचारी मुलगी इंदिरा व रूपानें, गुणानें व स्वभावसरलतेनें आपल्या बापाची केवळ प्रतिकृतिच असा छोटा मधुकर, हीं सर्व त्यांना पावलोंपावलीं सुंदररावांची आठवण करून देऊन त्यांच्या हृदयांत कालवा-कालव करून सोडीत.

सारांश, ठाण्याच्या गार हवेंत मोटाभाईंच्या मनाला समाधान वाटण्याच्या ऐवजीं, एकांत वासांत दुसरा कांहींच उद्योग नसल्यामुळें नेहमीं तोच विषय डोळ्यापुढें उभा राहून उलट त्यांची उद्विग्नता ज्यास्त वाढली मात्र!

असो. वाचक, आपण आतां ह्या दुःखी कुटुंबाला ठाण्यासच सोडून दुसरीकडे जाऊं या.

---

३

आम्हां लेखकांना काय? मनांत यावयाचीच काय ती खोटी, कीं वाटेल त्या ठिकाणीं आम्ही एका क्षणार्धांत जाऊन पोंचतों. मुंबईहून विलायतेस

यावयास कमींत कमी पंधरा दिवस लागून वर पांचसहाशें रुपयांचा खर्च असतो; पण आम्हांला त्यांपैकीं कांहींच लागत नाहीं. हे पहा वाचक, आपण खुद्द लंडन-मध्यें येऊन पोंचलों सुद्धां! पण ह्या खेपेला आपणांला येथें फार दिवस राहतां येणार नाहीं. पुढील खेपेस येऊं त्या वेळीं लंडन शहर व तेथलीं विशेष पाहण्या-सारखीं स्थळें असतील तीं पाहूं. आज येथल्या एका विशिष्ट गृहस्थाची ओझरती भेट घेऊन त्याच्याच बरोबर आपणाला परत मुंबईस जावयाचें आहे. तर चला आमच्या बरोबर एकदम म्युझियममध्यें. म्युझियम म्हणजे पदार्थ संग्रहालय आणि त्यांतूनही तो लंडनमधील पदार्थसंग्रहालय, साऱ्या जगांतील अपूर्व वस्तूंचा निधि! त्याची शोभा किती अवर्णनीय! जुने शिलालेख, जुने हस्तलेख, प्राचीन राजेलोकांचीं शस्त्रास्त्रें, चिलखतें, नानाप्रकारचीं नवीं व जुनीं चित्रें वगैरे वगैरे हरतऱ्हेच्या जिनसांनीं ठेचून भरलेली ती भव्य व शोभायमान इमारत पाहून मनुष्यमात्राचें चित्त तल्लीन होऊन जातें, व एक गोष्ट पहात असतां ती सोडून दुसरीकडे जाववत नाहीं; पण वाचक, आपणांस या वेळेस तिकडे मोठ्या कष्टानें दुर्लक्ष्य केलें पाहिजे. ती पहा पलीकडे म्युझियमची लायब्ररी! ओहोहो! केवढीं तरी तीं भव्य कपाटें. त्यांतील एका रांगेनें लाविलेली तीं असंख्य पुस्तकें पाहून प्रत्यक्ष देवी सरस्वतीच आपल्या लक्षावधी रूपांनीं ह्या ठिकाणीं वास करीत आहे कीं काय असा भास होतो. अशा सर्वांग सुंदर रसाचा आस्वाद घेण्याकरतां ते पहा किती तरी विद्वान् लोक लोलुप होऊन बसले आहेत. आणि ह्यांतल्याच एका गृहस्थांशी आज आपल्याला परिचय करून घ्यावयाचा आहे.

ती पहा शेवटच्या वेत्रासनावरच ती स्वारी आहे त्यांच्या समोर अनेक चित्रभूषित वर्तमानपत्रें पडलीं असून त्यांचें ते मोठ्या काळजीनें वाचन करीत असावेत असें वाटतें पण ते प्रत्यक्ष वाचीत असावेत असें म्हणण्यापेक्षां ते आपण वाचनांत अगदीं गुंग होऊन गेलों आहों असें दाखवीत आहेत असेंच म्हटलेलें बरें. कारण एखादें वर्तमानपत्र हातांत घेऊन त्यावर अशी नजर फिरते न फिरते तों तें खालीं पडून, त्याच्या जागीं दुसरेंच येतें! तें क्षणमात्र दृष्टिपथांत येतें न येतें तों त्याचीही पूर्वींप्रमाणेंच वाट होते. याप्रमाणें ते मंडूकप्लुतिन्या-यानें तेथलीं एकंदर वर्तमानपत्रें व मासिकें भराभर आक्रांत करण्याच्या विचा-रांत आहेत असें दिसतें. असें कां बरें व्हावें? त्यांच्या अंतःकरणांत कांहीं तरी निराळीच विचारसरणी सुरू असून हें वर्तमानपत्रांच्या वाचनाचें प्रदर्शन म्हणजे निवळ शिष्टाचार तर नसेलना? पण हें समजावयास मार्ग काय? चला,

ते पहा उठलेच, तर आपणही त्यांच्या मागून जाऊन त्यांचे कांहीं ह्यत समजल्यास पाहूं या.

तो गृहस्थ तेथून निघून कांहीं वेळ बाहेरच्या विस्तीर्ण उपवनांत हिंडून च नंतर बाजारांत कांहीं पुस्तकें वगैरे खरेदी करून फिरत फिरत एकदांच्या अस्तमानीं आपल्या बिऱ्हाडीं आला. बोर्डिंगांत नित्याप्रमाणें भोजनविधि उरकल्यावर त्यानें आपलें सामान सुमान बांधण्याची सुरुवात केली कसा झाला तरी आज जवळ जवळ पांच वर्षांचा पसारा, तो असा सहज थोडाच आंवरला जाणार होता? नीट जुळवाजुळव करून व काय हवें नको त्याची निवडानिवड करण्यांत व सर्व व्यवस्थित रीतीनें बांधण्यांत बिचाऱ्याची एक रात्र गेली; व अगदीं उजाडतां उजाडतां कुठें त्याला किंचित् झोंप घेण्याला फुरसत मिळाली.

फार झालें तर तास दोन तास डुकली आली असेल, तो गृहस्थ पुनः खडबडून उठला. प्रातर्विधि गडबडीनें आटपून बोर्डिंगांत जाऊन त्यानें फराळ केला. त्याच वेळीं खानावळीचें सर्व पैसे त्यानें चुकते केले व वरती कांहीं चिरीमिरी देऊन त्या सर्वांचा त्यानें मोठ्या प्रेमानें निरोप घेतला; व त्यानंतर आणखी दोनचार स्नेहीमंडळींची भेट घेऊन घेऊन व सर्वांशीं प्रेमानें हस्तांदोलन करून सुमारें बारा वाजतां स्वारी आपल्या सर्व सामानसुमानासह व्हिक्टोरिया क्रॉस स्टेशनवर हजर झाली!!!

× × × × ×

वाचक, ही व्यक्ती कोण, ती आपण ओळखली काय? हे आपले सुंदरराव! त्या ऐन संक्रांतीच्या दिवशीं मैनाबाईच्या व इंदिरेच्या वाक्प्रहारांनीं विद्ध होऊन ते आपल्या घरांतून बाहेर पडले होते. ही गोष्ट आपल्याला स्मरत असेलच. मलबारहिलवरून ते व त्यांचे मित्र वसंतराव बोलत बोलत खालीं उतरले व सुंदरराव घरीं जाण्याकरतां म्हणून गिरगांवच्या रस्त्याला लागले असें आम्ही मागें म्हटलेंच आहे; परंतु वास्तविक पाहतां ते घरीं गेले नाहींत. ते तसेंच पुण्यास निघून गेले. त्या ठिकाणीं त्यांनीं आपली सर्व परिस्थिति आपल्या चार मित्रांपुढें मांडली व ईश्वराच्या दयेनें तेथल्या एका श्रीमान् भाटिया गृहस्थाला त्यांची दया येऊन त्यांनीं त्यांना विद्याभ्यासाकरतां पदरच्या खर्चानें विलायतेस पाठविण्याचें कबूल केलें.

सुंदररावांना फार आनंद झाला व लागलीच कपड्यालत्त्याची वगैरे तयारी करून ते पुढच्याच मेलनें विलायतेस निघून गेले. तेथें गेल्यावर ते बी. ए.

झाले व लागलीच त्यांनीं तेथील कॉलेजांत वैद्यकीचा अभ्यास सुरू केला. ते जात्या हुषार व मेहनती असल्यानें व त्या परोपकारी गृहस्थांकडून त्यांना द्रव्याची वाटेल ती मदत योग्य काळीं होत असल्यानें तेथील विश्वविद्यालयांतील अत्यंत अवघड मानलेल्या एम. डी. परीक्षेंत ते पहिल्या वर्गांत उत्तीर्ण झाले व त्याचा चांगला सन्मान होऊन त्यांना पुष्कळ पारितोषिकेंही मिळालीं. सुंदररावांच्या विद्वत्तेवर खुष होऊन त्यांना तेथील अधिकाऱ्यांनीं तेथेंच एक मोठी नोकरीही देऊं केली, परंतु त्यांचा ओढा हिंदुस्थानाकडे असल्यानें व त्यांच्या आश्रयदात्याचीही इच्छा त्यांनी मुंबईंतच दवाखाना उघडावा अशी असल्यानें, तिकडची सर्व निरवानिरव करून, सुंदररावांची स्वारी आज स्वदेशात परत येण्याच्या उद्देशा... वर सांगितल्याप्रमाणें स्टेशनावर हजर झाली होती ! असो ! !

---

४

मोटाभाई व त्यांच्या दुःखी कुटुंबाला आपण ठाण्यांत सोडलें त्या गोष्टीला आज पांच वर्षे झालीं, तर वाचक, आपण आतां त्यांचा समाचार घेऊं या.

ठाण्यांत आल्यावर आज नाहीं उद्यां आपल्या मनाला थोडेंबहुत समाधान वाटेल अशी मोटाभाईंना फार आशा होती. परंतु तो त्यांचा समज अगदीं चुकीचा ठरला. जांवयाचें दुःख प्रतिक्षणीं त्यांच्या पुढें उभें राहून त्यांच्या हृदयांत जी कालवाकालव उठे तिच्यापुढें त्यांना कांहींच सुचेनासें झालें. त्यांच्या वकिलीवर तर अजिबात पाणी पडलें व ते दिवसभर भ्रमिष्टासारखे बसून असत. कुठें देवळांत जावें, पुराणकीर्तन ऐकावें व राहिलेला वेळ छोट्या मधूला खेळविण्यांत घालवावा अशा रीतीनें ते कालक्रमणा करूं लागले.

मैनाबाईंचीही स्थिति जवळ जवळ तशीच झाली होती. त्यांना आतां पूर्ण पश्चात्ताप झाला होता, व कसेंही करून एकदांचे सुंदरराव घड पायांनीं घरीं येऊं देत म्हणून त्या रोज एका नव्या देवाला नवस करीत असत. त्यांचा तो पूर्वीचा अभिमान आतां साफ गळून गेला होता व त्या आतां देव देव करूं लागल्या होत्या.

पण बिचारी इंदिराबाई ! तिची मात्र स्थिति फारच कष्टप्रद झाली होती. उठतां, बसतां, कोणतेंही काम करतां तिला पतीचें स्मरण होई, व या साऱ्याला कारण आपण व आपली आई, हें पाहून तिच्या नेत्रांतून सतत अश्रुधारा

चाललेल्या असत. मोटाभाई व मैनाबाई तिचें परोपरीनें समाधान करीत. परंतु पतिसुखाला आंचविलेल्या त्या बिचारीला अशानें थोडीच शांतता येणार होती. छोटा मधु आपल्या मुग्ध चेष्टांनीं व बालक्रीडांनीं आपल्या मातुःश्रीला रिझविण्याचा किती तरी प्रयत्न करी, पण त्याला पहातांच तिच्या कपाळाला आंठ्या पडत, व ती वाईट पायगुणाचा, अभागी, अनर्थाचें मूळ वगैरे दुःशब्दांनीं ताडण करून ती त्या कोमल बालकाचा अव्हेर करी! पण दुर्दैवी इंदिरे, यांत त्या बालकाचा काडीइतका दोष होता का?

अलीकडे त्यांना अन्न मुद्धां नकोसें झालें होतें. दोन दोन दिवस त्या अन्नावांचून तशाच पडून रहात. त्यांना वारीक ज्वर येऊं लागला होता, व त्या अगदीं क्षीण होत चालल्या होत्या. मोटाभाईच्या ध्यानांत ही स्थिति येऊन त्यांनीं त्यांना औषधोपचार सुरू केले, परंतु तें सुद्धां त्यांच्या हातून नेमानें घेतलें जाईना, व पुढें पुढें तर त्यांनीं औषध घेण्याचें सुद्धां साफ नाकारलें.

अशा रीतीनें दिवस जातां जातां इंदिराबाईची क्षीणता जास्त वाढत चालली व त्यांचें दुखणें आतां क्षयावर जातें कीं काय अशी भीति वाटूं लागली. अंगांतील ज्वर निघेना व त्यांतच खोकला सुरू होऊन त्यांनीं आतां अंथरूण धरलें.

रात्रीची वेळ, सुमारें आठ वाजून गेलेले, थंडी म्हणजे नुसती मी म्हणत होती. अशा वेळीं आज मोटाभाईच्या घरा कोण धांदल चालली होती! इंदिराबाईची प्रकृति एकाएकीं फारच अस्वस्थ झाल्यामुळें त्या घरांत सर्वत्र हाहाःकार उडून गेला होता. जवळपास डाक्टर कोणी नाहीं, अशा स्थितींत हताश होऊन मोटाभाई मुंबईहून तरी कोणी डॉक्टर आणावा ह्या उद्देशानें मोठ्या लगबगीनें स्टेशनावर चालले होते. दुःखावेगानें ह्या वेळीं त्यांना पुढचा रस्तासुद्धां नीटसा दिसत नव्हता. ते स्टेशनावर आले व पहातात तों एक गाडी नुकतीच गेली असून दुसरी यावयास अर्धा तास अवकाश होता.

मोटाभाईना तो अर्धा तास म्हणजे केवढा तरी मोठा वाटला—व ते खिन्न मुद्रेनें प्लॅटफॉर्मवर इकडेतिकडे हिंडूं लागले. ते वरचेवर घड्याळ काढून पहात व एक दीर्घ निश्वास सोडीत. ही त्यांची स्थिति सेकंडक्लास वेटिंग-रूममध्यें बसलेल्या एका साहेबी पोषाख केलेल्या गृहस्थानें पाहून त्यानें त्यांना आपल्या जवळ बोलावलें व त्यांची वृत्ति अशी होण्याचें कारण विचारलें. मोटाभाईनींही त्यांना एकंदर प्रकार निवेदन केला.

सुदैवानें ते गृहस्थ डॉक्टर होते व ठाण्यास एक केस पाहून ते आतांच्या लोकल ट्रेननें परत मुंबईस जाणार होते. हा हृदयद्रावक मजकूर ऐकून ते मोटा-भाईबरोबर परत यावयास कबूल झाले व आपले अनायासें काम झाले असें पाहून मोटाभाई त्यांना आपल्या बिऱ्हाडीं घेऊन गेले.

डॉक्टरांनी रोग्याची प्रकृति नीट तपासून पाहिली व रोगापेक्षां मनःसंतापाचाच जोर विशेष आहे असे निदान करून, आपल्या बॅगमधून एक औषध तयार करून दिलें; व तें रात्रीतून तीन वेळ घ्यावयास सांगून व त्याचप्रमाणें पथ्यापाण्याची व्यवस्था सांगून ते निघून गेले. जातांना व्हिजिटची फी व औषधाचा चार्ज काय म्हणून मोटाभाईंनी त्यांना विचारलें, परंतु " माझें औषध लागू पडूं द्या व रोग्याला किंचित गुण येऊं द्या म्हणजे मग पाहूं " असें त्यांनी उत्तर दिलें. बिचारे मोटाभाई ह्यावर काय बोलणार ! आपणाला आज हा डॉक्टर नव्हे तर प्रति देवच भेटला असें समजून त्यांनी डॉक्टरांना धन्यवाद दिला.

त्यवढ्याच औषधानें इंदिराबाईंना किंचित गुण पडला, व दुसऱ्या दिवशीं आतां औषधाचें केस होणार वगैरे विवंचनेंत मोटाभाई आहेत तोंच अस्तमानीं डॉक्टर हजर झाले. ह्या वेळेसही त्यांनी कोणाशीं विशेष भाषण न करतां रोग्याची प्रकृति तपासली व दुसऱ्या दिवशीं संध्याकाळपर्यंत पुरे इतकें औषध देऊन ते निघून गेले.

याप्रमाणें सतत पंधरा दिवस डॉक्टर नेमानें येऊन औषध देऊन जात होते, व त्यांचा पेशंटही आतां बराच सुधारला होता. रोग साफ नष्ट झाला होता व आतां फक्त शक्तीवर टॉनिक सुरू होतें. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, इतक्या दिवसांत औषधाच्या पैशाचें किंवा व्हिजिटच्या फीचें त्यांनीं मुळींसुद्धा नांव काढलें नाहीं. टॉनिकच्या बाटल्यासुद्धां त्यांनीं आपल्या खर्चानेच आणून दिल्या होत्या. पण ह्याहूनही विशेष आश्चर्याची गोष्ट अशी कीं ते नेहमीं संध्याकाळीं येत व कोणाशींही न बोलतां मुकाट्यानें रोग्याला तपासून औषधाची बाटली ठेऊन जात. एखादे वेळ मोटाभाई त्यांना चहाचा आग्रह करीत; परंतु तो घेत असतांना ते इतके कावरेबावरे होत कीं, चहा घेऊन केव्हा एकदां तेथून निसटून जातों असें त्यांना होई. मोटाभाईंना ह्या त्यांच्या वृत्तीचें मोठें आश्चर्य वाटे; पण त्यांचा नाइलाज होता. डॉक्टरचे हे उपकार आपण दुसऱ्या कोणत्या तरी रीतीनें फेडून टाकूं असें म्हणून ते गप्प असत. याप्रमाणें

नित्य औषधाचा मारा सुरू होतांच एक महिन्याच्या आंत इंदिराबाईंची प्रकृति दुरुस्त झाली व त्या आतां चांगल्या हिंडत्या फिरत्या झाल्या, व अर्थात् डॉक्टरांचें हेलपाटेही त्या मानानें कमी आले!

× × × × ×

आज संक्रांत! सुंदरराव गेल्यापासून अशा संक्रांती चार येऊन गेल्या होत्या, व प्रत्येक खेपेला त्यांची आठवण होऊन मोटाभाईंच्या घरांत थोडी बहुत तरी रडारडी झाल्यावांचून रहात नसे. पण आज काय असेल तें असो, त्या घरांत थोडीशी आनंदाची छटा मारीत होती. इंदिरा नुकतीच एका मोठ्या आजारांतून बरी झालेली, यामुळें मोटाभाईंच्या व मैनाबाईंच्या जिवाला तेवढीच हुषारी आली होती, व म्हणूनच त्यांतल्या त्यांत आजचा सण जरा थाटानें साजरा करण्याचा त्यांचा विचार होता. पूर्व प्रकरणांत सांगितलेले सुंदररावांचे स्नेही वसंतराव त्यांचा व मोटाभाईंचा घरोबा असे, व वसंतराव इंदिराबाईंना बहीण मानीत असत. वसंतरावांना आज भोजनाचें आमंत्रण होतें व त्याचा त्यांनीं स्वीकारही केला होता; परंतु मुंबईतल्या आपल्या कामाधामाच्या निमित्तानें आपणास दोन प्रहरीं येतां येणार नाहीं—आपण रात्रीं येऊं असे त्यांनीं सांगितल्यावरून सणांतील मुख्य भाग—जो भोजन—त्याचा बेत मोटाभाईंनीं मुद्दाम रात्रीवर ठेवला होता. अशा समयास आपले उपकारकर्ते जे डॉक्टर त्यांनाही मेजवानीला बोलावण्याचा मोटाभाईंचा विचार होता, परंतु एक तर ते अलीकडे बरेच दिवसांत आले नव्हते व दुसरें असे कीं त्यांचें नांव व पत्ता त्यांना माहीत नव्हता, यामुळें त्यांचा तो बेत जागच्या जागींच राहिला!

ठरल्याप्रमाणें रात्रीं ७॥ वाजतां वसंतराव ठाण्यास हजर आले पण त्या वेळेस ते एकटे नव्हते. त्यांच्या बरोबर आणखी एक व्यक्ति होती. ते दोघेही सरळ मोटाभाईंच्या बंगल्यावर आले व त्याबरोबरच्या गृहस्थाला बाहेर बागेंत बसावयास सांगून वसंतराव आंत गेले.

मोटाभाई त्या वेळीं गांवांतील एकदोघां शिष्ट लोकांना बोलावण्याकरतां बाहेर गेले होते; म्हणून वसंतराव एकदम तडक माजघरांत गेले. त्यांनीं मैनाबाईंना तिळगूळ देऊन नमस्कार केला व जवळ असलेल्या मधूला उचलून घेऊन ते इंदिराबाई जवळ हलवा मागूं लागले. इंदिराबाईंनीं चांदीच्या वाटींतून एक मूठभर चांगला कांटेरी हलवा काढून वसंतरावांच्या हातावर घातला, पण

त्यांच्या तोंडून शब्द निघेना. त्याच वेळीं त्यांना पतीचें स्मरण झालें व त्यांच्या डोळ्यांना चटकन पाणी आलें.

वसंतरावांनीं असें होण्याचें कारण तेव्हांच ताडलें व ते हंसत हंसत म्हणाले. " इंदुताई, हें काय, हलवा दिला आणि " तिळ घ्या गूळ घ्या गोड बोला " असें म्हणायचें तें हें काय मध्येंच. पण दम धरा हां! मी तुम्हाला असा सुंदर हलवा देतों कीं: तुम्ही म्हणाल वा!

इंदिराबाईला या बोलण्याचा कांहींच अर्थ समजेना–त्या डोळे पुशीत तेथेंच उभ्या राहिल्या. पण वसंतरावांनीं तितक्यांत त्या बागेंत बसलेल्या व्यक्तीचा हात धरून त्यांना आंत आणलें व थेट इंदिराबाईपुढें उभें करून म्हटलें, " हा! इंदुताई, हा घ्या माझा हलवा, विलायती आहे–पण पहा तर खरा कसा आहे, आतां याला नीट संभाळा " आणि असें म्हणून तेथून पळ काढिला.

हे तर आपल्याला औषध देऊन बरें केलेले डॉक्टर! आणि ही काय भलतीच चेष्टा वसंतरावानें केली, असें म्हणून इंदिराबाई किंचित् चपापून मागें सरल्या: पण क्षणमात्र नजर लावून पहातांच त्यांना एकंदर प्रकार कळून आला!

वाचकहो, हे डॉक्टर म्हणजे दुसरे तिसरे कोणी नसून आपले सुंदरराव आहेत हें कां तुम्हाला सांगितलें पाहिजे! पतीची ओळख पटतांच इंदिराबाईंना कंप सुटला व त्या भरांत त्यांच्या हातांतली चांदीची वाटी केव्हांच निसटून गेली. त्याच वेळीं सुंदररावांनीं पुढें होऊन जर त्यांना सांवरलें नसतें तर ह्या आनंदाच्या भरांत आणखी एखादा अनर्थ ओढवतो कीं काय अशी भीति होती!

असो. वाचक, मोटाभाई घरीं आल्यानंतर त्यांना हें वर्तमान समजल्यावर त्या घरांत किती आनंदीआनंद झाला असेल व डॉक्टरच्या डॉक्टर येऊन वरती जांवयाच्या पंक्तीचा लाभ झाल्याबद्दल मोटाभाईंना किती हर्ष झाला असेल, त्याचें वर्णन आम्हीं कुठवर करावें? त्याचप्रमाणें आज पांच वर्षांनीं पुन्हा संमीलित झालेल्या त्या पतिपत्नींत त्या रात्रीं किती रुसवे फुगवे झाले असतील, किती आनंदाश्रु वाहिले असतील, व उभयतांनीं एकमेकांच्या दुःखाचें कसें परिमार्जन केलें असेल त्याचें वर्णन निदान आमच्या लेखणीबाहेरचें आहे! आम्ही ह्या ठिकाणीं एवढें मात्र सांगतों कीं, ज्या एका जरीच्या पातळापासून आज पांच वर्षांपूर्वी मैनाबाईनीं एवढें रण माजविलें होतें, तशाच तऱ्हेचें उंची

कोइमतुरी पातळ आज सुंदररावांनीं मुद्दाम बरोबर घेतलें होतें—तें पाहून त्यांच्या मातांना पत्नीला काय वाटलें असेल बरें !

× × × × ×

सुंदररावांचा दवाखाना मुंबईस मोठ्या भरभराटींत चालला आहे. तथापि हवेकरतां सर्व मंडळी ठाण्यासच आहेत. छोटा मधु मात्र आपल्या साहेबी पित्याबरोबर सारा दिवस मुंबईसच असतो !

—※—



# विनोदी–लेखमाला.

## गीताराव ( लेखांक १. )

( लेखक—आत्मानंद. )



झा मित्र ‘ गीताराव ’ हा मोठा भला माणूस होता. त्याच्यासारखा सज्जन व भाविक माणसें फार विरळा.

गीताराव हें कांहीं त्याचें खरें नांव नव्हे. बायकांमध्यें ‘ गीताबाई ’ असें नांव असतें, पण तें निरर्थक असतें. पण माझ्या मित्राचें नांव सहेतुक म्हणून सार्थ होतें. आमच्या प्रेमळ मित्रांना आपल्याला दिलेलीं टोपण नांवें सर्वांनाच आवडतात. लहानपणीं मनुष्याला पाळण्यांत घालून नांव ठेवितात तो समारंभ फार गोड असतो, पण त्याची गोडी इतरांना. लोक आपणास पोर समजून कौतुक करीत असतां, उलट लोकांसच पोरें समजून त्यांचें कौतुक करण्यासारखी प्रौढ बुद्धि पोटांत असणें ही गोष्ट श्रीकृष्णासारख्यांनाच अनुभवावयास मिळणार ! कुक्कु बाळ म्हणून अंगाखांद्यावर खेळावयास घेतलेल्या श्रीकृष्णाच्या मनांतले सर्व विचार जसेच्या तसे कळते तर, प्रेमळ अशा गोपींनींही, हातावर पडलेला निखारा किंवा विंचू आपण फेकून देतों, तसा श्रीकृष्णाला दूर फेकून दिला असता असें वाटतें. असो; सांगावयाचा मुद्दा इतकाच कीं, लहानपणीं पाळण्यात झालेल्या आपल्या नामकरणविधीच्या आनंदास आपण मुकतों. पण विनोदी व प्रेमळ मित्र संग्रहीं असलेल्या मनुष्याला प्रौढपणींही तो आनंद भोगावयास मिळण्याचा संभव असतो.

माझ्या मित्रास त्याच्या मित्रांनीं ‘ गीताराव ’ हें जें नांव विनोदानें दिलें, तें त्यानें साभार किंबहुना कृतज्ञताबुद्धीनें स्वीकारलें होतें. कारण तो खरोखरच अंतर्बाह्य गीतामय बनला होता. असा त्याचा कोणताही व्यवहार नव्हता, कीं ज्यांत त्यानें गीतेचा संबंध आणून भिडविला नव्हता. गीतेच्या तीन षट्काध्यायी होतात, म्हणून तो दिवसांतून फक्त तीनच वेळां चहा घेई. जेवणांतला कोणताही पदार्थ पुष्कळ वाढला असला तरी अठरा घासांत तो संपवी, किंवा थोडा वाढला असला तर अठरा घासांना पुरे इतका मुद्दाम मागून

पई. कारण गीतेचे अध्याय अठराच आहेत! त्याच्यापाशीं १२६०० रु. शिल्लक होते. ते त्यानें प्रथम अठरा निरनिराळ्या बँकांतून प्रत्येकींत ७०० प्रमाणे वांटून ठेवीदाखल ठेविले होते. कारण गीतेचे अध्याय अठरा व एकंदर श्लोक ७०० आहेत म्हणून! पुढें पुढें बँकाची दिवाळी निघूं लागली, तेव्हां बाकीचे सर्व काढून घेऊन फक्त ७०० रु. त्यानें अठरा बँकांमधून शिल्लक ठेवले; आणि तेही गीतेंतील निरनिराळ्या अध्यायांत जितके जितके श्लोक आहेत त्या त्या प्रमाणानें गतवर्षी जानेवारीच्या पहिल्या तारखेपर्यंतचा एका बँकेकडून त्याचा हिशोब आला, त्यांत व्याजाचा दर मध्येंच अभावित रीतीनें वाढल्यामुळें कांहीं रुपये फुगून हें प्रमाण बिनसलें; तेव्हां वाढलेले रुपये आपले वहांत जमा धरितांना ' प्रक्षिप्त ' असें त्यांपुढें त्यानें लिहून ठेवलें.

त्रिगुणाचे रंग तीन म्हणून पिवळ्या, तांबड्या व काळ्या रंगांशिवाय दुसऱ्या कोणत्याही रंगाचा कपडा गीताराव कधींही वापरीत नसे. त्याच्या थोरल्या मुलाचें नांव भगवान व धाकट्याचें केशव असें होतें. दोघांच्या मध्यें एक मुलगी होती. तिचें नांव गीता होतें हें सांगावयास नकोच. मुलांना हाका मारण्याच्या झाल्यास ' भगवद्गीते ' अशा जोड शब्दानें तो हांका मारी. व या एका शब्दांत दोन नांवें आल्यामुळें एका ऐवजीं दोन मुलें हांकेसरशीं त्याजपुढें येत! धाकटा मुलगा केशव हा व्रात्य असे. परंतु गूळ फार खाणारा केशव, म्हणून ' गुडाकेश,' केशव शेजाऱ्यांस ताप देणारा म्हणून ' परंतप ' अशा तऱ्हेचे गीतेंतील व्यक्तिवाचक शब्द आठवल्यामुळें तो सात्त्विकपणानें मुलाच्या खोड्यांचें चीजच करीत असे. मुलें फार ओरडूं लागलीं अगर भांडूं लागलीं म्हणजे राग आलाच तर पहिल्या अध्यायांतील १२, १४, किंवा या श्लोकांचें स्मरण होऊन ' शंखं दध्मौ प्रतापवान ' ' दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ' किंवा ' शंखान् दध्मौ पृथक् पृथक् ' असें म्हणतांच गीतेच्या स्मरणानें त्याचा राग शांत होत असे. एकदां त्यानें आपणास रेशमी मुकट्यापेक्षां तागी मुकटाच अधिक आवडतो असें मला सांगितलें, व कारण विचारतांच तो म्हणाला कीं, " तागी ' मुकटा उलटा करून नेसूं लागलों म्हणजे अक्षरांचें परिवर्तनही मनांत आपोआप होऊन ' गीता ' या शब्दाची आठवण अनायासें होते.

योग हा शब्द तर तो बहुधा बसतां उठतां ' लाथाडीत ' असे. असें म्हणण्यांत किंचित् विपरीतत्व वाटतें, परंतु तात्पर्यार्थानें तशी गोष्ट होत असे यांत शंका नाहीं. एखाद्या गोष्टीबद्दल नुसतें ' वाईट वाटतें ' असें म्हणण्याऐवजीं

मला ' विषादयोग ' प्राप्त झाला आहे असें तो म्हणे. ' करतों ' या साध्या क्रियापदाऐवजीं ' कर्मयोगाला आरंभ करतों ' असेच शब्द यावयाचे. कुणानें आणून दिलेले रुपये मोजणें हा ' सांख्ययोग.' विडी ओंठात असतां आराम खुर्चीवर पाय ताणून डोळे मिटून पडणें हा ' ध्यानयोग. ' एखाद्या सरकारी कागदाविषयीं माहिती विचारिली असतां, तें ' कान्फिडेंशल आहे म्हणून सांगता येत नाहीं ' असें सांगण्याऐवजीं ' तें राजगुह्य योगापैकीं ' प्रकार आहे असें म्हणून पृच्छकाची तो संभावितपणें संभावना करी. इतर लोक स्वतःस ' राजनिष्ठ ' म्हणून घेतात; परंतु मी राजनिष्ठ आहे असें म्हणण्याऐवजीं मी ' भक्तियोगी ' आहे असें म्हटलें तरी चालावें, अशी त्यानें सरकाराकडे परवानगी मागून ठरविली होती व ती त्यास मिळाली होती. एक दिवस हपीसचे साहेब फार रागावले तेव्हां 'You need not be angry Sir,' असें म्हणण्याऐवजीं गीतारावास भान न राहून ' Why do you practice विश्वरूप-दर्शनयोग Sir ! ' असे शब्द गीतारावाच्या तोंडातून निघून गेले. पण साहेबास त्या शब्दाचा अर्थ न कळल्यामुळें लगेच तेवढ्या वेळांत त्यांनीं ' Beg your pardon असे म्हणून गीताप्रमाणे नीट इंग्रजी बोलण्यास सुरवात केली. श्मश्रु करण्यास बसतो असें म्हणण्याऐवजीं, तोच अर्थ ' संन्यास योग ' हे शब्द घालून तो सुचवीत असे. याशिवाय गीतेतील इतर अनेक शब्दही प्रसंगोपात्त त्याच्या तोंडून येत. पण यथान्याय बोलावयाचें म्हणजे ती सर्व क्रिया त्याचे हातून नकळत आपोआप होत असे. इतकें त्याचें मनच गीतेंत खरोखर गढून गेलें होतें. ' यस्य निश्वसितं वेदाः ' हे जसें ईश्वराचें यथार्थ वर्णन होऊं शकतें तसेंच ' अस्य निश्वसितं गीता ' हें वर्णनही माझ्या मित्रास बरोबर लागू पडण्यासारखें आहे.

असो. थोडे दिवसांपूर्वी सकाळीं मी घरीं चहा घेत बसलों असतां, गीतारावाची स्वारी येऊन माझ्यापुढे अकस्मात् धडकली. गोष्ट कधींही न होणारी ती झाली म्हणून मी आश्चर्यानें त्याला म्हणालों ' अरे गीताराव, तूं या वेळीं इकडे कसा ! या वेळीं तर तुझ्या खोलीमध्यें गीतेचा कीस पडत असावयाचा, गीतेचें उच्च स्वरात पाठांतर तरी चालावयाचें, किंवा गीता-भाष्यांपैकीं एखाद्या व्याख्यात्याच्या शब्दार्थाचा छल सुरू असावयाचा, किंवा गीतेच्या अभ्यासाची तुझी टिपणें चालू असावयाचीं. आणि लिहिण्यावाचण्याचा तुला कंटाळाच आला तर निदान गीताग्रंथाचें रेशमी पुट्टे साफसूफ करीत तरी तूं बसलेला असावयाचा.'



सकाळीं मी चहा घेत बसलों असतां गीतारावाची स्वारी येऊन माझ्यापुढें अकस्मात् धडकली. मी आश्चर्यानें त्याला म्हणालों, अरे गीताराव, तूं या वेळीं इकडे कसा ?

गीताराव म्हणाला, ' आज तुला आनंदाची बातमी सांगावयाची आहे.'

मी म्हणालों, ' ती कोणती ?'

गीताराव म्हणाला, ' आज १८ वर्षे-नाही-चुकलों-अठरा वर्षे गीतेच्या अभ्यासाचा जो कर्मयोग मी आरंभला होता तो आज सकाळींच संपला.'

मी म्हणालो, ' काय ! गीतेच्या सर्व एकूणएक आवृत्त्या तुझ्या वाचून झाल्या ?'

' होय. सर्व आवृत्त्या मी व्हाल्यूम्समध्यें बांधून ठेविल्या होत्या व त्यांपैकीं अठराव्या व्हाल्यूमचें शेवटचें पान सकाळींच संपलें.'

' बरें, गीतेवरच्या सर्व संस्कृत टीका ?'

' होय.'

' त्यावरील सर्व इंग्रजी ग्रंथ ?'

' होय सर्व.'

' सर्व पद्यात्मक भाषांतरें ?'

' होय. श्लोकबद्ध ज्ञानेश्वरीपासून आर्याबद्ध आर्याटीकेपर्यंत, आणि साकीबद्ध आर्येश्वरी या सुद्धां वाचून झाल्या.'

' बरें, त्यांवरील टीकात्मक व विवेचनात्मक मराठी सगळे ग्रंथ वाचून झाले म्हणतोस ?'

' होय सगळे. एकही ठेवला नाही. प्रो. भानू यांच्या उपसंहारात मी कालपर्यंत गढून गेलो होतो, पण त्याच्या चौथ्या भागाच्या ९२६ व्या म्हणजे शेवटच्या पानावरील शेवटच्या ' शांति ' शब्दापुढील तीन उद्गार चिन्हें, तत्सद्ब्रह्मार्पणपर शब्द व समाप्त हीं अक्षरें १० मिनिटांपूर्वीच वाचलीं. राहता माझा गीतेवरील एकच मराठी ग्रंथ वाचावयाचा राहिला आहे.'

' तो कोणता ?'

' नाही म्हणायला लोकमान्य टिळक यांनी मंडाले येथे तुरुंगांत बसून गीतारहस्यावर जो मराठी ग्रंथ लिहला आहे, तो तेवढा वाचावयाचा राहिला आहे बुवा ! तो तयार झाला असें कळलें असल्यामुळें वाचावयास मिळत नाहीं या विचारानें मला फार तळमळ लागून राहिली आहे. तो ग्रंथ वाचावयाला मिळावा म्हणून टिळक यांचा आचारी होऊन मंडालेस जातां येतें तरी मी गेलों असतों. फार तर काय, पण अशी परवानगी मिळावी म्हणून मी सरकारकडे अर्जही केला होता. पण त्यावर असें उत्तर आलें कीं, " एक टिळकांना

तुरुंगांत ग्रंथ लिहिण्याला परवानगी देण्यांत आली, म्हणून त्यांच्या आचाऱ्यास तो ग्रंथ तेथें वाचण्याची परवानगी देण्यांत येईल अशी अर्जदाराची समजूत असेल तर ती चुकीची आहे. तुरुंगांत टिळकांसारख्या सवलती मिळायला कैद्याच्या अंगीं टिळकांइतकी मान्यता असावी लागते, हें अर्जदार यास माहीत नसावेंसें दिसतें! " असा जबाब आला तेव्हा माझा नाइलाज झाला. अर्थात गीतेवर जगांत आज अस्तित्वांत असलेला एक ग्रंथ माझा वाचावयाचा राहिला हें शल्य माझ्या मनांत सलतेंच आहे. पण उपयोग काय? टिळकांना भेटून यावयाला अजून अवकाश आहे. म्हणून १८ वर्षांच्या गीता-ज्ञान-यज्ञाचें आजच अवभृतस्नान करणार.'

गीतारावाच्या हातांतील निळ्या, तांबड्या व काळ्या तीन रंगांच्या पेन-सिलीकडे बोट दाखवून मी म्हणालो, 'अरे, पण सत्व–रज–तम त्रिगुणसूचक अशा तीन पेनसिली अद्याप तुझ्या हातांत आहेत असें असतांना अवभृतस्नानाची गोष्ट कशी बोलतोस?'

'त्यांनाही आजपासून कायमची विश्रांति मिळणार! या रंगी पेनसिली म्हणजे मुमुक्षु जिज्ञासूला एक मोठीच ईश्वरी देणगी होय. माझ्या कपाटांतील गीता-विषयावरील वाटेल तें पुस्तक तूं उघडून पहा. त्यांत जें जें महत्त्वाचें अगर स्मरणीय स्थळ असेल तेथें तेथें त्या तुला निळ्या पेनसिलींच्या उभ्या तीन, तांबड्या पेनसिलींच्या आडव्या तीन व काळ्या पेनसिलींच्या फिरून उभ्या तीन अशा रेघा हटकून सांपडतील.'

'व: तुझ्या वाचनाचा व विचारसरणीचा फायदा घेणाराला या उभ्या. आडव्या व पुन्हा उभ्या तीन तीन रेघांच्या खुणा म्हणजे उत्कृष्ट सोळा आणे–नाहीं पण चुकलों पावणे सोळा आणे तरी–मदत होईल खरा. शिवाय उरला पैसाभर मदत तूं पुस्तकांतून काढलेलीं काकपदें, वर्तुळें, स्वास्तिकें, बाणशिरें. उद्गार चिन्हें, वगैरे मिळून होईल यांत मला तर शंका वाटत नाहीं.'

गीताराव म्हणाला 'तुझी आपली सारीच थट्टा'

'मी म्हणालो,' थट्टा कशी होईल? अठरा वर्षें आरंभिलेल्या ज्ञानयज्ञाचें अवभृतस्नान करावयाला तूं निघालेला. तुझ्या तोंडावरील या पुण्यकारक तपश्चर्येच्या तेजापुढें कोणाचीही थट्टा वितळून गेलीच पाहिजे. पण गीताराव, मला वाटतें कीं तूं अवभृथ स्नानाला तीर्थकुंडांत अजून कांहीं वेळ उतरूं नकोस.

गीताराव आश्चर्यानें म्हणाला, 'तें कां?'

मी म्हणालों, ' गीतेवरील सर्व ग्रंथ अजून तुझे वाचून झालेच नाहींत. '

' असे ग्रंथ कोणते ? '

' उदाहरणार्थ—मी लिहिण्यास सुरवात केलेला. '

' तुझा ग्रंथ ? ' भलतेच काहीं तरी. गीतेची नेहमीं थट्टा करणारा तूं. तूं गीतेवर ग्रंथ कसचा लिहितोस ! शिवाय तूं लिहिलास तरी त्यांत गीतेची थट्टा असेल म्हणून मला तो मुळीं वाचावयाचाच नाहीं.

' छेः थट्टा काय म्हणून ? शिवाय मला थट्टा करावयाची असेल तरी तिच्यापर्यंत मजल येण्याला अद्यापि फार अवकाश आहे. हलीं मी लिहीत आहें तें सर्व गंभीरपणाचेंच आहे. पण मी लिहिलेले निवडे तुला वाचण्याला एक अयन लागेल. उत्तरायणाचें दक्षिणायन होईल. '

' तें काय म्हणून ? तूं इतकें काय लिहिलेलें असणार ? '

' काय म्हणजे काय ? आजपर्यंत कोणीही लिहिला नाहीं एवढा प्रचंड ग्रंथ गीता विषयावर लिहिण्यास मी प्रारंभ केला आहे. नुसत्या ' श्री ' वर टीका सुरू केली आहे. तिचींच १३५० पानें झालीं ! '

' काय, श्रीकारावरील टीकेचीं साडेतेराशें पानें ? '

' अरे वेड्या, श्रीच, पण ती गीतेची श्री ना ? गीतेची श्री आणि इतर ग्रंथारंभाची श्री एकच वाटते ? '

या प्रश्नाला गीतारसिकास नकारार्थी उत्तर देतां येणें शक्यच नव्हतें. पण माझें म्हणणें त्याला आणखी पटावें म्हणून मी पुढें म्हणालोंः—भगवद्गीता सांगणारी व्यक्ति जर अलौकिक तर ग्रंथाचा ' श्री ' ही अलौकिक-अर्थपूर्णच असली पाहिजे. जर सर्व अक्षरें सारखींच अर्थगर्भ असतील तर त्यांचा उपयोग करणारे लोकही सर्व सारखेच विद्वान ठरतील ! शिवाय ' गूढार्थप्रियाः हि देवाः ' असें वचन प्रसिद्धच आहे. प्रत्यक्ष ईश्वरानें सांगितलेल्या गीतेत, साधें संस्कृत कळणाऱ्या मनुष्यास समजेल असा सोपा व उत्तान अर्थ असता तर मग देवाचें गूढार्थ प्रियत्व तें काय राहिलें ? श्रीरामचंद्र एक-वचनी होता हें सत्य आहे; पण त्याचा अर्थ इतकाच कीं, श्रीरामचंद्र जे शब्द तोंडांतून काढी, ते ' शब्द ' तो नेहमीं कायम ठेवीत असे. म्हणून त्याचा अर्थही एकच व कायमचा असें मानतां येणार नाहीं. श्रीरामचंद्रांनीं सीतेला ' मी तुला कधींही अंतर देणार नाहीं ' असें वचन देऊन तिचें पाणिग्रहण केलें. पण पुढें लंकेहून सोडवून आणल्यावर तिचा जेव्हां त्यांनीं वनांत त्याग केला तेव्हां पुष्कळ अयोध्यावासी

लोकांनीं ' ही गोष्ट रामचंद्रांनीं एकवचनत्वाला विरुद्ध केली ' असा प्रवाद सुरू केला. त्या वेळीं अयोध्येंत दोन तट होते. एक सीता-त्यागाला अनुकूळ, व दुसरा प्रतिकूळ. पैकीं सीता-त्यागास अनुकूळ असणाऱ्या राजप्रभृति नागरिकांचें समाधान सीता-त्याग करून रामांनीं केलेंच. पण त्याच गोष्टीस प्रतिकूळ असणाऱ्या लोकांचें समाधान स्वतः रामचंद्रांनीं न करितां तें फक्त वसिष्ठ-ऋषींवर सोंपविलें. आणि वसिष्ठांनींही " गूढार्थप्रियाहिवै देवाः " या सूत्राच्या आधारानेंच तें समाधान केलें. ' मी तुला अंतर देणार नाहीं ' या रामचंद्राच्या शब्दांचा अर्थ ' मी तुला कधीं दूर ठेवणार नाहीं ' असा लौकिकदृष्ट्या होतो. पण तोच गूढार्थ अलौकिक दृष्ट्या पाहिला तर कांहीं वेगळाच होतो; असें सूचक भाष्य वसिष्ठांनीं सुमंताच्या कानांत सांगतांच सर्वांचें समाधान झालें. व गूढार्थप्रियत्वाची ही मीमांसा लोकांस इतकी पटली कीं, अयोध्येंतील ज्या कित्येक पौरजनांनीं " तुझें पुनः कधींही तोंड पाहणार नाहीं " असें म्हणून आपल्या स्त्रियांना माहेरीं पाठविलें होते, त्यांना त्यांनीं परत घरीं आणून, त्यांचें तोंड येतां जातांही दिसेल अशा नित्य नजरेसमोर ठेवल्या. व इतकेंही करून प्रतिज्ञापालनाचा त्यांचा अभिमान कायम राहिला तो राहिलाच ! "

मी पुढे म्हणालों:—' ब्रह्मसूत्रें गीता वगैरेंतील शब्द जर खरोखर गूढार्थपूर्ण नसते तर त्याच्यावर सर्वस्वीं भिस्त ठेऊन अनेक भाष्यकारांनीं अनेक भाष्यें करून तीं सर्व खरीं असें कसें प्रतिपादिलें असतें ? भाष्यकार सर्व प्रामाणिक मीमांसा करणारे. अर्थात् एकाच शब्दांतून इतके अर्थ निघण्याला ब्रह्मसूत्रे व गीता यांतील शब्दांचें गूढार्थत्वच कारण असलें पाहिजे ! एकाच ब्रह्मसूत्राच्या शब्दांतून जर शुद्ध द्वैत व शुद्ध अद्वैत निघतें व हजारों लोक हे चमत्कार खरे मानतात, तर ब्रह्मसूत्रेंही ' Three in one ' ह्या वर्णनाच्या जादूच्या चित्रासारखींच असलीं पाहिजेत हे उघड आहे. परवाच एका थिऑसफिस्टानें मला असें सप्रमाण सिद्ध करून दाखविलें कीं, श्रीमद्भागवत हा ग्रंथ शब्दशः द्व्यर्थी आहे. मला वाटलें कीं, फक्त कृष्णचरित्राच्या कित्येक अध्यायासंबंधानें हें खरें असेल. कारण गोपींचें लौकिक प्रेम आणि त्यांची अलौकिक भक्ति यांचा मेळ उत्कृष्ट घालण्याकरितां भागवतकार शब्दालंकाराचा थोडासा खेळ खेळले असतील. पण माझ्या थिऑसफिस्ट मित्राला या माझ्या सूचनेचा रागच आला. तो म्हणाला ' असें काय म्हणून होईल ? सर्व भागवतच्या भागवत इथून तिथून द्व्यर्थी आहे.' मी म्हटलें, ' ग्रंथकार असा द्व्यर्थी ग्रंथ काय म्हणून

लिहील ! ' तेव्हां तो म्हणाला, ' एरव्हीं देवांचें गूढार्थप्रियत्व तें काय राहिलें ? ' देवांनीं भाषा बोलावी आणि मध्यस्थ गुरुमुखाच्या मदतीशिवाय ती भक्ताला कळावी, यांत देवाचें देवत्व तें काय राहिलें ! व भक्तिमार्ग इतका सोपा केला तर गुरूंना मग कोण विचारतो ! आणि गुरुमुख हा तर सिद्धीचा राजमार्ग. अर्थात् देवांच्या देवत्वाकरतां नसलें तरी गुरुपरंपरा कायम राहण्याकरितां देवांना आपली भाषा अशी गूढार्थपूर्ण ठेवावी लागते. ' अमरुशतक ' ग्रंथाचे नाहीं का दोन दोन अर्थ होत ! मग मनुष्यकृत ग्रंथाचे जर दोन दोन अर्थ होऊं शकतात, त्यांना जर गूढार्थयोजना इतकी सुलभ आहे, तर देवांना ती अर्थात् अधिक सुलभ असली पाहिजे. आज जर भागवताचे दोन दोन अर्थ होऊं शकतात तर कालांतरानें गुरुपरंपरा जसजशी वाढेल तसतसे त्याच ग्रंथांतून ४-४, ५-५ अर्थही कां निघूं नयेत ? हें सर्व सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं ' श्री ' झाली म्हणून काय ! ती गीतेची प्रस्तावना करणारी श्री असेल तर तिच्यांतही गूढार्थ असलाच पाहिजे. एखादी सुवर्णमय मूर्ति बनवावयाची असेल तर तिचे प्रत्येक उपांग व त्या उपांगाचेंही उपांग कोणी झालें तरी सुवर्णमयच बनवील. मूर्तीचे नेत्र अगर मुख लेवडें सुवर्णाचें करून नखें मात्र शेणकचरांची कोणी करील काय ? गीता जर गूढार्थपूर्ण आहे, तिच्यामध्यें जर सर्व भूतकालाचें-एवढेंच नव्हे तर भविष्यकाळचेंही-ज्ञान सांठविलेलें आहे, व प्रो. भान् यांच्या प्रतिपादनाप्रमाणें गीतेमध्य जर सर्व प्राच्य व प्रतीच्य तत्त्वज्ञानाचा सांगोपांग समावेश होतो, तर गीतेच्या प्रास्ताविक ' श्री ' मध्येंही असेंच कांहीं तरी अलौकिक सत्त्व असलें पाहिजे. या बुद्धीनें मी संशोधन करण्यास प्रारंभ केला आहे. गीतेच्या ' श्री ' चें पठण मी एक हजार एक वेळ केलें आहे. व आणखीही तितकेच वेळां करणार आहे. व तसें केल्यानें आज त्या श्रीच्या प्रतिपादनाच्या ज्या अनेक दृष्टि मला प्राप्त झाल्या आहेत, त्याच आणखीही फैलावतील अशी मला आशा वाटते. हल्लीं मी या श्रीचा भौतिक शास्त्राच्या दृष्टीनें विचार करीत असतों.

गीताराव म्हणाला ' श्रीचा भौतिक अर्थ तो कसा काय ? '

मी म्हणालों, " कसा तो पहा ! प्रत्येक अक्षराला विशिष्ट प्रकारचा ध्वनि असतो, व प्रत्येक ध्वनीचा जड सृष्टीवर कांहीं वेगळाच परिणाम होत असतो. तसें नसतें तर सा रि ग म प ध नि या सप्त स्वरांच्या परिणामांत कांहींच फरक पडला नसता. सप्तस्वरांच्या अंगोपांगाचें एक स्वतंत्र शास्त्रच आहे.

प्रत्येक स्वराचा वर्ण, त्याचा गुरु, त्याची अधिष्ठात्री देवता, त्याची गाण्याची वेळ, तो गाण्याचें आसन, त्याचे ध्यान, त्याची मुद्रा, ओंकाराशीं त्या प्रत्येकाचा संबंध, ओंकाराचें त्या प्रत्येकांत प्रमाण, अशा शेंकडो गोष्टी विचार करण्यासारख्या असतात. विषयगत आणि विपर्यीगत असेही या प्रत्येक स्वरांत भेद आहेत. उदाहरणार्थ, मुलानें उच्चारिलेल्या सारिगमचा परिणाम तरुणानें उच्चारिलेल्या सरिगम सारखा नाहीं. तसेच स्त्रीनें म्हटलेलें सारिगम वेगळें व पुरुषानें म्हटलेलें वेगळें! पुन्हां, पुरुषानें स्त्रीस उद्देशून म्हटलेलें सरिगम, आणि तेंच पुरुषानें पुरुषाला व स्त्रीनें स्त्रीला उद्देशून म्हटलेलें सारिगम यांच्या परिणामांत पुष्कळच फरक आहे. पुरुषांना स्त्रियांचें गाणें आवडतें तें याचमुळें. ध्यान, आसन वगैरेंचीही गोष्ट अशीच आहे. मांडी मोडून वीरासनावर म्हटलेलें गाणें व वारकरी पीठावर उभे राहून म्हटलेलें गाणें ही दोन्हीं परिणाम दृष्टीनें वेगळीं. स्त्रियांनीं हातांत वीणा घेऊन केलेलें गायन व वीणा न घेतां म्हटलेलें गायन यांत फरक नाहीं असें कोणीही तज्ज्ञ म्हणणार नाहीं. या सर्व उपमानपरंपरेवरून हें अगदीं उघड होत नाहीं काय, कीं काव्य-नाटकांस प्रारंभ करतांना म्हटलेली किंवा लिहिलेली श्री आणि गीताशास्त्रासारख्या आध्यात्मिक ग्रंथाच्या प्रारंभीं लिहिलेली किंवा म्हटलेली श्री यांचें स्वरूप अर्थात् वेगळें असलें पाहिजे."

मी पुढें म्हणालों:—"एका जर्मन प्रोफेसरानें असा नुकताच शोध लाविला आहे कीं, ज्या प्रकारची भावना मनांत धरून मनुष्य अक्षर उच्चारतो किंवा लिहितो त्या भावनेनुरूप उच्चाराच्या आंदोलनांची संख्या बदलते, आणि त्या उच्चाराच्या लेखाच्या रेखारचनेंत फरक पडतो. मी असा तर्क केला आहे कीं, नुसतें 'दे' हें साधें अक्षर घेतलें तर त्या उच्चाराच्या आंदोलनानें जें शब्दचित्र वायुपटावर उमटेल त्याचा आकार 'दे' या क्रियापदाच्या निरनिराळ्या कर्माप्रमाणें बहुधा निरनिराळेंच असेल, म्हणजे 'बटलर' ब्रँडीचा ग्लास दे' असें म्हणणाऱ्याच्या 'दे' चें शब्दचित्र दारूच्या ग्लासासारखेंच उमटेल. दारूच्या ग्लासाऐवजीं त्यानें मांसाचा तुकडा मागितला, तर ज्या पशूच्या किंवा पक्षाच्या मांसाचा तुकडा तो खाऊं इच्छितो, त्या पशूचें चित्र किंबहुना फोटोग्राफ मांसभक्षकाच्या 'दे' पासून निघाला पाहिजे. मुलानें आईस आंबा दे म्हटलें, तर दे पासून आंब्याचें चित्र उठेल. असेंच इतर सर्व प्रकारासंबंधानें समजण्याचें आहे. या सर्व विचाराला शब्दब्रह्माचा किंवा अक्षरब्रह्माचा भौतिक विचार

म्हणतात व तो मी हल्लीं सुरू केला आहे. प्रो. जगदीशचंद्र बोस, लॉर्ड केल्विन् वगैरे शास्त्रज्ञांच्या ग्रंथांचे सहाय्य मला या कामीं पुष्कळ झालें आहे. गीतेच्या प्रारंभीं असलेल्या धीचे स्वरूप व अर्थ जो जसा पाहील तसा तो त्याला दिसेल. म्हणून म्हणतो कीं गीताराव, गीताध्ययनाच्या यज्ञाचें अवभृत स्नान करण्याला तूं अद्यापि विश्रांति-कुंडांत उतरूं नकोस."

बिचाऱ्या गीतारावावर माझ्या या युक्तिवादाचा विशेष परिणाम झाला. गंभीरपणाने व श्रद्धायुक्त मनानें तो मान हालवून म्हणाला, 'पहा गीताशास्त्र अनंत आहे म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. तुझे हें सगळें विवेचन ऐकून मला बरेंही वाटलें व वाईटही वाटलें. बरें अशा करितां कीं, ज्या भाविकपणानें मी गीताशास्त्र वाचीत होतों तो दृढतर झाला, पण गीताशास्त्राचे सांगोपांग अध्ययन माझ्या या जन्मांत संपवीन असा जो मी निश्चय केला होता तो फुकट जाणार म्हणून निराशा वाटते.'

मी म्हणालों, 'एका जन्मीं पुरता विचार करून आत्म्याचे चरित्राची परिसमाप्ति एका जन्मांत होते असा क्षणभर जरी तुझे मनांत विचार आला असला, तरी आश्चर्य. कारण जें आत्म्याचें चरित्र गीतेंत सांगितलें आहे तें तुला कळलें नाहीं, अर्थात् तुझा गीतेचा अभ्यास अपुराच झाला असें म्हणावें लागेल.'

गीतारावाला असा मोह खरोखरच क्षणभर पडला होता. रिव्हरसिंग स्टेशनावर गाडीचें तोंड उलट्या दिशेस झालें म्हणजे पुण्याहून मुंबईस जावयाचें सोडून फिरून आपण पुण्यासच परत जातों कीं काय अशी जी. आय. पी. च्या प्रवाशाला क्षणभर भ्रांति पडते; त्याप्रमाणें गीताशास्त्राच्या अध्ययनाच्या शेवटास आपण आलों अशी कल्पना आपण करीत असतां यानें फिरून आपणास मूळ पदावर नेऊन सोडलें. अशा विचारानें त्याचा चेहरा क्षणभर उदास झाला. कर्मोपदेश करणारी गीता वाचून जर ही निराशा टिकली तर आश्चर्यच म्हणावयाचें! पण तें आश्चर्य घडून आलेंच नाहीं. क्षणभर आलेला मोह झाडून टाकून 'करिष्ये वचनं तव' या गीता शब्दांनीं मला उत्तर देऊन, गीतारावानें माझ्या टेबलावरील चाकू घेतला व फिरून सुबक आपल्या तीन पेनसिली खूप तासून शास्त्राप्रमाणें त्यांचीं टोकें तीक्ष्ण केलीं. तेव्हां मीं मनांत म्हटलें, 'हा मात्र गीतेचा भक्त खरा.' युक्तायुक्तता न पाहतां केवळ सहज असणाऱ्या कर्माप्रमाणें हा गीताभक्त फिरून गीतावाचनास सिद्ध झाला. अर्थात् याला पुढें मुक्ति मिळाल्याशिवाय राहणार नाहींच. या वेळीं जर एखादा दिव्यदृष्टि

आलेला थिऑसफिस्ट येथें असता तर, त्यास गीतोपदेशाच्या अखेर हातांत धनुष्यबाण घेऊन सज्ज झालेल्या अर्जुनाच्या चेहऱ्याभोंवतीं जशा प्रकारचे प्रकाश-वर्तुळ पूर्वी दिसलें असेल तसेंच प्रकाश-वर्तुळ गीतागायकाच्या चेहऱ्याभोंवतीं दिसलें असतें यांत मला तर शंका वाटत नाहीं.

भाविकपणा असावा तर असाच असावा.

---



## लेखांक नं. २.

# सामाजिक चालीरीतींचा फरक.

लेखक—आत्मानंद.




यमाप्रमाणे बाळंभटजी फराळ करून परवां रात्रीं येऊन माझ्या अंगणांतील बैठकीवर जठा मारून बसले. विडा खाऊन झाल्यावर तोंडांत तमाखूची चिमूट टाकतां टाकतां त्यांना कसली आठवण झाली कोणास ठाऊक. पण ते खुदकन् ऐकूं येण्यासारखें मोठ्यानें हंसले.

मी म्हणालो, " कां भटजी, तुम्हांला हंसायलासें आलें ? "

त्यावर तोंडांतील तंबाखूचा चेंदामेंदा करून भटजी म्हणाले, " हो, बुवा, हंसायला आलें खरें. पण मीं आज पाहिला तो चमत्कार तुम्हीं पाहिला असतात म्हणजे तुम्हांलाही हंसायला आलें असतें अशी माझी खात्री आहे. "

मी म्हणालो, " हंसायला येण्यासारखे चमत्कार आपण सर्वच केव्हां केव्हां पाहतो खरें; पण तुम्हीं पाहिला तो चमत्कार कसला तो तर सांगाल ? "

भटजी म्हणाले,—" आज तिसरे प्रहरीं मी देवदर्शनाला निघालो. तेव्हां लकडीपुलाकडे टांग्यावर टांगे व गाड्यांवर गाड्या जात होत्या.—"

इतकें म्हणून बोलण्याच्या पुढील तयारीकरितां त्यांनीं तोंडभर जीभ फिरवून पानसुपारीचे जे कण चिरडण्याच्या भीतीनें कानाकोपऱ्यांत लपून दडून बसले होते त्यांना खेचून बाहेर काढलें.

मीं म्हटलें, " हाच का चमत्कार ? हा चमत्कार तर बहुधा रोजच घडतो. "

भटजी म्हणाले, " तसे नव्हे हो. सर्व ऐकून तर घ्याल ! टांगे, गाड्या पुष्कळशा जात होत्या यांत कांहीं विशेष नाहीं. पण त्यांत एक उघडी गाडी जात होती त्यांतल्या माणसांकडे पाहून मला तेव्हां हसूं आलें, आणि आतांही त्याची आठवण झाली म्हणून फिरून हसूं आलें. "

मी म्हणालों, " अजून चमत्कार तो पुढेंच असला पाहिजे. कारण उघड्या गाडींत मनुष्यें बसलीं होतीं यांत तें हसूं येण्यासारखें काय आहे ?

भटजी म्हणाले, " तुम्ही तर बुवा फारच उतावळे. अहो, उघड्या गाडींत कोण होते, माहीत आहे का ? आमचे ते खुशालराव वीभाटे आणि त्यांच्या पत्नी म्हाळसाबाई. पण तुम्ही म्हणाल, या नवराबायकोंना तुम्हीं पूर्वी पाहिलें नव्हतें का ? हो पाहिलें होतें, त्यांच्या मुलाच्या मुंजीच्या वेळीं पुण्याहवाचनाला हीं नवराबायकों अशींच शेजारीं शेजारीं बसलेलीं मीं पाहिलीं होतीं. आणि याज्ञिक चालवावयाला जवळच मी हातावर बसलों होतों. पण त्यावेळचें तें रूप व तो पोषाख कोणीकडे ! आणि आज गाडींत पाहिलें तें रूप व तो पोषाख कोणीकडे ! घरीं पाहिलें तों कपाळ भस्मानें भरलेलें, शेंडींत रुद्राक्ष घातलेला, ओंगळ पितांबर मधून मधून सुटतो आहे, आणि प्रायश्चित्तार्थ पंचगव्याचीं आचमनावर आचमनें घेत आहेत असें होतें नवऱ्याचें स्वरूप. आणि बायकोकडे पहावें तों काय सांगूं तुमच्या अंबाबाईचा अवतार ! "

मीं म्हटलें, " तो कसा काय तें सांगा तर खरें. "

भटजी म्हणाले, " अहो त्यांत काय सांगायचें ? कपाळभर कुंकवाचा मळवट, नाकांत नथेचें मुंकलें, पिशव्यासारख्या अस्तन्यांची कोपरभर चोळी, झोळण्यासारखें लोंबतें १८ हात लुगडें, आणि हातभरून कोपरापर्यंत बांगड्या. "

मी म्हणालों, " हं आतां थोडें थोडें माझ्या लक्षांत आलें खरें; उघड्या गाडींतून हें जोडपें जर आज लकडीपुलाकडे जातांना पाहिलें असलें, तर असले पोशाख कांहीं त्यांच्या अंगावर नसतील. आजचे पोषाख कांहीं निराळेच, म्हणजे तुमच्या डोळ्याला कधीं न दिसणारे असतील म्हणून तुम्हाला हसूं आलें तें ठीकच. "

भटजी म्हणाले, " पण हें तुम्हाला कसें कळलें ? "

मी म्हणालों, " मला कर्णपिशाचानें सांगितलें. त्याचें तुम्हाला काय ? मी न बघतांना त्यांच्या पोषाखाचें वर्णन करूं का ? भटजी, तुम्हांला माहीत नाहीं. आज गणेशखिंडींत सरकारी बंगल्यांत गार्डन पार्टी होती. म्हणून हें जोडपें तिकडे जात असावें, तेव्हां अशा वेळचा त्यांचा पोषाख कसा असेल याची कल्पना तें न पाहतांही होते. "

भटजी म्हणाले, " होते तर करा पाहूं ! "

मी म्हणालों, " ऐका. खुशालरावांनीं अगदीं ताजी ताजी श्मश्रू केलेली होती. मिशा कोरलेल्या होत्या. अंगांत काळा कोट, पायांत काळी विजार, व करकरीत काळा बूट. डोक्याला झुळझुळ्यांची रेशमी पगडी. अंगावर खुबट जरीकांठी धोतराची घडी. गळ्यांत पांढऱ्या कडकडीत सदऱ्यावर रेशमी पट्टीचा गळफांस आणि कपाळावर गूळ घालून तुकतुकीत केलेल्या तांबड्या गंधाची टिकली. कां, आहे बरोबर? पण तुम्हाला जें हसूं आलें तें यांच्या पोषाखानें नसेल तर तुमच्या अंबाबाईची सजपरी बनलेली पाहून!"

मला उत्तर न देतां भटजी नुसते खो, खो, खो, हंसत होते.

मी पुढें म्हणालों, " म्हाळसाबाईचा पोषाख कसा होता तें मी सांगतों. चापून चोपून नसलेलें जरीकांठी पातळ, अंगावर बुट्टेदार शाल, अगदीं ताजी ताजी वेणी घालून वेणींत खोवलेलीं ताजीं फुलें, सर्व आंगभर जेथें जेथें म्हणून घालतां येतील तेथें तेथें दागिने, डोक्यांत रेखीव भांग, कपाळावर दिसे न दिसे इतकी बारीक कुंकवाची टिकली. हातांत रेशमी रुमालाची घडी. पण हसण्याचें याहून मुख्य कारण म्हणजे पायांत पायमोजे आणि बूट. कां बोला? वर्णन बरोबर आहे कीं नाहीं?"

हें ऐकतांच भटजी पुन्हा पोट धरून खो खो हसायला लागले, आणि म्हणाले, " पंत, तुम्हीं तर बुवा खूप केलींत. मीं डोळ्यांनें पाहिलें त्यापेक्षां तुम्हीं न पाहतांच अधिक पाहिलें. वर्णन अगदीं तंतोतंत बरोबर झालें. पण काय हो, पोषाखाच्या ऐटीसारखी त्यांच्या मनाची कांहीं ऐट दिसत नव्हती. दोघेंही अशीं गुडकून बसलीं होतीं कीं, सगळ्या आंगभर त्यांना कोणी कांटेलगामच घातले होते कीं, काय. हात हलत नाहींत, पाय हलत नाहींत, जशीं काय रेखीव चित्रें. पण इतकेंही करून अंगांतला पिळपिळीतपणा तर तसाच. चेहेरे तर काय, एखाद्यानें त्यांस मारावयास काढल्याप्रमाणें पडके व उदास."

मी म्हणालों, " भटजी, हें तुमचें वर्णन मात्र चुकलें. अहो, चेहेऱ्यावर उदासपणा कसा वाटेल? अशा सन्मानाचा प्रसंग वर्षांतून एक वेळ येतो. खरा-खर मनांतून अशा वेळीं खूप आनंदच असतो, पण अपरिचित पोषाख मुद्दाम एक दिवस करावयाचा, त्यानें गांगरल्यासारखें वाटतें. आणि गणेशखिंडींत गेल्यावर साहेबलोकांच्या डोळ्यांपुढें फिरतांना कांहीं चुकेल घसरेल कीं काय, या भीतीनें त्यांना अर्धमेलें झाल्यासारखें वाटत असेल, आणि म्हणून तोंडावर ही गंभीरपणाची मुद्रा इतकेंच काय तें."

भटजी म्हणाले, " पण गणेशखिंडींत जायचें तर जावें, पण असला पोषाख कशास करावा ? "

मी म्हणालो, " आर्धा जावेंच कशाला ? " असें हवें तर म्हणा. पण ज्याला साहिबलोकांत जावयाचें तर असल्या पोषाखाशिवाय सुटका नाहीं. त्याला तुम्ही व मी काय करणार ? व हें जोडपे तरी काय करणार ? जेथें जायचें तेथली रीतभात पाळलीच पाहिजे.

भटजी म्हणाले, " म्हणतां काय ! साहेब लोक झाले तरी माणसेंच कीं नाहीं ? माणसामाणसांत इतकी वेगळी रीतभात कोठून येणार ! "

मी म्हणालों, " अहो, माणूस तेवढे येथून तेथून सारखेच खरें, पण फरक पडतो तो सर्व रीतीभातीमुळेच. तुम्ही आम्ही वैदिक व गृहस्थ एकाच समाजांतले कीं नाहीं ? तुमची आमची तरी रीतभात एक कोठे आहे ? तुमचें वळण वेगळें, आमचें वेगळें. मग साहिबलोक तर काय बोलून चालून परदेशांतले. तेव्हां त्यांची व आमची रीतभात वेगळी असावी यांत नवल नाहीं. "

भटजी म्हणाले, " तुम्ही काय म्हणतां याची आपणास कल्पनाच होत नाहीं. रीतभात वेगळी झाली तरी किती वेगळी असणार ? साहिबलोकांत आलें तरी आम्हांस लोकविलक्षण वाटेल असें काय असतें तें सांगा तर पाहूं ! "

मी म्हणालों, " सांगेन, पण थोडक्यांत सांगतां येणार नाहीं. जरासें लांबट लाऊन सांगावें लागेल. पण मग तें तुम्हाला चांगलें पटेल. ऐका तर सांगतो. पण साहिबलोकांची नांवें न घालतां इकडचीं नावें घालतो आणि तिकडल्या रीतिभातीचें वर्णन करतों, म्हणजे तुम्हाला बरोबर लक्षांत येईल. "

भटजी म्हणाले, " सांगाच तर ऐकूं द्या मला कसें काय तें ! "

मी म्हणालों, " इकडचीं नावें घालून मी बोलणार आहे संभाळा "—

× × × × ×

रामचंद्रराव आपल्या अभ्यासाच्या खोलींत काम करीत बसले होते. त्यांची मुलगी वेणू बंगल्याच्या व्हरांड्याच्या लोडीं खुर्चीवर हातांत विणकाम घेऊन बसली होती व तिच्या पायाशीं कुत्रें खेळत होतें. "

बाळंभटजी मधेंच म्हणाले, " काय हो गरती स्त्रियांची गोष्ट सांगता, कीं, कोणाची ? बाईच्या पायाशीं कुत्रें खेळतें याचा अर्थ काय ? आणि असा विटाळ चालतो ? "

मी म्हणालो, " भटजी, आतां मधें कां बोलतां ? अगदीं संभावितांतल्या संभावित घराण्यांतला मी प्रसंग सांगतो. तुम्हाला काय टीका करावयाची ती मनांत करा. "

मी पुढें म्हणालों. " इतक्यांत माळ्यानें वेणूच्या हातांत पुष्पांचा गुच्छ आणून दिला. "

भटजी म्हणाले. " हां. आणून दूर ठेवला असेल. "

मी म्हणालो. " नाहीं हो, अगदीं हातांत. पुढें ऐका. इतक्यांत बंगल्याचा रामोशी—तो जातीनें महार होता—आला व रुपेरी तबकांत एक कागदाची चिठ्ठी असलेली वेणूच्या पुढें त्यानें केली." भटजी म्हणाले " आणि तिनें ती चिठ्ठी महाराला शिवून घेतली ? " मी म्हणालों:—तिनें ती घेऊन वाचली व सितारामपंत यांस आंत घेऊन येण्यास सांगितलें. ते आंत येतांच पगडी हातांत काढून धेऊन म्हणाले, ' सुप्रभात ' !

भटजी मध्येंच पुटपुटले,—" अशी पगडी हातांत कोणी काढून घेतो वाटतें ?"

" तेव्हां वेणू खुर्चीवरून उठली व त्या दोघांनीं आपले उजवे हात एकमेकांच्या हातांत घालून हालविले."

" भटजी म्हणाले, "—ऊं: हें काय ? पुरुषांना हातांत हात घालायचे ! "

वेणू म्हणाली. " बाबा कामांत आहेत तुम्ही येथें क्षणभर बसा. " सितारामपंत जवळच खुर्चीवर बसले. वेणू म्हणाली, " तुम्ही चार वर्षांपूर्वी एकदां आमच्या घरीं आला होतां ना ? " सितारामपंत म्हणाले, " होय, त्यानंतर फिरून आज आलों. " इतक्यांत वेणूचा कुत्रा सितारामपंतांच्या पायांशीं घोंटाळूं लागला. त्याला वेणूनें शीळ घालून बोलावून हातानें उचलून आपल्या मांडीवर बसविलें. सितारामपंत म्हणाले, " तुमच्या नवऱ्याची व माझी कुबांत गांठ पडते. " वेणू म्हणाली. " माझा नवरा तुमच्याविषयीं मजजवळ केव्हां केव्हां बोलतो खरा. " भटजी म्हणाले. " बायका अशा माझा नवरा म्हणतात वाटतें ! "

तेव्हां इतक्यांत वेणूचा बाप रामचंद्रपंत बाहेर आला. तो व सितारामपंत यांनीं एकमेकांचे हात हालवून वेणूसह सर्व मंडळी दिवाणखान्यांत गेली व शेजारी शेजारी खुर्च्यांवर बसली. रामचंद्रपंत म्हणाले, ' वेणू, सितारामपंतांना तुझें गाणें ऐकावयाचें आहे. परवां मी तुला बसवून दिलेलें पद यांना म्हणून दाखव पाहूं ? ' तेव्हां वेणू बाजाच्या पेटीवर बसून वाजवून गाऊं लागली व सिताराम-

पंत हातांत गाण्याचें पुस्तक घेऊन तिच्या शेजारीं उभे राहिले. इतक्यांत आंतून फराळाची वर्दी आली. तेव्हां रामचंद्रपंत " मी पुढें होतों " असें म्हणून गेले, व सितारामपंतांनीं वेणूचा हात आपल्या काखेंत धरून तीं दोघेंही आंतल्या दालनात जाऊन मोठ्या टेबलासमोर खुर्चीवर जाऊन फराळास बसली आचारी बशांतून पदार्थ आणून देत होता व वेणू त्यातील जिन्नस उचलून आपल्या व सितारामपंताच्या पानांत घाली. जेवण झाल्यावर टेबलावर ग्लासातील पाण्यांत हात धुवून हातरुमालानें पुसून मंडळी उठून बाहेर गेली. रामचंद्रराव म्हणाले, " सितारामपंत आमच्या येथे आजच्या दिवस रहाण्यासाठ आले आहेत, तेव्हां त्यांना कंटाळा येणार नाहीं, करमणूक वाटेल हें पाहणें तुझें काम आहे. "

भटजी म्हणाले, " ठीक. पाहुण्या पुरुषाची करमणूक घरच्या बायकांनी करायची ! खासा रोजगार ! "

वेणू म्हणाली, " होय बाबा. " रामचंद्रपंत आपले काम करण्यास निघून गेले. वेणू सितारामपंतास म्हणाली, " चला आपण बागेंत जाऊं. " आम्ही नवीन लावलेलीं झाडें तुम्हाला दाखवितें. मग त्या दोघांनीं बागेंत अर्धा तास घालविला. व परत दिवाणखान्यांत येतात तोंच वेणूचा नवरा सदाशिवराव व वेणूची आई दोघे गाडींतून बाजारांत गेलीं होतीं तीं परत आलीं. वेणू नवऱ्यास म्हणाली. ' सदाशिव '—

भटजी म्हणाले, " ही नवऱ्याला नावानें हांक मारून बोलली वाटते ! " मी स्वस्थपणें म्हणालों, " होय, स्वस्थपणें ऐका. "

वेणू म्हणाली, " हा पहा तुझा मित्र तुझीच वाट पाहत आहे. मी त्यास बागेंत अर्धा तास पर्यंत फुलझाडें दाखविलीं म्हणून त्याची करमणूक तरी झाली. " सदाशिवराव म्हणाला, " तूं ठीक केलेंस. आम्हाला बाहेरून येण्यास वेळ लागला नसता, " पण सासूबाईंना घेऊन बनू चांभाराच्या दुकानीं नवीन जोडा सांगण्यास गेलों होतों, म्हणून जरा उशीर लागला. तितक्यांत एक भटारीण चांगलीशीं अंडीं घेऊन विकावयास बसली होती, तींही थोडीं घेतलीं. आणि कोंबडीचा रसा उत्तम करणाऱ्या आचाऱ्याचें दुकानीं जाऊन आम्हांस थोडासा पाठवून दे म्हणून सांगण्यास थोडा बाजूस वळलों होतों.

बाळंभटजी उतावळेपणानें नाकास पदर लावून म्हणाले, " उं: अब्रह्मण्यं, हें काय ? "

मी म्हणालों, "व: भटजी तुमच्या शब्दाची तुम्हाला घाण आली वाटते. अहो, ह्या गोष्टी मी बनावट सांगतों हें विसरलात वाटतें ?"

भटजी म्हणाले, "बनावट गोष्ट झाली म्हणून काय झालें! मघांपासून तुम्ही सांगता तरी काय काय ? मुलीच्या मांडीवर कुत्रे खेळतें काय! ती परक्या पुरुषाच्या हातांत हात देते काय? बागेंत आर्धा तास तो दोघें फुलझाडे पाहतात काय! नवऱ्याला अंगेजी म्हणते काय! सासू व जांवई मिळून चांभाराकडे जातात काय? व येतांना अंडी आणतात काय! हा काय रोग झाला!"

मी म्हणालो, "अगदीं बरोबर. रोगच. पूर्ण संभावित घराण्यांतल्या नित्यक्रमांतील लहानसा भाग सांगतों आहे. तुमच्या परिचयाची नांवें घातलीं म्हणून घाबरूं नका. हें पूर्वीच तुम्हाला सांगितलें आहे." मी पुढें आणखी म्हणालो. "ऐका. संध्याकाळीं वेणू व तिचा नवरा आपल्या घरीं परत जाण्यास निघाली. तेव्हां रामचंद्रपंतांनीं वेणूच्या कपाळाचें चुंबन घेतलें. आणि सर्वांनीं एकमेकांच्या हातांत हात घालून हात हालविले."

इतकें बोलून मी म्हणालों, "भटजी, तुम्हास दुसरा एक प्रसंग सांगतों."

गंभीररावाच्या घरीं नुकताच गांवच्या पाहुणमंडळींना जेवण व नाच देण्यांत आला. त्याचें वर्णन दुसरे दिवसाच्या वर्तमानपत्रांत खालीलप्रमाणें आलें होतें.

"बरोबर ९॥ वाजतां पाहुणे मंडळी जमूं लागली. गंभीरराव व त्यांची बायको चंपाबाई पडवींत उभीं राहून मंडळींचें स्वागत करीत होतीं. गंभीररावांनीं कोटपाटलोणांसह सर्व पोषाक केला होता. पण ते बोडकेच उभे होते. त्यांनीं कोटाच्या गुंड्या न घातल्यामुळे त्याच्या खडखडीत सदऱ्याचा सर्व भाग दिसत होता. चंपाबाईंनीं रेशमी पायघोळ झगा घातला होता. मात्र निम्म्या दंडापासून सगळे हात व छातीचा निम्मा भाग हे उघडे होते. त्यांनी अर्धचंद्राकृति चोळी घातली होती व पाठीच्या बाजूलाही अर्धचंद्रच होता."

भटजी म्हणाले, "भलतेच! असें कां कोठें असतें? चोळीचा अर्धचंद्र म्हणजे काय?"

मी म्हणालों, "सांगतों यांत एक अक्षरही खोटें नाहीं. मुकाट्यानें ऐकून घ्या."

इतक्या वेळांत सर्व पाहुणे मंडळी जोड्या जोड्यानें येऊन दाखल झाली. घरा... च्या दिवाणखान्यांत रोषणाईचा लखलखाट केला होता. जमीन

लाकडी असून तुळतुळीत केली होती. पाहुण्या स्त्रिया फारच सुंदर दिसत होत्या. सौ. यमुनाबाई या उत्तम चंद्रकळा नेसल्या असून तिजवर मोती गुंफले होते. अंगांत चोळी निळी जरीकांठी होती. सौ. चिमाबाई या अस्मानी रंगाचा बुट्टेदार शालू नेसल्या होत्या. व त्यांनीं अस्मानी रंगाचीच चोळी घातली होती. सौ. ठमाबाई यांचाही पोषाख फार उंची असून या तरुण स्त्रीचा चेहरा फार सतेज दिसत होता."

भटजी म्हणाले, "बस करा हें तुमचें वर्णन. हा काय वर्तमानपत्राच्या बातमीदाराचा संभावितपणा! खाजगी घरांत जाऊन संभावित बायकांना तरुण सुंदरी म्हणणें; त्यांची लुगडीं चोळ्या बारीक नजरेनें न्हाळून, त्यांचे रंग सांगणें ही काय रीत झाली! आपले इकडे सुद्धां अक्षतीचे वेळीं किंवा महालक्ष्मीच्या प्रसंगीं स्त्रीपुरुष एकत्र दिसतात, म्हणून आपल्यांतले कोणी असे बोलेल काय अगर असें वर्णन करील काय? माझ्या समोर असला कोणी चावटपणा करूं द्या कीं मी मग त्याच्या तोंडांतच भडकावीन."

मी म्हणालों, "भटजी, मी खरेंच सांगतों यांत चावटपणा नाहीं. कोणत्याही आफतींच्या वगैरे प्रसंगाचें वगैरे असेंच वर्णन येतें." पण पुढें ऐका. "दहाचा ठोका पडल्याबरोबर पाहुण्यांपैकीं विश्वासराव हे पुढें येऊन त्यांनीं गणपतरावाचें कुटुंब चंपाबाई यांना आपल्याबरोबर नाचण्यास येण्याची विनंति केली. व ती मान्य करून चंपाबाईंनीं आपला हात विश्वासरावाचे हातीं दिला."

भटजी दांत ओंठ खाऊन हात झाडीत म्हणाले, "आणि तो दळ्या नवरा होताना जवळ?"

मी म्हणालों, "अहो होय, होता. पण त्यानें स्वतः काय केलें हें सांगणारच आहें. विश्वासराव व चंपाबाई नाचत नाचत घिरट्या घालूं लागले. इतक्यांत गंभीरराव यांनीं विश्वासरावांची पत्नी सौ. सुंदराबाई यांसहा आपल्याबरोबर नाचण्यास येण्याची विनंति केली. व पहिल्या जोडप्याप्रमाणें हेंही जोडपें नाचूं लागलें. व त्या नंतर क्रमानें पाहुण्या मंडळीपैकीं प्रत्येक पुरुषानें एकेका स्त्रीस पसंत करून जोड्याजोड्यांनीं सर्वजण नाचले. मात्र एक गोष्ट लक्षांत ठेवा कीं, नवरा आणि त्याचीच बायको अशा जोड्यानें कोणीच नाचले नाहींत."

भटजी म्हणाले, “ कशाला नाचतील ! परपुरुषाबरोबर नाचण्याची बायकांनी घेतली, मग घरचें दंपत्य कसें जुळणार ? ”

मी म्हणालो, “ रागाऊं नका, तुमच्या दृष्टीनें सगळा भ्रष्टाकार झाल हें मी जाणतों. पण फिरून सांगतों कीं संभावित, नीतिमान् व धर्मभीरु अशा युरोपियन व्यक्तींचीच मी चालरीत तुम्हाला सांगतों आहे. यांत अतिशयोक्ति किंवा थट्टा मुळींच नाहीं. ” अहो, हा फक्त सामाजिक चालीरीतींचा फरक !

---

## लेखांक नं. ३

# माझी आगगाडी कशी चुकली !

[ लेखक—आत्मानंद ]



मच्यामध्यें आग्रहाची एक चाल मोठी वाईट आहे. पाहुणचार हा गुण खरा पण फाजील पाहुणचार हा अवगुण असून तो संतोषापेक्षां असंतोषालाच अधिक वेळां कारण होतो. पाहुणचार याचा अर्थ पाहुण्याचा संतोष. पण जी गोष्ट पाहुण्याला नको किंवा जी गोष्ट त्याला गैरसोयीची असेल ती त्याचेवर लादणें, हा मार्ग पाहुणचाराच्या अगदीं उलट्या दिशेचा होय. पण दुर्दैवानें आदरातिथ्याच्या भरांत आम्ही ही साधी गोष्ट विसरून जातों. त्याचा परिणाम कित्येक वेळां खरोखर असा होतो कीं, पाहुणा घरून जातांना गोड तोंडानें व धन्यवाद गात जावा तो आवट तोंड करून, व प्रत्यक्ष शिव्याशाप देत नसला तरी, मनांतल्या मनांत निंदा करीत जातो.

कांहीं दिवसांपूर्वी लोणावळे स्टेशनापासून सुमारें चार मैलावर असलेल्या एका गांवीं कांहीं कामाकरतां जाण्याचा मला प्रसंग आला होता. ज्याच्या-कडे मी गेलों ते गृहस्थ माझ्या वडिलांच्या जुन्या ओळखीचे असून त्यांचा व आमचा विशेष घरोबा होता. त्यांच्या गांवीं पुष्कळ वर्षांत न गेल्यामुळें या माझ्या भेटीला एक प्रकारचें महत्व होतें, व मी तेथें गेल्यावर माझा चांगला पाहुणचार होणार अशी माझी अपेक्षा होती. पण दुर्दैवानें तेथें चार दिवस स्वस्थ राहून पाहुणचार झोडण्याइतका मला वेळ नव्हता. मला सोमवारीं सकाळच्या मेलनें मुंबईस जावयाचें असून रविवारची रात्र तेवढी या गांवीं मला काढतां येण्यासारखी होती. सकाळच्याच मेलनें मी पुढें जाण्याचें कारण असें कीं, त्या दिवशीं दोन प्रहरीं माझा एक स्नेही एका फ्रेंच बोटीनें विलायतेस जाणार होता व तो जातांना, त्याची माझी गांठ पडण्यावर त्याचें व माझें शेंकडों रुपयांचें नफा-नुकसान अवलंबून होतें. त्या काळीं पुण्याची मेल सकाळीं लोणावळ्याहून सव्वा नऊ वाजतां सुटत असे. तिनें मी गेलों तर बोट

मुटण्याच्या आधीं १॥ तास मी मुंबईस पोहोंचावयाचा. आणि ती गाडी चुकली तर पुढें चार तास गाडी नाहीं व बोटीनें जाणाऱ्या मित्रास भेटणें मुळींच शक्य नाहीं अशी स्थिती होती. या गांवीं लोणावळ्याहून जाण्या येण्याचा रस्ता भातखाचरांतून असून त्यावरून गाडी जाई, पण मोठ्या कष्टानें. आणि बैल चांगले व हाकणारा चांगला असें असलें तर या चार मैलांच्या प्रवासास कमींत कमी १। तास लागेल असें होतें.

असो. सदर गांवीं मी रविवारीं रात्रा पोंचलों. रात्रीचा पाहुणचार तर यथास्थित झालाच. पण रात्रीची गोष्ट आपल्या हातची, तास अर्धातास जाग्रण करतें परतें इतकेंच. असें समजून मी तो पाहुणचार आमचे यजमान दादासाहेब यांच्या इच्छेप्रमाणे सर्व घेतला. अखेर गाण्याबजावण्याशिवाय सर्व पाहुणचार फुकट. अशी कल्पना येऊन दादासाहेबांनीं गांवांत चांगला गाणारा असा मानला गेलेला गृहस्थ होता त्याला बोलावण्याचा घाट घातला.

मी म्हणालों, " उगाच तसदी कशाला घेतां ? १०–१०॥ वाजण्याचा सुमार आहे व जेवणही यथेच्छ झाल्यामुळें मला झोंप येत आहे. शिवाय सकाळींही मला लवकर उठलेंच पाहिजे. म्हणून मला वाटतें आतां झोंपीं गेललें बरें ! "

यावर दादासाहेब म्हणतात, " छे: असें कुठें झालें आहे की काय ! तुम्ही शहरचे राहणार. तुम्हाला रहिमतखान, बंदेअल्ली असल्या गवयांच्या बजवय्यांची गाणीं बजावणीं ऐकण्याची संवय. तुम्हाला आमच्या खेडेगांवचें गाणें कसलें पसंत पडतें म्हणा ! पण खेडेगांवचा मासलाहि तुम्हाला दाखविलाच पाहिजे. "

जवळच्या मंडळींनांही त्यांच्या म्हणण्याची री ओढली व गाण्याच्या बैठकीच्या तयारीस प्रारंभ झाला. खेडेगांवातली गाण्याची तयारी म्हणजे संन्याशाच्या लग्नाला जशी शेंडीपासून तयारी तशी. गाणें खेडेगावचें पण तें साथीशिवाय कसें होणार ! तबौरा पाहिजे, तो आणण्यास एक गेला. गांवच्या गुरवाकडे तनला खचित असावा असें अनुमान करून दुसऱ्यास तिकडे धाडण्यात आलें. मुख्य गवईबुवा त्या रात्रीं गांवांत आहे, असें कोणी म्हणे व कोणाचा समज असा होता की, ते संध्याकाळींच परगांवीं कामास निघून गेले असावेत. तथापि, त्यांच्याहि शोधाला मनुष्य धाडण्यांत आला.

अशा रीतीनें चहूंकडे मनुष्यें शोधाला गेलीं व सुमारें १५–२० मिनिटेंपर्यंत कोणी आले नाहीं असें पाहून मला मनांत एकप्रकारें आनंदच झाला. मी

मनांत म्हणालों, " बहुधा गाण्याचा प्रसंग टळला असें दिसतें. " पण वर उपचारी म्हणालों, " खेडेगांवचें गाणें झालें म्हणून काय झालें? एखादा गवयी चांगला असतो, मधुर गळा असला म्हणजे गाण्याची बहुतेक गोडी त्यांत आलीच. पण आतां उशीर झाला आहे. ११ वाजायला आले तेव्हां आतां निजावें हेंच बरें. "

दादासाहेब म्हणाले, " छे: छे: असं कुठं झालं आहे कीं काय? आमच्या तिंबूबुवांचें गाणें तर ऐका. तो एका मुसलमान वस्तादाजवळ दोन तीन वर्षे चिलीम भरून देत होता. मग गाणें आल्याशिवाय कसें राहील? शेण जमिनीवर पडेल तर थोडी तरी माती घेऊन उठेलच. आतां गुरूच्या संगतीनें हे बुवाही थोडेसे नन्हेवाईक झाले आहेत खरे. त्यांची तार लागल तरच ते एखादी चीज म्हणतील; नाहीं तर प्राण गेल्यानें आ म्हणून करणार नाहींत. पण—"

इतक्यात तंबोरा आणण्यास गेलेला मनुष्य परत आला व म्हणाला, " सद्दादाकडून काल त्या अंबाजीनें तंबोरा नेला तो तिकडेच आहे "

दादासाहेब म्हणाले, " अरे हात हाल्वीत काय आलास? धांव मार! जायला फार तर अर्धी घटका व यायला अर्धी घटका. अंबाजीचें घर काय असें चार कोस थोडेंच आहे! जवळच्या वाडींत तर राहतो. जा जा घेऊन ये. "

हें ऐकून तो मनुष्य कां कूं करीत निघून गेला.

मी म्हटलें, " दादासाहेब राहूंद्याना! उगाच कशाला त्याला हेलपाटा देता? "

ते म्हणाले, " अहो ही आमची खेडेगांवचीं माणसें म्हणजे अशींच चुकारतट्टू. त्यांना असे हेलपाटेच दिले पाहिजेत. "

इतक्यांत गुरवाकडला मनुष्य येऊन सांगूं लागला कीं, " गुरव जेवीत बसला आहे. तो म्हणतो, तबल्याच्या वाद्या तुटल्या आहेत, १५ जरा दम धराल तर त्या गाठून आणि ठोकळे बदलून देईन. "

मी घड्याळाकडे पाहून म्हणालों, " जाऊं दे कीं, कशाला इतका त्रास! "

दादासाहेब म्हणाले, " छे: असें करून कसें चालेल? " तुम्ही आज एक दिवस आलां. पण इथल्या लोकांशीं आमची नित्य गाठ. जेव्हांच्या तेव्हां या लोकांकडून काम चापून घेतलें तर बरें, नाहीं तर हे उरावर बसलेच. "

मी मनांत म्हणालों, "हा माझा पाहुणचार की दादासाहेबांच्या अमलबजावणीची परीक्षा?"

दादासाहेब म्हणाले, "जा गुरवाला साग क्षणभर लागला तरी हरकत नाहीं. पण म्हणावं तबला दुरुस्त होऊन आलाच पाहिजे."

अकरा वाजून १० मिनिटें झालीं. इतक्यांत गवईबुवाकडे गेलेला मनुष्य आला. तो म्हणाला, "निंबूबुवा गांवांत घरीच आहेत; गावाला गेले नाहींत. पण म्हणतात, आमांश झाल्यामुळें आज रेचक घेतले होते. तब्येत बरी नाहीं, त्यांतूनही आज्ञा होईलच तर थोड्या वेळानें येतो."

दादासाहेब म्हणाले, "हेंच तें. म्हटल्याबरोबर कोणी येईल तर शपथ. पण यांना एकदा सैल सोडलें की, हे बसलेच उरावर. तें कांहीं नाहीं. तू परत जा आणि निंबूबुवांना म्हणा की असाल तसे या. येथें तुम्हाला औषध मिळेल. चार पदें म्हणून जा म्हणजे झालें."

झालें. तंबोरा, तबला व गवयी यांचा अशा रीतीनें अजून ठिकाण नाहीं व मला तर चांगलीच झोंप येऊं लागली. तरी मला निजूं देण्याची बुद्धि दादासाहेबांस होईना. गवयी नाहीं तर नाहीं, गवयाच्या गोष्टी सांगितल्यानें तरी माझा संगीत पाहुणचार होणार असें वाटून की काय त्यांनीं मला निंबूबुवांच्या एकेक गोष्टी सांगण्यास आरंभ केला.

मी इकडे पेंगत होतो. मधून मधून घड्याळ काढून पाहत होतो. व चूळ भरून टाकून डोळ्याला पाणी लावीत होतो. पण कांहीं केल्या दादासाहेबांस माझी दया येईना. निंबूबुवाला गाण्याची आवड कोणी लाविली; त्याची आणि त्याच्या वस्तादाची गांठ गांजा ओढण्याच्या एका अड्ड्यांत कशी पडली; तो आपल्या वस्तादाच्या मौजेच्या गोष्टी कशा सांगतो; त्यानें एका भर मजलशींत तंबोऱ्याच्या चारी तारा तोडून बदरंग कसा केला; त्यानें दुसऱ्या एका प्रसंगीं मृदंगास लावण्यास आणलेली कणीक भूक लागल्यामुळें कोणास न कळत हळूच कशी खाल्ली; तो गाण्यापेक्षां गाण्याच्या गप्पा मारूनच वेळ अधिक कसा काढतो; त्याचें व तबलजीचें एकदां भांडण होऊन त्यानें तंबोरा उचलून तबल्यावर हापटल्यामुळें दोन्हीहि कसे फुटून गेले; साधारणशा मनुष्यानें एकादें पद किंवा राग नांव घेऊन गा म्हटलें म्हणजे "आपल्या वडिलांनीं तरी तें कधीं ऐकलें होतें का?" असें म्हणून तो अपमान कसा करी; वगैरे अनेक गोष्टी खुलवून सांगण्यास दादासाहेबांनीं प्रारंभ केला."

मी म्हणालों " दादासाहेब " खरोखरींच मला गाण्याची हौस नाहीं. "

दादासाहेब म्हणाले, " छे: असं कुठं झालं आहे कीं काय ? तुमचे शहरचें गेंचपकान्न रोज चालूच आहे. पण आमच्या खेडेगांवच्या चिंचेचा टंवा एक दिवस तरी खाऊन पहा."

अकरा वाजून पंचवीस मिनिटें झालीं. इतक्यांत तिंबूबुवा खोकत खोकत आणि हातांतील काठी टेकीत टेकीत येऊन दाखल झाले. दादासाहेबांनीं गड्यास बैठक घालण्यास हुकूम केला.

बुवा म्हणाले, " काय दादासाहेब, काय आज्ञा आहे ? "

दादासाहेब म्हणाले, " अहो आज्ञा कसची ? तुम्हीं आमच्या गावचें सौभाग्य. हे मोठ्या शहरचे मोठे पाहुणे. कधीं नव्हे ते आपल्या घरीं आले. यांना चार पदें एकवा दुसरें काय ? "

बुवा म्हणाले. " हो एकवूं यांत काय ? पण माझा घसा आज बसला आहे व प्रकृतिहि साफ नाहीं. "

मी पहल्या फळ्याची आज्ञा घेऊन म्हणालों, " बुवासाहेब, आपण आला इतकें पुरें झालें. आपली प्रकृति नादुरुस्त आहे, आपल्याला मुळींच त्रास देण्याची माझी इच्छा नाहीं. "

पण बुवांना चढविण्याच्या हेतूनें दादासाहेब म्हणाले. " अहो कसली प्रकृति आणि कसलें काय ? आमच्या बुवासाहेबांची लहर मात्र लागली पाहिजे ! एकदां ते घसा खाकरून आ करून बसले म्हणजे त्यांना भीमाचें बळ येतें. रात्र सहज उजाडायची ! "

मी मनांत म्हणालो, " ईश्वर करो आणि तसा प्रसंग आज तरी न यावा. "

बुवासाहेब म्हणाले, " असें तर खरंच आहे. वेळेचा गुण कांहीं वेगळा असतो. " असें म्हणून त्यांनीं गाण्याच्या ऐवजीं आपल्या आयुष्यांतील आठवणी सांगण्यास हळू हळू प्रारंभ केला. दादासाहेब आणि बुवा दोघेही रंगांत आले होते, व मधून मधून जोरानें हांसत होते. मीहि हांसण्याचा मधून मधून प्रयत्न करी. पण इकडे डोळ्यांत झोप भरलेली व दुसरे दिवशीं लवकर जेऊन निघून गाडी गाठायला सांपडतें कीं नाहीं या भीतीचा वायगोळा क्षणोक्षणीं पोटांत उठत होता. तव्हां मला कसचें हंसूं येणार ? "

हें चाललें आहे तोंवर तबल्याकडे गेलेला मनुष्य तबला तर नेऊन आला. तबल्याच्या दोन भांड्यांपैकीं मुख्य भांड्याची शाई बहुधा उडालेली होती व

डग्गयाच्या कानज्याला चीर पडली होती. मिळून दोन्हीही बदबद वाजत होती. हें पहातांच बुवांनीं गुरवास शिव्या देण्यास प्रारंभ केला. " हे लेकाचे असेच. हत्यार कधीं दुरुस्त ठेवतील तर शपथ. वडलार्जित तबलजीचा धंदा राखायचा सोडून पत्रावळी लाऊन पोट भरण्यातच यांना आनंद वाटतो. हे पत्रावळींचे द्रोके यांच्या घशांत जाऊन एकदां यांचा प्राण कां जात नाहीं ? बरें तबला पाठविला तर स्वतः आला नाहीं ? माझा मीच वाजवून गाऊं की काय ? आणि मी तरी हा तबला कसा वाजवूं ? या पेक्षां एखादें फुटकें गाडगं द्याल तरी बरं. "

आपणावर बाजू आला असे पाहून दादासाहेबांनींही गुरवास शिव्या झाडण्यास सुरवात केली.

मी मध्येच म्हणालो, " जाऊं दे कां, इतका खटाटोप कशाला ? "

दादासाहेब म्हणाले, " असे कोठें झालें आहे कीं काय ? माझा स्वभाव करारी आहे. मी तुम्हाला गाणें ऐकवीन म्हटलें तर गाणें ऐकवीनच. " बुवांनी तर तबल्यावर उगा पालथा घालून रागानें दूर भिंतीशीं सारून दिला आणि बैठकीवर जाऊन पानसुपारी खाण्यास सुरवात केली. व गाणें नाहीं तर नाहीं. निदान गवयांच्या गप्पागोष्टी ऐकावयाला मिळतील तरी मी माझे भाग्यच समजेन अशा समजुतीनेच कीं काय, मला पुण्यातील दोन चार प्रसिद्धांच्या गवयांची माहिती विचारण्यास प्रारंभ केला.

" आपण चुन्नाचें गाणें ऐकलेच असेल ? "

" नाहीं, मी तेव्हां पुण्यांत नव्हतो. "

" नसला म्हणून काय झालें ? चुन्ना म्हणजे प्रत्यक्ष गंधर्वांची राणी. पण आपल्याला अबदुल करीमखांचें गाणें एकदां वेळ ऐकावयास सांपडलेच असेल ? "

पण तिबूबोवांचें व माझें भाषण सर्व सांगत बसलों तर वाचकांस कंटाळा येईल. त्यांतील तात्पर्य इतकेंच कीं, बुवांनीं प्रश्न विचार विचारून मनाशीं असें ठरविलें कीं, मी नावाचा मात्र शहरवासी; पण गाणें वगैरेच्या बाबतींत बुवांच्या दृष्टीनें मी अगदीं ठोंब्या होतो. पण मला बोलणें होईल तितकें आवरतें घ्यावयाचें होतें, म्हणून होय नाहीं वगैरे एकेरी शब्दाशिवाय मी त्यांना माझ्या उत्तरांत फारसें कांहीं लाभूं दिलें नाहीं.

असो. बुवांनीं केलेली माझी उलट तपासणी संपली व बाराचा ठोका पडला. तों इतक्यांत तंबोरा आणण्यास गेलेला मनुष्य तो घेऊन परत आला.

घरधनी म्हणाले, "का बुवा, एकूण तुम्हाला आजचें गाणें चुकत नाहीं असेंच दिसतें. कारण नाहीं होय म्हणतां म्हणतां तबला व तंबोरा दोन्ही शेवटीं आलेच."

बोवा म्हणाले, "आले पण हें असलेच कीं नाहीं. इथे काय गवई रडेल!"

पण बुवांनाहि दिसलें कीं घरून उठून साहेबांच्या घरापर्यंत हेलपाटा तर घेतलाच. आणि तबला, तंबोरा मोडकातोडका कां होईना. पण येऊन दाखल झाला. तेव्हां आतां कांहीं तरी गायल्याशिवाय यजमान खास सोडीत नाहींत. म्हणून त्यांनीं तंबोरा जवळ घेतला व मळसणी काढून तारा ला वण्यास आरंभ केला. पण वेळच खडतर, त्याला ते काय करणार! कारण खुंटी पिळतां पिळतां पंचमाची तार तडकून तुटली.

झालें फिरून बुवांनीं तंबोरावाल्याचे आईबाप उद्धरण्यास सुरवात केली. हें निमित्त घेऊन "मीं म्हणालों, साहेब खरोखरच आज योग दिसत नाहीं. कांणीहि झालें तरी वेळेला सनावूं नये."

पण मला गाणें एकवून पाहुणचार करण्याच्या बुद्धीपेक्षां आपल्या गावचे आपण राजे असा अभिमान तडीस नेण्याच्या कल्पनेचाच अम्मल साहेबांवर पुरा झाल्यामुळें मी गरीब त्यांत सांपडलों.

साहेब म्हणाले, "तो तंबोराही नको आणि तबलाही नको आपल्याला गळा गोड असला म्हणजे इतर साहित्य लागत नाहीं. आणि तोच वाईट असला, म्हणजे इतर साहित्यानेंहि निभावत नाहीं. तें कांहीं नाहीं. ठेवा तो तंबोरा बाजूला आणि झडूं दे नुसत्या गळ्याचीच लकेर."

आतां निंबूबुवास कांहींच सबब उरली नाहीं. त्यांनीं खाकरून आ तर पसरलाच. पण नुसते एक दोन आलाप घेतल्याबरोबर गायनशास्त्रांतल्या अगदीं साध्या गोष्टींवर मला व्याख्यान देण्यास सुरवात केली. तेव्हां मींहि निश्चय केला कीं, या पाहुणचाराचा जुलूम यापुढें सोसावयाचा नाहीं; आणि बुवांच्या कहाणीस हुंकार देतां देता हळूच भिंतीजवळच्या तक्यास टेकून पाय लांब केले, डोळे मिटले, आणि खुशाल घोरण्यास सुरवात केली.

त्याचा मात्र साहेबावर कांहीं परिणाम झाला असा दिसला. कारण, ' त्यांना खरीच झोंप येऊं लागली वर का ?" असें म्हणून त्यांनीं मला अंथरूण घालून देण्याकरितां गड्यास हाक मारिली. मी निजावयास निघालों खरा. पण रात्रीच्या पाहुणचारावरून सकाळीं काय होणार याची कल्पना मला पुरी येऊन चुकली म्हणून जातां जातां मी साहेबांस ऐकूं येईल अशा रीतीनें आपणाशीं म्हणालों, " सकाळीं लवकरच उठलें पाहिजे. "

आणि माझी खरी अडचण व कळकळ दाखविण्याकरितां पुढें म्हणालों, " सकाळचीं आठ पावणेआठ वाजेतों थांबण्यास हरकत नाहीं. येऊन जाऊन गाडी चुकली म्हणजे मग माझा दहा जाण्यानाचाही शीण जाईल. "

हें ऐकून साहेब म्हणाले, " त्याची तुम्हाला काळजी नको. अगदीं पहाटे म्हटलेंत तरी पहाटे जेवण तयार ! आमच्या भिम्या आचाऱ्याला इषारत द्यायची फुरसत; का दहा मिनिटांत स्वयंपाक तयार. दिवस उगविण्यापूर्वी जेवायाचें नाहीं म्हणून काय ते. नाहीं तर हा झाडावरच्या कावळ्यांना दगड मारून त्यांच्या आरडण्याची आज्ञा घेऊन हरहर महादेव म्हणायचा. "

हें ऐकून मला फार समाधान वाटलें. मी मनांत म्हणालों, " भिम्या आचाऱ्यामुळें आपणास उद्यां गाडी साधणार तर मग. " पण मला हर्षवायु होण्याची भीति ईश्वरास पडली. म्हणूनच कीं काय त्यानें साहेबास आणखी पुढें बोलण्याची बुद्धि दिली.

ते म्हणाले, " भिम्या घरीं निजला असला तर बरेंच झालें. नाहीं तर आपण त्याला आणूं सकाळीं लवकर हाक मारून म्हणजे झालें. भिम्याला हुडकून आणायचा म्हणजे तें एक मोठेंच काम आहे म्हणा; पण तो घरीं येऊन दाखल झाल्यावर स्वयंपाकास उशीर नाहीं. " मग माजघराकडे तोंड करून ते कोणालासें ओरडून म्हणाले, " कायरे पाहुण्यांना सकाळीं लवकर जेवण करून जावयाचें आहे हें भिम्याला कोणी सांगितलें का ? "

पण रात्रीचे बारा वाजून सर्व सामसूम झालेली. साहेबाना उत्तर देणार कोण ? तेव्हां साहेब निराश न होण्याचा निश्चय करून म्हणाले, " हुं: त्यांत काय. आधीं सांगून नाहीं ठेवलें तर नाहीं ठेवलें. एक प्रहरांत शंभर पानांचा स्वयंपाक भिम्या करील. "

झालें, माझा सर्व हर्ष मावळला आणि फाशी देण्यास चालविलेल्या मनुष्याइतक्या उल्हासानें मी माडीकडे निजण्यास गेलों.

पहाटे उठण्याची सगळी काळजी मला होती, तरी मी स्वतःच सहा वाजल्यावर जागा झालो. तरी काय, घरात जिकडे तिकडे सामसूम. साहेबांस झोंप लागली असतां त्यांना उठविण्याचा शिरस्ता नाहीं; आणि ते नाहींत तर चाकरमाणसांना हुकूम सोडणारा मी कोण ? अर्थात चूळ भरून टाकून अंथरुणावर बेड्यासारखा नोकरचाकरांच्या हालचालींकडे आशाळभूतपणे पाहात बसलों होतों. शेवटीं सात वाजण्याचे सुमारास साहेब जागे झाले व फिरून माझ्या पाहुणचारास त्यांनीं सुरवात केली. प्रातर्विधि करण्यापुरता माझा मी मोकळा होतों, पण पाहुणचाराच्या जुलमास चहापासून सुरवात झाली. उत्तम चहा करण्याचे हुकूम सुटले, व लवकर चहा करण्याचे नगारे आले. होतां होतां साडे सात वाजतां चहाचे पेले वर आले. तो त्यात थोडीशी राख पडली असून पहिल्याच घोटाबरोबर राखेलची घाण आली, पण आता जर का मी ही चूक साहेबाच्या नजरेस आणीन तर या चहा प्रकरणात आणखी अर्धा तास जाणार असे जाणून, मी मन घट्ट करून ओठ दाबून खोटा हंसण्याचा आव घालून, घोटाघोटानें चहा पिऊनहीं टाकला. पण साहेब थंड चहा पीत म्हणून थांबले होते. त्यांनीं तोंडास पेला लावताच त्याना सर्व कळून चुकलें; व एकदम त्यांनीं सर्व चाकरमाणसांस शिव्यांची लाखोली वाहण्यास सुरवात केली; व फिरून चहा करून आणण्यास त्यांनी हुकूम सोडला. बऱ्याच वेळाने नाहीं होय म्हणतां म्हणतां चाकरांनी लाजत लाजत येऊन कळविलें कीं, घरांतील चहा संपला आहे.

साहेबांची अब्रू बचावावी व पाहुणचाराचा जुलूम टळावा म्हणून मी म्हणालो, "मी कांहीं चहाचा मोठासा शोकी नाहीं. आणि प्यालेल्या चहालाही कांहीं फारशी घाण येत नव्हती." पण पाहुणचाराची साहेबांची कल्पना जाज्वल्य असल्यामुळें ते म्हणाले, "फिरून चहा करवीन एवढेंच नव्हे तर बाजारांतून 'लिप्टन'चा नवा डबा आणवीन."

मी मनांत म्हणालो, "नशीब माझें" फिरून विचार केला, जेवणाची तयारी वेळेवर असली म्हणजे झालें. नंबरचा तास अर्धा तास यजमानांस खुष करण्यांत गेला तर जाईना कां. पण इतक्यांत साहेबांना आठवण होऊन ते म्हणाले, "आमच्या भिम्याचा चहा कधीं बिघडायचा नाहीं; पण आजच त्याला काय अवदसा आठवली कोणास ठाऊक!" पण इतक्यात शेजारीं गडी उभा होता त्याच्या मनांत न्यायदेवता उभी राहून त्यानें सांगितलें कीं, चहा

भिम्यानें केला नसून घरांत कोणी नाहीं म्हणून आयत्या वेळीं शेजारच्या आजीबाईस बोलावून आणल्या व त्यांनी हा चहा बनविला. साहेबांच्या मनांत आजीबाईनाहि शिव्या द्यायचें येऊन गेलें, पण कांहीं कृतज्ञता व कांहीं शिष्टाचार मिळून त्यांनीं आजीबाईवर शिस्त धरली नाहीं.

पण या सगळ्या प्रकरणांत, भिम्या आचारी अजून आला नाहीं मग स्वयंपाकास सुरवात होणें लांबच. येवढी गोष्ट मात्र आपोआप सिद्ध झाली. मग काय विचारता ! साहेबांच्या आरडण्याओरडण्यानें सर्व घर दणाणलें. दाही दिशांना गडी पाठवून भिम्या असेल नसेल तिथून धरून आणण्याचे हुकूम सुटले व दरम्यानचा वेळ कोणत्यातरी पाहुणचारांत जावा. व्यर्थ दवडूं नये म्हणून साहेबांनीं आपला नवा बगीचा पाहून येण्याची गोष्ट काढली.

ते म्हणाले, " बगीच्या येऊन जाऊन मैलभर तर लांब आहे, स्वयंपाक होईपर्यंत आपण दहादां जाऊनसुद्धां येऊं. " आणि स्वयंपाक करण्याचा तगादा भिम्यामागें लावण्याचा फिरून एक हुकूम सोडून ते म्हणाले, " स्वयंपाक स्वयंपाक तो काय ! आपण बगीच्यांत जाऊन येई तो दहा वेळ स्वयंपाक होईल.

स्वयंपाक होईपर्यंत बगीचाच्या दहा खेपा होणार. आणि बगीच्याची एक खेप होईपर्यंत स्वयंपाक दहा वेळां होणार. हें एकांत एक कसं बसतें याचें कौतुक वाटून मला थोडेंसें हसूंही आलें. पण त्याचा संबंध बगीच्या पाहण्याच्या आनंदाशीं जोडून देऊन मी वेळ मारून नेली.

बगीच्यांत न जाता आम्हीं घरी राहिलों. तरी मला स्वतःला चुलीपुढें जाऊन स्वयंपाक थोडाच करावयाचा होता. स्वयंपाक घरातली ' भवितव्यता ' सर्वस्वी भिम्याच्या हातात राहणार. म्हणून बाहेर बगीच्यांत गेलों तर स्वयंपाकाकडचें लक्ष तरी कमी होईल अशा हेतूनें बगीच्याकडे जाण्यास मीं संमति दिली.

बगीच्यांतही पाहुणचार माझी वाट पहातच होता. व झाडावरचीं फुलें खुडणें, फळझाडावरचीं ताजीं फळें तोडणें वगैरे गोष्टी साहेब मजकरितां करीत होते. त्या पाहुणचाराच्या स्फूर्तीच्याच होत्या यांत शंका नाहीं. पण कित्येक वेळां अशा गोष्टींत पाहुणचाराच्या बुद्धीपेक्षां गर्वोक्तीचें आत्मनिवेदनच अधिक असतें. तसेंच येथेंही झालें. साहेबांनीं मला मूळ बगीच्या घेतल्यापासून सर्व वृत्तांत निवेदन केला. त्यांनीं केलेलें सर्व कांहीं चांगले व शहाणपणाचें होतें अशी माझी खात्री करून देण्याचा त्यांचा सारखा प्रयत्न चालू होता. क्षणोक्षणीं

हुंकारानें मी कबुली देतच होतो. पण खात्री करावी तितकी थोडी, अशा-पैकीं ही गोष्ट आहे असें साहेबांस वाटत असावें. यामुळें पुराव्याचीं ओझ्या-वर ओझीं मजवर लादून युक्तिवादाचे हल्ल्यावर हल्ले ते मजवर चढवीत होते. त्यांची जमीन चांगली, त्यांचे गडी हुशार, शेती व बागाईत करण्याची त्यांची पद्धति लोकोत्तर, त्यांचें पीक लोकांपेक्षां अधिक, फार काय पण पाऊस सुद्धां त्यांचा पक्षपाती असून शेजारच्या नंबरांतल्यापेक्षां त्यांच्या नंबरांत अधिक मुबलक व वेळेवर पडत असे अशीही माझी खात्री झाली. पण खात्री न होईल तर काय झालें! माझे कान तेवढे साहेबांकडे होते. पण मन स्वयंपाक-घरांतील भिंग्याचा स्वयंपाक आणि स्टेशनांतली मुंबई-मेल यांच्या दरम्यान भ्रमण करीत होतें. साहेबांच्या पाहुणचाराच्या बुद्धीला मजकडून मिळावा तितका खुलासेवार व कृतज्ञतापूर्ण जाब मिळत नव्हता. पण त्याला मी तरी काय करणार?

मला स्टेशनावर पोंचविण्याकरितां बहुधा शेतांतल्या बैलांपैकींच जोडी मिळणार असें वाटून मी होऊन साहेबास म्हणालों, "यांतले कोणते बैल मला स्टेशनावर नेणार?"

साहेब एका जोडीकडे बोट करून म्हणाले, हीं तर घरचीं सतबांच आहे. पण शेजारचा वाटेकरी बळी पायगुडा यानें प्रदर्शनांत धनलेली एक जोडी आहे तीच होता होईतों तुम्हांस नेण्यास मी देणार आहें."

शोध करितां गड्याकडून कळलें कीं, पायगुड्याची जोडी एक मैलावर अस-लेल्या कुरणावर चरावयास ठेवलेली आहे. तेव्हां ती कदाचित् वेळेवर येणार नाहीं, अशा भीतीनें मी म्हणालों, "हे पहा साहेब, घरची जोडी नीट खरी. उगाच दुसऱ्याची कशाला?"

फिरून साहेबांना आपण गांवचे अधिराजे या अभिमानाची लहर आली. ते म्हणाले, "हे पहा आमच्या या गांवांत कोणतीही वस्तु दुसऱ्या बिसऱ्याची हें मी जाणत नसतों. म्हणेन तेव्हां म्हणेन ती वस्तु मला मिळालीच पाहिजे हा आपला माझा कायदाच आहे. मला जोडी देतो म्हणजे पायगुड्या काय उपकार करतो की काय? असें म्हणून त्यांनीं ती जोडी घेऊन येण्यास चाक-रांना सक्तीचा हुकूम सोडला."

मी या मुद्यावर अधिक हुजत घालीत बसलों नाहीं. पण येवढेंच म्हणालों, "आपलें काय जातें मिळालें तर. प्रदर्शनांत बक्षिस मिळालेल्या जोडीच्या गाडींतूनच आपण राजासारखे स्टेशनावर जाऊं."

पण त्यांच डामडौल व मिजासीपणा यांच्यामुळें राजे लोकांच्या आगगाड्या कित्येक वेळां चुकतात या आठवणीनें मनास धक्का बसून मी पुढें म्हणालों, "जोडी कोणची का होईना? पण आपलें स्टेशनावर वेळेवर पोचलें म्हणजे झालें."

पण तोफेच्या तोंडी दिलेल्या मनुष्याच्या जितकीं शकलें होत असतील तितकीं साहेबांनीं आपल्या निश्चयात्मक उत्तरानें माझ्या शंकेचीं शकलें झालीं.

ते म्हणाले, "हातिच्चारे, स्टेशनावर वेळेवर पोचायचें एवढीचना येऊन जाऊन तुमची शंका! हुः त्यांत काय आहे? आमचा नाम्या गडी आणि आमचीच जोडी असली म्हणजे स्टेशन काय १५ मिनिटांचा रस्ता!"

नाम्या गडी व त्याची बैलाची जोडी यांची किंमत कमी करण्याचें मला कारण नव्हतें. पण चार मैलांची मजल पंधरा मिनिटांत मारावयाची म्हणजे तासीं सोळा मैल वेग होतो हें उदाहरण मनानें सोडविल्यामुळें मी तें सहज साहेबांपुढे मांडलें. हेतु हा कीं साहेबांचें गणित चुकल्यानें माझी गाडी चुकूं नये.

पण साहेब पडले अभिमानी पुरुष. ते काय अशा दुरुस्तीला भीक घालतात? ते म्हणाले, "पंधराच्या ठिकाणीं वीस. आमची ही जोडी एकदां चौखूर उडूं लागली म्हणजे एखाद्या वेळीं घोड्याच्या गाडीलाही मागें टाकावयाची."

मी अगदीं मनाविरुद्ध 'तथास्तु' असा आशीर्वाद देऊन हा वाद थांबविला.

घरीं येतों तो आठास सुमारें दहा मिनिटें कमी होतीं. पण माझ्या दुर्दैवानें लिप्टनचा चहाचा डबा येऊन पडला होता. मग काय साहेब मला सोडणार! मी म्हणालों स्टेशनावरून गाडी हलायला फक्त एक तास पंचवीस मिनिटें आहेत. तितक्यांत माझी अंघोळ–जेवण करून भातखाचरांतून चार मैलांवर मजल जायची आहे. तेव्हां आतां चहाच्या भानगडींत कशाला पडावें? पण साहेब म्हणाले, "स्वयंपाक चुलीवर होतोच आहे पण वेळ रिकामाच आहे की नाहीं?" असे म्हणून भिम्या–जो या सुमारास येऊन चूल पेटवून भात टाकीत होता–त्याला साहेबांनीं चहा करण्याचा हुकूम दिला.

झालें, या पुढची हकीकत वर्णन करण्यास मी असमर्थ आहें. प्रत्येक पळाबरोबर माझा जीव तिळतीळ तुटत होता. माझें सगळें लक्ष आगगाडीकडे होतें आणि एखाद्या कळसूत्री बाहुल्याप्रमाणें मी साहेबांचा पाहुणचार घेत होतों. प्रथम चहा झाला. नंतर आंघोळीकरितां बाजारांतून साबण आणण्यास पांच

मिनिटें गेलीं. नको नको म्हणत असतां गुलाल रांगोळ्या झाल्या. ऐन भात वाढावयाच्या वेळीं भजी केलीं नाहींत म्हणून भिम्यास रागें भरून घेऊन चुलीवर कढई ठेवावी लागली. भिम्यानें ऊन ऊन चपाती करून वाढावी व मी खावी याशिवाय यजमानांचा संतोष होण्यासारखा नसल्यानें तो प्रकार आग्रहपूर्वक सुरू झाला. पाणी पिण्याची वेळ आली तेव्हां घरच्या विहिरीचे आख्यान दिवाणी कोर्टातील अपिलापर्यंत मागून त्याचें पर्यवसान असें झालें कीं रहाटास दोर नव्हता, तो मुद्दाम बांधून तांब्या घागर काढून अखेर मला पाणी पाजण्यांत आलेंच! पानसुपारीचे वेळीं मला नुसतीं फुलें न देतां त्यांचा गुच्छ सजवून द्यावा अशी साहेबांची लहर लागल्यामुळें त्यांतच चार दोन मिनिटें गेलीं.

जेवणांतून मोकळा झालों असें पाहून अंगरखा पागोटें घालण्याचा लगबग मी केली; पण देवापुढें सुपारी ठेऊन जाण्याच्या शिष्टाचारांत मी सांपडून साहेबांनीं शिसवी देव्हारा करणाऱ्या सुताराची कारागिरी आणि महत्प्रयासानें मिळविलेले बाण व चक्रांगद यांचें वर्णन करून दोन तीन मिनिटें खाल्लींच. अखेर ओटीवर येऊन हातांत बॅग व काठी मी धरतों तों मला समजलें कीं दारांत मुळीं गाडीच उभी नाहीं. तें ऐकतांच साहेबांनीं नाम्या गड्यास चार शिव्या हांसडल्या. एकामागून एक दोन तीन गडी धाडले, व इतकें केल्यानें चुकीची योग्य ती दुरुस्ती झाली असें मनाशीं ठरवून ते संथपणानें मला म्हणाले, "अहो बसाल तर खरें, फिरून एक वेळ विडा खा." तेव्हां मी मात्र मनांत बराच संतापलों. मी साहेबांस जाणवेल अशा रीतीनें घड्याळ काढून पाहून खिशांत आपटलें. पण घड्याळांत किती वाजले ही बाबच साहेबांच्या हिशोबांत नव्हती 'सकाळीं जेऊन गाडीला जायचें.' इतकीच गोष्ट ते जाणत होते. सर्व पाहुणचाराच्या समारंभांत त्यांनीं घड्याळाकडे एक वेळहि पाहिलें नव्हतें.

असो; पुन्हा एकदां विडा खाऊन झाल्यावर मी उठलों व सामान घेऊन दारांत उभा राहिलों, तरी गाडी येईना. मी आपणाकडून चुळबुळ करीत होतों, व गाडी आतां इतक्यांत येईल असें आशापूर्ण शुभवर्तमान, साहेब वर्त-वीत होते. अखेर एकदांची गाडी आली. तोंच इतक्यांत घरच्या घड्याळांत नवाचे ठोके पडले. त्याचा अर्थ चार मैलांवर असलेल्या स्टेशनावरची गाडी बरोबर १५ मिनिटांनीं सुटावयाची!

पण साहेब स्वस्थपणें म्हणाले, "शकुन तर ठीक झाला." मी गाडींत बसून गाडी चालू होतांना साहेब म्हणतात, "पंधरा मिनिटें आहेत ना!

हातेवारे! नाम्या तवढ्या वेळांत दोनदां स्टेशनाला पोंचवील. नाम्या, डवळ. बैल जरासा लंगडतो आहे खरा. पण हाण जरा जोरानें म्हणजे झालें."

शेवटीं साहेब मला म्हणतात, "एक मिनीटभर थांबत असलां तर थोडेंसें फराळाचें देतों बरोबर." मी हातानेंच नको म्हणून 'हाण गाडी' असें नाम्यास म्हणालों.

साहेबांचे अखेरचे शब्द ऐकूं आले ते असे:—"पुन्हा लवकरच या बरें कां आजच्यासारखें!"

यावर मीं काय उत्तर दिलें तें साहेबांस किंवा नाम्यालाही ऐकूं जाण्यासारखें नव्हतें. पण तें उत्तर काय असेल याची वाचक कल्पना करतीलच!

मी स्टेशनावर पोंचलों तों पावणेदहा झाले होते. मेल गाडी जाऊन अर्धा तास झाला होता आणि स्टेशनावर सर्वत्र सामसूम झालें होतें.

साहेबांच्या पाहुणचारामुळें माझी आगगाडी कशी चुकली याचें सर्व चित्र माझ्या डोळ्यापुढें पाहुणचाराच्या पहिल्या हल्यापासून उभें राहिलें, व मी मटकन् प्लॅटफॉर्मच्या बाकावर बसलों.

---

# यमुनेचा पूल ऊर्फ—भीषणपरीक्षा.

( लेखक—गंगारमण )

१




त्यंत अभिजात कुलांत जन्म, अपरंपार ऐश्वर्य, आणि अतुलनीय व हृदयंगम असें सौंदर्य, यांत कुमारी सत्यबाला इची बरोबरी करणारी त्या वेळा मनोरमादेवीच्या राज्यांत कोणीही स्त्री नव्हती पंधरा वेळ वसंतानें तिच्या सौंदर्याला आपल्या अतुल वैभवश्रीचा सुंदर नजराणा अर्पून आतां सोळाव्यानें तिला मुजरा करण्याकरितां तो येत होता. आपल्या पित्याच्या आणि मातेच्या पश्चात ती आपल्या कुलपरंपरागतच्या विलासदुर्गांत जरी एकांतांत राहण्याचा प्रयत्न करीत असे, तरी पण देवी मनोरमा इच्या अनन्य वात्सल्यप्रेमानें तिला राजनगरांत, दरबारांत यावेंजावें लागत असे. राजनगरांत तिचें आगमन म्हणजे अनंत तारकांनी फुललेल्या कृष्णरात्रीच्या गगनात चंद्रोदय व्हावा त्याप्रमाणे होत असे. चंद्रोदय होतांच सर्व विश्वभर त्याचीच एक अद्वितीय दीप्ति प्रकाशित होते, त्याप्रमाणें सत्यबाला राजधानींत येतांच सौंदर्याच्या क्षुद्र तारका मावळून जात आणि सर्व जनता सत्यबालेच्या सौंदर्यानें सुप्रकाशित होई. जिकडे पहावें तिकडे तिच्या सौंदर्याच्याच कथा ऐकण्यांत येत असत.

तिच्या प्रेमसंपादनांत सरदार मानाजीराव आणि अजयसिंह यांना यश येण्याचा बराच संभव आहे असें देवी मनोरमेलाही वाटत होतें. सरदार मानाजीराव याच्या देखणेपणाची सत्यबालेप्रमाणेंच सर्वत्र प्रशंसा होत होती; आणि अजयसिंह कर्णार्जुनासारखा अप्रतिम योद्धा आणि साहसी आहे अशी त्याची वाखाणणी होत होती. मानाजीरावाचें जनन अभिजात आणि अकलंकित अशा क्षत्रिय कुळांत झालें होतें. सुंदरतेची तशीच लक्ष्मीचीही त्याच्यावर पूर्ण कृपा होती. सत्यबाला मधून मधून उत्सुकतेनें त्याचें वीक्षण करीत असें;

पण तिच्या वीक्षणानें बेभान होऊन मानाजीराव यत्किंचित् मर्यादा सोडून पुढें आला तर ती सौंदर्यसाम्राज्यदेवी आपल्या पावित्र्याच्या उच्च सिंहासनावरून अत्याज्य मुग्धता स्वीकारून त्याचा निषेध करी.

अजय हा मानाजीरावासारखा देखणा नव्हता, पण त्याची ती उणीव अलौकिक शौर्यानें, भीषण साहसानें व अत्यंत पवित्र आणि उदात्त नीतिमत्तेनें भरून काढली होती. ससाण्याच्या तीव्र आणि भेदक नजरेपक्षांही त्याची नजर तीव्र आणि भेदक असून, सर्पाच्या दृष्टीप्रमाणें तिच्यांत भयंकर आकर्षण-शक्ति होती. त्याचा स्वभाव तापट आणि उग्र होता. किंचिन्मात्र साशंक वृत्ति दर्शील त्याला नकारार्थी वाटे, विलंब अपमानासमान वाटे. हृदयांत खळबळणाऱ्या मनोवृत्तींनी कधीं कधीं त्याची मुद्रा उद्दीप्त होई, आणि त्याचा विशाल भाल आठ्यांनीं फुले. त्या वेळीं वक्रीभूत झालेल्या दोन्ही भुवयां-मध्यें खळगा पडे तो पाहून यमाच्या धार दरीचाच भास होई. पण दुसऱ्या क्षणांत वादळ शांत होतांच उदधि जसा पुन्हा प्रसन्नपूर्ण आणि हंसतमुख होतो, त्या प्रमाणें अंतःकरणानें पूततम असलेल्याच्याच ओष्ठांवर आणि मुखावर झळक-णारें विमल आणि सलील हास्य, त्याच्या ओठांवर आणि मुखावर विलसत असे. शौर्य, पराक्रम, साहस, आणि अद्भुत गुण यांकडेच निदान स्त्रीवर्गाचें लक्ष चटकन वेधलें जातें, असें कादंबरीकार सांगतात. आणि अजय त्या गुणांनीं परिपूर्ण होता. सर्व युवतिगण चकितवृत्तीनें त्याकडे पहात असे. प्रणयचरितांत चकितवृत्तीच मनाला प्रथम चटका लावते. ज्याचा चटका लागतो त्याच्या प्रासव्यानें मनाला आल्हाद उत्पन्न होतो आणि थोड्याच काळांत त्या आल्हादाचें प्रणयांत-प्रेमांत रूपांतर होतें आणि ती चटका लाव-णारी वस्तु आराध्य बनते.

अजय असा होता, पण त्याच्यांत एक विलक्षण वैगुण्य होतें. तोफेच्या तोंडावर, तो मर्द छाती, काढून चालून जाई. चपलेच्या भीषण प्रहाराची, मेघांच्या भीम वृष्टीची किंवा झंझावाताच्या रौद्र प्रवहनाची त्याला हरकत नव्हती. पण भूतापिशाच्यादि मानवेतर योनींवर आणि दैवावर त्याचा भरंवसा असे. त्याच शकुनांना अपशकुन पाहून त्याला भीति वाटे. या मूढ श्रद्धेनें त्याला पछाडलें म्हणजे ती त्याचा बुद्धिभ्रंश देखील करी. एका ज्योतिष्यानें का मांत्रिकानें का जादूगारानें त्याला ' तुझ्या कुळांत सर्पमुखी पुरुष उत्पन्न होईल ' असें सांगितलें होतें आणि अजयाला ते खरेंही वाटत होतें.

एकाच वस्तूचा अभिलाष करणारे हे दोन्ही प्रतिस्पर्धी एकमेकांचा भयंकर

हेवादावा करीत हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. देवींच्या दरबारांत या दोघांही उमरावांची गांठ कधीं कधीं पडत असे, आणि एकमेकांशीं बोलण्याचा प्रसंग त्यांना येत असे. त्या वेळीं केव्हां ठिणगी पडेल आणि केव्हां त्याचा भयंकर दावानल मातेल याचा नेम लागत नसे. बलवान् आणि बेदरकार पटाईत वाघ दृष्टादृष्ट होतांच जसे गुरगुरूं लागतात आणि प्रतिस्पर्ध्याला लोळविण्याच्या संधीची वाट पहात असतात तशीच त्या दोघांची स्थिति झालेली होती. सत्यबालेची व्यवस्था देवी मनोरमा आपल्या प्रासादांत खाशा नजरेखालीं स्वतंत्रपणें ठेवून सत्यबालेला तीं आपल्या बरोबरीचा मान देववीत असे. मानाजीराव, अजय आणि दुसरे वीर सरदार सत्यबालारूपी चंद्रिका देवी मनोरमेच्या दरबारांत प्रकाशूं लागतांच तिचा सुधाधवल हास्यप्रसाद मिळविण्याकरितां अहमहमिकेनें पुढें होत. तिच्या सुधाधवल हास्याकरतां प्राणसंहारकरणारा तोफेचा गोळा छातीवर देखील घेण्यास ते कमी करणार नव्हते.

मानाजीरावाचें प्रेम—अहंकार, महत्त्वाकांक्षा आणि स्वार्थ यांनीं डुळडुळलेलें होतें! तेंच अजयचें प्रेम निर्व्याज, निस्सीम आणि अत्यंत पवित्र होतें!

सत्यबालेची नजर दोघांवरही अत्यंत बारकाईनें होती, पण चुकून देखील त्यांपैकीं एकालासुद्धां तिनें आपलें मनोगत समजून दिलें नाहीं, किंवा त्यांना प्रोत्साहन दिलें नाहीं.

तरी पण कित्येक मानाजीरावाच्या गळ्यांत स्वयंवरमाळा पडून मानाजीराव त्रैलोक्यांत धन्य होणार असे खात्रीपूर्वक सांगत. सत्यबालेचें मानाजीरावाशीं वर्तन अत्यंत निर्विकार—शांत—सरळ आणि आनंदयुक्त होतें. अजयशीं किंचित् संभ्रमयुक्त—खोल—मानी आणि मुग्ध असें होतें. त्यायोगें दोघांपैकीं कोणावरही तिची दृष्टि नाहीं असेंही लोक बोलत.

२

मनोरमा राणी लाडक्या परिवारास घेऊन आपल्या महालांत विनोद करीत असतां सहज विनोदानें सत्यबालेला म्हणाली—

" बाले, मानाजीरावाविषयीं तुझें काय मत आहे ? "

" त्याच्याविषयींचे विचारच आजपर्यंत माझ्या मनांत कधीं आले नाहींत. " मधुर हास्य करीत मनोरमादेवीची लाडकी सत्यबाला म्हणाली.

" बरं, अजयबद्दल ? "

" त्याची मला भीति वाटते ! "

" तो किती पराक्रमी आहे ठाऊक आहेना ? "

" उलट किती तरी अंधश्रद्धाळु आणि खोल आहे. " सत्यबाला उद्गारली.

" त्यानें केवढाले पराक्रम केले आहेत–केवढाले विजय मिळविले आहेत ? "

" पण त्या प्रत्येक वेळीं शंकाकुशंकांनीं त्यांचे मनांत केवढा गोंधळ घातलेला असेल ? "

" बाले, त्याची तुझ्यावर अतिरिक्त प्रीति जडलेली आहे. "

सत्यबालाहीं विनोदानेंच प्रत्युत्तर करते, " तसें करण्याला त्यांना कोणत्याही प्रकारचा प्रतिरोध न झाल्यानें ते करीत असतील; पण उद्यां एखादा तिर्यग्योनीचा चमत्कार त्यांना दिसून एखाद्या ज्योतिष्यानें अगर मांत्रिकानें त्यांना माझ्यावरील प्रीति कमी करण्याचा हुकूम फर्मावला तर मी खात्रीनें सांगतें, ती अतिरिक्त प्रीति पार लयाला जाईल. पैशाचिक अगर मांत्रिक भाकितानें त्याचें प्रेम थिजेल–नव्हे वितळून अंतर्धान पावेल. "

" सते, माझी तर बाई तुझ्या अगदीं उलट समजूत आहे. पाहिजे तर परीक्षा पहा. " देवी म्हणाली.

" तो प्रसंगच नको. "

सर्व विनोद एकदम सोडून गंभीरतेने पण कळवळ्यानें देवी म्हणाली, " सत्यबाले, गृहिणीपदावर आता तुला आरूढ झालेंच पाहिजे. माझ्या राज्यांतलीं अत्यंत अभिजात आणि अलौकिक कर्तबगारीने नावाजलेलीं दोन्ही स्थळें तुझ्या हातीं आहेत; त्यांतून कोणतें तरी एक तूं पसंत करावेंस अशी माझी इच्छा आहे. "

" यांत जगदानंदबावांचा विचार मला घेतला पाहिजे, " सत्यबाला अर्धवट विनोदानेंच म्हणाली.

३

जगदानंद ही एक विभूति होती. निर्द्वंद्व, नित्यसत्त्वस्थ, निर्योगक्षेम आणि आत्मवित् असा तो महात्मा होता. त्यांची निरिच्छ आणि निष्काम वृत्ति होती. सुखाची आणि दुःखाची भावना त्यांना सारखीच होती. त्याच्या निरिच्छ वृत्तीनेच त्यांना सर्व आसमंतात् पूज्य मानीत असत. जवळ जवळ दोन तपें ते विलासदुर्गाच्या आश्रयास असलेल्या अरण्यांत आश्रमवास करून होते. सत्यबालेच्या मातापितरांनीं त्यांना आपलें गुरुपद दिलेलें होतें. सत्यबालेला जगदानंदाचा बाळपणापासून लळा लागलेला होता. ती एकाकिनी

देखील त्यांच्या पुण्याश्रमपदास जाऊन रममाण होत असे. मातृपितृविहीन होऊन सकलैश्वर्यस्वामिनी झाल्यावर देखील तिची स्वामिजींच्या ठायीं असलेली सत्यवृत्ति रतिमात्र कमी न होतां कांकणभर वाढतच होती. कोणतेंही काम असो, मग तें अत्यंत क्षुल्लक असो वा अतिशय महत्त्वाचें असो, सत्यबाला त्यांना विचारल्याशिवाय केव्हांही करीत नसे. त्यांनींही पण धर्म, अर्थ आणि लौकिक यांना सोडून इतर सल्ला केव्हांही दिली नाहीं. पित्याच्या पाठीमागें जगदानंदबावांचाच काय तो तिला सर्वस्वी आधार होता.

ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमेच्या दिवशीं सकाळच्या सुमारास एकाकीच आपला विश्वासू देहसंरक्षक रणवीर नांवाचा कुत्रा घेऊन तीं जगदानंदांच्या दर्शनास निघाली. तिच्यापुढेंच रणवीर आपले मस्तक आणि जबडा भूमिगत करून सर्व प्रदेशाची जणूं टेहळणीच करीत चालला होता. मधून मधून त्या आनंदमय आणि प्रसन्न अशा रमणीय वनाची शोभा कुतूहलपूरित अंतःकरणानें आणि मनानें अनुभविणाऱ्या आपल्या स्वामिनीकडे साभिमान आणि सानंद होस्साता पाहत होता. तो प्रातःकाल तरी किती रमणीय होता. तें सर्व अरण्य आनंदमय आणि प्रसन्नपूर्ण होतें. वृक्षराजि डुलत होत्या. पक्षी गात होते. फुलें हंसत होतीं. अनिलाचें नर्तन चाललेंच होतें. भगवान सूर्यनारायणाचीं किरणें त्यांना गाढ आलिंगन देत होतीं !

योगीमहाराज आपलीं प्रातःकर्में आटोपून शुचिर्भूत होऊन अग्निनारायणाच्या वेदीसमोर मंत्रघोष करीत बसले होते. सर्वांगाला विभूतिलेपन केलेलें होतें; सत्यबालेनें अभिवंदन करून त्यांचा आशीर्वाद घेतल्यानंतर ज्या गोष्टीचें तिला निवेदन करावयाचें होतें तिचें तिनें अत्यंत नम्रतेनें आणि सरलतेनें निवेदन केलें. स्वामिजींनीं तिला काय सल्ला दिली तीं गुप्तच राहिली. रणवीर मात्र तेथें परका श्रोता होता; पण त्याला वाचा नव्हती; पण वाचा असली तरी स्वामिनीच्या मर्जीविरुद्ध त्याच्या तोंडून शब्दोच्चार देखील झाला नसता.

स्वामिजींना अभिवादन करून बाला परत दुर्गाकडे वळली. आश्रमापासून बऱ्याच अंतरावर आल्यावर रणवीर एकदम गुरगुरूं लागून आपल्या स्वामिनीच्या हाताखालीं येऊन उभा राहिला. त्या ठिकाणीं रस्ताही जरा अरुंद आणि गर्द अरण्याचा होता. ज्या दिशेकडे पाहून रणवीर गुरगुरत होता तिकडे सत्यबालेनें नजर फेंकली तों मानाजीराव शिकारी वेषांत आपल्याकडेच येत आहे असें तिनें पाहिलें. मानाजीराव अगोदरचाच देखणा, त्यांत त्यानें केलेल्या



धुंर्दांतच तो पुढें झाला; आणि सत्यबालेचा हात जोरानें खेंचीत म्हणाला, " सखे, तुझा विचार काय आहे ? "

मृगयावेषानें त्याचें सौंदर्य तर अधिकच खुलून दिसत होतें. आपल्याला पाहूनच सत्यबालेच्या चर्येत मोहक फरक झाल्याचा त्याला भास झाला. आपल्या अपूर्व सौंदर्याचा आणि श्रीमंतीचा तिच्या मनावर आपल्याला हितकर असाच परिणाम झाला आहे या विचारांनीं फुलून जाऊन त्यानें त्या संधीचा फायदा घेण्याचा निश्चय ठरविला. मोठ्या ऐटीनें तो पुढें झाला. त्यानें तिला प्रणाम केला. शक्य तितकी आपल्या आवाजांत आणि अंगविक्षेपांत मोहिनी ओतीत त्यानें आपल्या प्रणयाचें निवेदन केलें. शेवटीं तर गुडघ्यावर बसून आपलें उत्तमांग त्या अखिल सौंदर्याभिषिक्त महाराज्ञीच्या चरणकमलीं नम्र करून तो तिच्याकडे प्रेमार्द्र दृष्टीनें पाहूं लागला.

हा हास्यकारक प्रकार आणि ती प्रणयभाषा पाहून व ऐकून सत्यबालेला संताप आला; आणि त्यास तुच्छ करून आपण निघून जावें असा विचार तिच्या मनांत आला. न जाणो आपण निघून जाऊं लागलों तर याचा अपमान होईल; आणि अपमानाच्या रागाच्या भरांत येथें अधिक प्रसंग होईल या विचारानें तिनें एकवार त्याच्याकडे भयंकर तिरस्कारानें कटाक्षप्रेक्षण करून आपली दृष्टि रणवीरकडे वळवीत म्हटलें " रणवीर, चल. " कामी मानाजीराव आपली प्रेमकथा पुन्हा लुब्रेपणानें सांगत तिच्या मागें जाऊं लागला. पण सत्यबालेनें त्याच्याकडे नुसता दृष्टिक्षेप देखील केला नाहीं. आपल्या विनवणीचा अनादर होत आहे असें पाहून मानाजीरावाला घुस्सा आला आणि त्या घुस्स्यांतच तो म्हणतो, " सत्यबाले, तुझ्या तोंडांतून एकही शब्द निघत नाहीं काय ? "

सत्यबाला स्तब्धच ! रणवीर पुढें सत्यबाला मागें. दोघांचेंही आक्रमण याप्रमाणें चालूंच होतें.

" ज्याप्रमाणें अभिजात कुलांत तुझा जन्म तसाच माझाही आहे. ईश्वरकृपेनें अलोट संपत्तीचा मी एकटाच मालक आहें. इतरांपेक्षां मी मर्द असून अत्यंत देखणाही आहें. मग मी तुझ्या योग्यतेचा नाहीं काय ? "

सत्यबालेनें विकट हास्य मात्र केलें !

मानाजीराव त्राग्यानेंच म्हणतो, " सत्यबाले, आशेचें अगर निराशेचें उत्तर आज तुझ्यापासून घेतल्याशिवाय मी तुला जाऊं देणार नाहीं. आज माझ्या आनंदाचा किंवा दुःखाचा शेवटचा दिवस आहे. "

सत्यबालेनें नागिणीप्रमाणें फणफणत क्रुद्ध दृष्टिक्षेप मात्र केला, तिची मुद्रा संतापानें उद्दीपित झाली होती.

पण अभागी मानाजीरावाची समजूत अगदीं उलट झाली. जळजळीत अंगार एखाद्याला माणकासारखा वाटावा तसेंच मानाजीरायाला वाटलें. तिची संतप्त मुद्रा त्याला अनुरागानें व लज्जातिशयानें उद्दीप्त झाल्यासारखी वाटली. तिचा तो क्रुद्ध कटाक्ष त्याला पूर्ण प्रेमानें ओथंबलेला दिसला. ह्या वेळपर्यंत सत्यबाला पुढें चालली होती आणि मागें मानाजीराव लघळपणा करीत चालला होता. कामातुर खरोखरीच भय आणि लज्जा यांचा त्याग करतो इतकेंच नव्हे, तर दाक्षिण्य, शील आणि मर्दपणा यांवरही तिलांजलि देतो यांत संदेह नाहीं. मानाजीरावाची स्थिति अशीच झाली. गर्द आणि निर्मनुष्य अशा अरण्यांत एकाकिनी त्यातून असहाय अशा अबलेशीं लगट करणे हें कोणत्याही नरजातीच्या मर्दपणाला शोभण्यासारखें नव्हतें. पण हा विचार त्याला सुचला नाहीं. आपल्या हातून न्यायदेवतेचा, धर्माचा, आपल्या मर्दाईचा आणि शीलाचा खून पडत आहे हें तो विसरून गेला. सत्यबालेच्या सौंदर्यानें त्याला धुंद केलेलें होतें. त्या धुंदींतच तो पुढें झाला. आणि सत्यबालेचा हात जोरानें खेचीत म्हणाला, " सखे, तुझा विचार काय आहे ? तूं माझी होशील ना ? नव्हे तुला माझी झालेंच पाहिजे ! तुला मी आपलीशी करणार ! बोल बोल ! "

डवचलेल्या नागिणीप्रमाणे फूत्कार टाकीत त्याच्यावर विषदिग्ध नेत्रकटाक्ष फेंकीत आपला हात हिसकावून घेत सत्यबाला म्हणाली, " रणवीर-रणवीर धांव ! "

आपल्या स्वामिनीचा हुकूम होतांच तो जबरदस्त इमानी कुत्रा एकदम मानाजीरावावर झेंपावला. भीषण गर्जना करून त्यानें आपले पुढले पाय मानाजीरावाच्या खांद्यावर रोखले; आणि त्याच्या नरडीला आपल्या तीक्ष्ण दांताचा जणूं पेषकबज त्याने चढविला. क्षणाचा-एका क्षणाचाच विलंब झाला असता तर रणवीरानें मानाजीरावाची नरडी काढून फोडून त्याच्या ताज्या रक्ताचें यथेच्छ पान केलें असतें ! त्याची उडी पडतांच मानाजीराव मागें सरला आणि जिवाच्या आत्यंतिक आसक्तीनें जिवावर उदार होऊन सर्व शक्ति एकवटून त्यानें रणवीरला मागें ढकलून दिलें; व चटकन् आपली कट्यार त्यानें सरसावली. कुत्रा पुन्हा उठला व पुन्हा त्यानें मानाजीरावावर चाल केली; पण इतक्यात त्याच्या दोघांमध्यें एक मूर्ति प्रगट झाली आणि तिनें रणवीरला मागें खेंचून धरलें. संतापलेल्या मानाजीरावानें रणवीरवर त्याला बाजूला केला असतांही एक कट्यारीचा वार केलाच.

ती मूर्ति कोण होती ? त्या दोघांच्यामध्यें ती कां आली ?

" मानाजीराव " ती मूर्ति अत्यंत तिरस्कारानें कर्कश आवाजांत म्हणाली, " कुत्र्याशीं द्वंद्व ! वाहवारे बहादुरी ! कुत्र्याला मानवाशीं संग्राम करण्याचा अति थोर मान मिळावा आणि तुला त्याच्याशीं युद्ध करून कुत्र्याच्या जातीचा मान मिळावा ठीक ठीक ! "

" घातकी अजय, तूंही येऊन जा ! " मानाजीराव आपली कट्यार परजीत म्हणाला. " वनवराहाची शिकार करण्याचें माझें शील आहे. त्या कुत्र्याला मी प्राणदान दिलें आहे. तुझ्यासारख्या वराहांना माझ्या हातून मृत्युदान मिळत असतें ! "

" तेंच पाहावयाचें आहे. " अजय आपली समशेर परजीत म्हणाला. तरवारीचें म्यान तोड आणि सामोरा हो. संभाळ. "

" माझ्यापाशीं तरवार नाहीं, फक्त कट्यार उरली आहे. तुझ्यापाशीं कट्यार असेल तर काढ. आपण कट्यारीनेंच लढूं ! " मानाजीरावानें उत्तर दिलें.

" कट्यार नाहीं. "

" ठीक आहे, तर मग आज रात्रीं सामना होऊं दे. "

" कोठें ? "

" यमुनेच्या पुलावर. "

" केव्हां ? " अजयनें विचारलें.

" अजय, भूतपिशाचें स्वैर संचारासाठीं आपल्या थडग्यांतून रात्रीं बाहेर पडतील त्या वेळीं. " आपल्या प्रतिस्पर्ध्याकडे तीक्ष्ण नजरेनें आपल्या बोलण्याचा काय परिणाम होतो तो पाहत मानाजीरावानें म्हटलें.

किंचित् सकंप आवाजांत अजयनें विचारलें, " शस्त्र कोणचें ? "

" तरवार–तरवार–तरवार ! "

" ठीक आहे. माझ्या तरवारीपासून अखिल पिशाचगण तुझें रक्षण करूं शकणार नाहींत. "

" उलट ते आपल्या प्रीतीचें कवच मला चढवितील आणि माझ्या तरवारीच्या धारेंत भयंकर कौशल्य ते ओततील. अजय, भुतांचें–मनुष्येतरांचें सामर्थ्य अगम्य आहे. " मानाजीराव म्हणाला.

एकमेकांचा कंठनाल चिरूं पाहणारे ते प्रतिस्पर्धी वियुक्त झाले. रणवीर आपलें कार्य संपतांच आपल्या स्वामिनीकडे रुधिरस्रावी जखम घेऊन निघून

गेला होता. अजयची आणि मानाजीरावाची गाठ पडलेली सत्यबालेनें पाहिली होती. दोघांच्या तरवारी द्वंद्वांत खणखणणार हें ती जाणून चुकली.

" नीच मानाजीराव ! " रणवीरची जखम धुवून बांधीत असता ती आपल्याशींच म्हणाली. " माझ्या लाडक्या, एकनिष्ठ आणि इमानी सहचरावर तरवार चालविलीस काय ? अजय-अजय आपली समशेर काढ आणि माझ्या अपमानाचा सूड घे, कीं, हा देह सर्वस्वी तुझा झालाच म्हणून समज. "

४

अजय प्रत्यक्ष ते शब्द श्रवण करण्यास तेथें हजर नव्हता; पण आपल्या प्रतिस्पर्ध्याचें द्वंद्वाचें आव्हान स्वीकृत करण्यांत त्याची जी उत्कटता दिसून आली, त्यावरून सत्यबालेच्या वरील शब्दांचा प्रतिध्वनि त्याच्या अंतःकरणांत उद्भुत झाला कीं काय नकळे. त्याचें नयनयुगल भीषण दीप्तीनें तळपत होतें आणि त्याची समशेर तरतरून उतावीळ झाली होती. त्याच्या डोळ्यांत भयंकर तिरस्कार आणि त्याच्या तरवारीच्या तीक्ष्ण धारेवर मृत्यूचें वास्तव्य होतें.

सर्व विश्वावर रात्रीचा पडदा पडला. यमुना नदी वायूशीं क्रीडा करीत-खेळत खेळत-गात-सलील वाहत होती. चंद्रराज तिच्याकडे पाहून हंसत होता. सर्व तीरावरचा वृक्षगण तिच्या आनंदमय नृत्यांत रमून डुलत होता. इतक्यांत मध्य रात्रीच्या समयाचा चौघडा त्या शांत प्रदेशांत दुमदुमूं लागला. त्या विस्तीर्ण-अनंत-अपार आकाशाच्या उदरांत तो दुंदुभिनाद विलीन झाला असेल नसेल तोंच यमुनेच्या पुलावर दोन सशस्त्र व्यक्ति एकमेकांकडे अत्यंत क्रुद्ध दृष्टीनें पाहत मुखावाटे एक शब्दही न बोलतां एकमेकांकडे जात होत्या. त्या प्रतिस्पर्ध्यांचा अनन्य तिरस्कार शब्दवाच्य नव्हता. तरवारींच्या खणखणाटांतून उसळणाऱ्या जळजळ ठिणग्यांच्या योगानेंच त्याचें भयंकर स्वरूप दिसत होतें. मुखांतून शब्दोच्चार होऊन त्याकडे लक्ष वेधून सूडाच्या तृप्तीचें काम अपुरें राहील, या शंकेनें, ते श्वासोच्छ्वास देखील जोरानें करीत नव्हते. त्यांचे कराल करवाल आपली मस्तकें उंचावून एकमेकांकडे पहात होते !

" आमरणान्त " अजयनें विचारलें.

" आमरणान्त " मानाजीरावानें उत्तर दिलें.

" आणि आमरणान्त-मरणान्त-रणान्त ! " असा खोल गंभीर ध्वनि त्या यमुनेच्या दोन्ही तटांवर आदळत आदळत त्या रात्रीच्या घोर आणि प्रशांत समयांत दुमदुमूं लागला. जणूं काय तेथील जलासेकता, तीरवृक्ष आणि हवा यांनींच " आमरणान्त " सकंप भीतीचे उद्गार काढले.

" अजय, मानाजीराव म्हणाला, " तुला कांपरें कां भरलें आहे ? "

" तुलाच भरेल " अजयनें उत्तर दिलें. " संभाळ. "

असें म्हणतांक्षणींच अजय मानाजीरावावर तुटून पडला. दोघांना धडका बसल्या. अजयच्या चपलतेपुढें-कौशल्यापुढें मानाजीरावाचा इलाज चालेनासा झाला. एक-दोन-तीन वार एका मागून एक मानाजीरावाला झाले. तो अंतकाळची भयंकर किंकाळी फोडून धाडकन जमिनीवर पडला ! अजयनें आपली तरवार मुक्त केली. आणि पहातो तों तो मानाजीरावाच्या रक्तात सचैल स्नात झालेली असून आपल्या अंगावरही रक्ताचा शिडकावा आलेला त्याला दिसून आला !

तें भीषण द्वंद्व पाहून भीतीनेच जणूं अभ्राच्या पडद्याआड झालेल्या चंद्रम्याचें रजतधवल किरण रक्तात लोळत पडणाऱ्या मानाजीरावाच्या चेहऱ्यावर पडले होते ! हाय ! मानाजीरावाच्या ओठांवर त्या तशा प्रसंगांतही सैतानी हास्य खेळत होतें. कपाळ तिरस्काराच्या आंठ्यांनी फुललेलें होतें. पापण्याही संकुचित केल्या जाऊन डोळे अर्धोन्मीलित होते. अजय त्याच्याकडे पहात होता—नव्हे त्या देखाव्यावर त्याची दृष्टिच खिळून गेली होती. मानाजीराव-शरीरांत अस्थि नसलेल्या एखाद्या पिशाचाप्रमाणें अत्यंत मंद, स्वस्थ आणि स्थिर गतीनें उठून बसला,—जणूं काय द्वेष आणि सूड प्रत्यक्ष मूर्तस्वरूपाने यमुनेच्या पुलाच्या गर्भातून उठून येत आहेत. रक्तहीन झाल्याने प्रेतकळा आलेले याचे ओंठ हलूं लागले; आणि त्यांतून भयंकर शाप बाहेर पडला !

" सत्यानाश ! अजय तुझा सत्यानाश होईल ! "

" हा विजय तुला कल्याणप्रद होणार नाहीं. पुन्हा तूं या पुलावर ये कीं आम्ही तुझा सूड घेण्यास तयार आहोत. मी आणि मृत्यु ! "

९

दिवस चालले, आठवडे गेले, महिनेही कालाच्या अगम्य प्रवाहांत वाहते झाले. पण आता सत्यबालेंत कितीतरी अंतर पडलें होतें. अपूर्व सौंदर्याला आणि गुणांना विलोभित होऊन तिच्या भोंवती रुंजी घालणाऱ्या तरुण भृंगावलीला तुच्छ मानणारी, आणि किशोरलीला करणारी देवी मनोरमेची बाला आतां पूर्वीची राहिली नव्हती. तिच्या निसर्गमनोहर आणि आनंदोत्फुल्ल मुखकमलावर विषण्णतेची छटा पसरलेली होती. तिच्या गतींतही थोडा विभ्रम दृष्टोत्पतीस येऊं लागला. तिच्या एकंदर चित्रांत कारुण्याची आणि कोमलतेची

झांक मारूं लागली होती. दरबारांतील ऐश्वर्य आणि वैभव हीं तिला मकोशीं होऊन आपल्या विलासदुर्गासारखा एकांतवासच तिला प्यार वाटूं लागला. ज्या ठिकाणीं अगर एकांतांत मनाच्या स्वैर लीला आणि चिंतन अनिरुद्ध चालेल अशा निवासाचा आश्रय करण्यात तिची उत्कटता दिसून येऊं लागली. मग सत्यबाला प्रणयिनी तर बनली नाहीं ना ?

अजयचीही स्थिति पालटली होती. त्याचा तापट स्वभाव आतां बराच मवाळ झाला होता. परक्या माणसाला त्याच्याजवळ येतांना अगर किंचित् सलगी करतांना जी धास्ती वाटत असे ती आता वाटेनाशी झाली होती. त्याच्या मुखावर मार्दवतेचें प्रतिबिंब उमटल्याने पहिलें उग्रपणाचें बिंब पार विलयाला गेलेलें होतें. त्याची अंतर्वृत्ति सत्यबालेला आपण अगदींच परके नाहीं तर तिच्या हृदयांत आपल्याविषयीं मधुर विचार खास आहेत असें सांगत होती. त्याची आणि सत्यबालेची भेट क्वचितच होत असे, आणि झाली तरी एक दोन शब्दांपलीकडे ती केव्हांही लांबली नाही. अशा वेळीं अजयचीं नयनेंद्रियें तिच्या अनिर्वचनीय अमृततुल्य अधरोष्ठींचें पान करीत असत. त्याची प्रीति दर्शनी नव्हती कवींच्या अंतःस्फुरण पावणाऱ्या दैदीप्यमान आणि पूततम प्रीतीप्रमाणें स्वर्गीय होती. कवींला स्वर्गीय आणि परिपूर्ण एकलय अशी प्रीति हवी असते. अजयची प्रीति तशी होती. पण ती अजयला मिळेल का ! अजय धन्य होईल का ?

सर्वसाधारण नियमाप्रमाणे शूर अजयलाही हितशत्रु होतेच. मानाजीरावाचा छिन्नविच्छिन्न मुर्दा यमुनेच्या पाण्यावर तरंगत तरंगत किनाऱ्यावर येऊन पडलेला त्याच्या मित्रांना आढळला होता. कोणत्या ठिकाणीं आत्महत्या केली गेली किंवा कोणाचा रक्तपी हात त्याला मारण्याला उद्युक्त झाला या संबंधाची जितकी पूसतपास त्या काळीं होणें शक्य होतें तितकी झाली; पण ती सारी व्यर्थ झाली. अजयवर उडत उडत आरोप आणि दूषणें त्याच्या शत्रूंकडून देण्यात येत होतीं. यमुनेच्या पुलावर जाण्याचें शक्य तितक्या सबबी काढून अजयची टाळाटाळी करणें हें त्याच्या हातीं एक कोलीतच लागलें होतें. त्यायोगें पुलावरच अजयच्या हातून मानाजीरावांचा खून झाला असा जनप्रवाद सुरू झाला.

इकडे देवी मनोरमा अपत्यवत् प्रेम असलेल्या सत्यबालेच्या लग्नाविषयीं अगदीं आतुर होत चालली. तिनें सत्यबालेमागें सारखी टकळी चालू केली; पण बाला

अद्यापही मुग्धच राहिली होती; इतकेंच नव्हे तर लग्नाची गोष्ट निघाली की ती विषण्ण झाल्यासारखी दिसे. बिचाऱ्या अजयची स्थिति तर अनुकंपनीय झाली. त्यानें सरकार-दरबार सोडून एकांतवास पत्करला होता. त्या एकांतांत निर्जन अरण्यांत देखील त्याला सत्यबालाच चोहोंकडे दिसूं लागली. तिच्या अनंत मूर्ति अजयच्या भोंवतीं परिभ्रमण करीत होत्या. त्या मूर्ति त्याच्याकडे पाहून मधुर आणि स्निग्ध स्मित करीत. त्या वेळेस अजय आपल्याशींच ओशाळ होऊन आणि मान खालीं घालून बसे. एखादे वेळेस मोठा हिय्या करून सत्यबालेच्या त्या प्रेममय मूर्ति आहेत हे पार विसरून त्यांच्या ठिकाणीं सत्यत्वाचा भाव चिंतून त्यांच्याशीं प्रेमालाप करूं लागे! अशा वेळीं त्या मूर्तींकडून प्रतिभाषण आलें नाहीं म्हणजे मनाची भलतीच समजूत करून घेऊन आपल्याशींच त्रागा करूं लागे. जों जों तो आपलें मन आवरूं पाहण्याचा प्रयत्न करूं लागे तों तों तें बेछूट होऊन जाई. जिकडे तिकडे सत्यबाला! आकाशांत तारकारूपानें सत्यबालेचा निवास; जलांत शांतीच्या रूपानें वास; तर हवेंत चपलतेच्या गुणानें वास! सर्वत्र सत्यबालेचीच प्रतिमा! त्याचें सारें जीवित सत्यबालामय झालें होतें. सत्यबालेच्या प्रेमाचें स्थान आपण आहोंत असें जरी त्याला वाटत होतें, तरी अद्याप कोणत्याही स्पष्ट रीतीनें तिच्या अनुमतीचें दर्शन झालें नव्हतें. अजयला ही स्थिति दुःसह झाली. एकदाचा या गोष्टीचा निकाल लावून त्याबरोबरच आपल्या सुखदुःखाचाही उलगडा करावा या हेतूनें अजयनें आपल्या एकांतांतून सत्यबालेला एक पत्रिका धाडली. त्या पत्रिकेंत सत्यबालेच्या चरणीं त्यानें आपली कीर्ति-आपलें ऐश्वर्य आणि आमूलाग्र-जीवित अर्पण करून पत्रिकेचें उत्तर मागविलें होतें. मागणी स्वीकारली गेली तर अनिर्वचनीय सौख्याच्या आणि निरतिशय आनंदाच्या शैलावर विहार करूं अगर नाकारली गेल्यास नीरस, शुष्क आणि शून्य झालेलें जीवित पत्रागंदा होऊन एखाद्या घोर रणधुमाळींतून फेंकून टाकूं असेंही त्यानें ध्वनित केलें होतें.

एका विशिष्ट परिमाणूपर्यंतच समता स्थिर राहते. त्या परिमाणूवर अधिक एक परिमाणु लादला अगर त्यावर लादला गेला तर त्याचा गुरुत्वमध्य उळमळून ती वस्तु पृथ्वीवर लोटांगण घेते असा एक नियम प्रतिपादन केलेला आढळतो, आणि आपण अनुभवानें जाणतों. त्याचप्रमाणें अजयनें पाठविलेल्या पत्रिकेनें सत्यबालेची स्थिति झाली. आजपर्यंत मोठ्या प्रयासानें तिनें आपला अनुराग अंतःकरणांत दाबून ठेवला होता, त्याला बाहेर पडण्यास अगर त्यांत दाहवून

घेण्यास तिनें वाव दिलेला नव्हता, पण या पत्रानें तिची समता ढळली. तिचा प्रेमसागर उफाळला आणि त्याच्या दुस्तर प्रवाहांत ती सांपडली. पत्र तिनें उराशीं घट्ट धरलें, जवळच असलेलें कलमदान उचललें, कागद घेतला आणि त्या कागदावर आपल्या प्रीतीचें आणि अनुमोदनाचें चिन्ह कायमचें उठविणार. तोंच तिच्या एकांतांत जगदानंदजींची मूर्ति प्रकट झाली. असें अकल्पित येणें साधूजींच्या नेहमींच्या चर्येला अपरिचित असें होतें, नव्हे उलटच होतें. विशेष प्रसंगाशिवाय साधूजी असें आपण होऊन विलक्षांत प्रकट होत नसत. त्यावरून त्यांचें अशा वेळीं प्रकट होणें हें भावी प्रसंगाचें सूचक म्हणून समजलें जात असें. निदान विलासदुर्गाचा तरी असा समज होता खास.

' वत्से, ' अधिकारयुक्त आणि गंभीरवाणीनें स्वामीजी म्हणाले, " बाळे आज तुझ्या मनांत काय विचार खेळत आहेत ते मला कळून चुकले आहेत. तूं अजयची सहधर्मचारिणी होऊं इच्छीत आहेस; पण त्यास माझें बिल्कुल अनुमोदन नाहीं. "

" काय आरले ! अनुमोदन नाहीं ! " आश्चर्यानें बालेनें विचारलें.

" तुला हा विवाह मंगलप्रद होणार नाहीं. "

" कां ? "

" अजयला अंतकालचा भयंकर शाप मिळालेला आहे ! "

" कोणी शाप दिला ? " आतुरतेनें सत्यबालेनें विचारलें.

" मानाजीरावानें ! मानाजीराव अजयच्या हातून मारला गेला असा जनापवाद आहे. "

" गुरुजी, आपल्या बोलण्याचा झोक मानाजीरावाचा खून अजयच्या हातून झाला, असा तर नाहीं ना ? अजयच्या हातून नाच मारेकऱ्यांच्या अपघाताप्रमाणें मानाजीराव खास मारला गेला नाहीं अशी माझी खात्री आहे. त्या दोघांही वीरांचें द्वंद्व, वीरांना शोभेल अशाच समतेवर झालें. मग अजयला आपण खुनी समजतां काय ? मी तर म्हणतें कीं अजय खुनाच्या पापानें कलंकित झाला नसून मानाजीरावासारख्या तरवारबहाद्दरावरही जय मिळविणें म्हणजे अगोदर दैदीप्यमान असलेल्या कीर्तीच्या मुकुटावर एक तेजस्वी रत्नच चढावेंच होय.

" वत्से सते, " खेदकलित पण प्रेमळ आवाजांत स्वामिजी म्हणाले, " या तुझ्या आवेशावरून अजयनें तुला जबरदस्त मोहिनी घातली आहे असें वाटतें. अजयवर तुझें प्रेम जडलेलें आहे का ? "

सद्गद आणि कोमल आवाजांत बालिका प्रेमभरानें म्हणाली, " असें तर खरेंच. "

" पण अजयचें प्रेम तुझ्यावर अढळ आहे अशी तुझी खात्री आहे काय ? " स्वामिजींनीं विचारलें.

ती गोष्ट आतां निःसंदेह आहे. असा कोणताही आत्मस्वार्थ नाहीं का, ज्यावर अजय क्षणांत माझ्याकरतां लत्ताप्रहार करून तो दूर ढकलून देणार नाहीं. त्यांच्या अकल्पनीय साहसासारखीच त्यांची प्रीति अकल्पनीय आणि अपार आहे. अजयाच्या प्रीतीचा कस बरोबर लागेल अशी कोणतीही कसोटी जगांत नाहीं. "

सत्यबाला किती तरी आवेशानें बोलत होती. आपल्या बोलण्याचा कांहीं तरी इष्ट परिणाम स्वामिजींच्या मनावर होईल असें तिला वाटून ती त्यांच्याकडे पाहूं लागली. तों स्वामिजींची व्यग्रता आणि विचारगंभीरता अधिकच वाढलली तिला दिसूं लागली. कोणता तरी घोर विचार स्वामिजींच्या मनांत असून तो बोलून दाखविण्यास ते अनमान करीत आहेत. आपण इतकें आतडें कळकळून बोलत असतांही ते स्तब्ध कां बसले ? अजयची परीक्षा पाहण्याकरतां एखादी कसोटी शोधीत आहेत काय ? कोणती कसोटी घ्यावयास ते मला सांगणार ? कां, याहीपेक्षां दुसरा भयंकर विचार त्यांच्या मनांत आला आहे ? असें एक ना दोन हजार तरंग तिच्या हृत्सागरावर उठून झाले. ती महाराजांच्या चेहेऱ्याकडे आतुरतेनें पाहूं लागली. इतक्यांत स्वामिजी म्हणाले, " वत्से, तुम्हा दोघेही नरजातींत तेजस्वी रत्नें आहांत. पण तुमचे गुणधर्म मात्र विरुद्ध आहेत. जल हें जगाचें पोषण आणि वर्धन करणारें आहे. तेज देखील विश्वभरण आणि वर्धन करणारें आहे; पण जलतेजांचा प्रत्यक्ष संगम होतांच तो एकमेकांला मारक होतो. त्यांचा प्रत्यक्ष संयोग जसा एकमेकांच्या विनाशास कारण, तसा तुमचा प्रत्यक्ष संयोग तुमच्या दोघांच्याही नाशास कारण होणारा आहे ! याकरतां तुला या विवाहापासून सौख्य प्राप्त होणार नाहीं ! "

" असे कोणचे आमचे गुणधर्म विरुद्ध आहेत ? "

" बाळे, देवी मनोरमेपाशीं एका काळीं अजयच्या प्रेमाबद्दल काढलेले उद्गार आजमितीस देखील मला खरे वाटत आहेत ! "

" पण आपल्या कसोटीला अजय उतरला, तर मग आपलें अनुमोदन मिळेल ना ? "

" होय, आनंदानें मग मी विवाहाला संमति देईन. "

" ठीक आहे. अजय यमुनेच्या पुलावर जाण्याचें टाळतो असा जनप्रवाद सुरू आहे. त्याच्या प्रेमाची परीक्षा करण्यासाठीं मी आज रात्रींच त्याला तेथें बोलावतें. मग तर त्याची कसोटी होईल ना ? "

" आजचा दिवस जाऊं दे. परवां ज्येष्ठी पौर्णिमा आहे ! त्या दिवशीं मध्यरात्रींस त्याला बोलाव ! "

" ज्येष्ठी पौर्णिमा निवडण्यांतच आपला काय हेतु आहे ? "

" साहसी आणि धैर्यशाली अजयचें अंतःकरण मिन्याखालीं घातलेल्या माणकाप्रमाणें आहे हें दाखवावयाचें आहे. तुझ्या प्रेमापुढें ज्याला अखिल जगतांत स्वार्थ नाहीं—ज्याला तुझ्याकरतां आत्मत्वाची देखील पर्वा नाहीं, त्याच्यांत भूतपिशाचादि अलौकिक दिव्यांची पर्वा न करण्याची हिम्मत नाहीं हें दाखवावयाचें आहे. तूं कितीही स्वर्गीय दिव्य सुखोपभोगाची लालसा त्याला दाखविलीस तरी देखील त्या भूतपिशाचांच्या तांडवाचे वेळीं तो येणार नाहीं. तीं त्याचें धैर्यवान अंतःकरण थरथर कांपावयास लावतील. त्याच्या प्रेमदीपाची ज्योत हेलकावा खाऊन मालवलेली तुला दिसून येईल ! "

६

आपल्या वाड्यासमोरील पर्णकुटिकेंत असलेल्या एका शिलातलावर एकांतप्रिय अजय बसला होता. त्याची दृष्टि सहजगत्या कां होईना ज्या दिशेच्या पडद्या-आड सत्यबालेचा विलासदुर्ग होता त्या दिशेकडे लागली होती. त्याच्या चेह-ऱ्यावर क्षणैक आनंद, क्षणैक उल्हास, क्षणैक उमेद, क्षणैक आशा आणि क्षणैक निराशा याच्या लहरी उमटत होत्या. आपल्या पत्राचें उत्तर सत्यबालेकडून आलें नाहीं. कोणी जासूद नाहीं प्रीतीची दूतीही नाहीं. सत्यबाला विसरली कां ? तिनें अनादर केला का ? आपल्या सौख्याच्या आणि आनंदाच्या मनो-ऱ्यांच्या ठिकऱ्या उडाल्या काय ?

पण त्याची शून्यदृष्टि एकदम जाणीवयुक्त का झाली ? त्याच्या चेहऱ्यावर आनंदाची लहर कां पसरली ? आतुर होऊन त्या क्षितिजाकडे अधिक ताठं-



त्या विस्तीर्ण-अनंत-अपार आकाशाच्या उदरांत तो दुंदुभिनाद
विलीन झाला असेल नसेल तोंच यमुनेच्या पुलावर दोन
सशस्त्र व्यक्ति एकमेकांकडे अत्यंत क्रुद्ध दृष्टीनें पाहत
मुखावाटें एक शब्दही न बोलतां एकमेकांकडे
जात होत्या.

नजरेनें तो कां पाहूं लागला ? कोणी आसूद आला काय ? रणवीर आला काय ? होय, प्रियतम सत्यबालेचा रणवीर, जासूदच होऊन आला होता. ह्या पवित्र आणि गुप्त कार्यावर त्याचीच योजना केलेली होती. रणवीर पर्णकुटि-केच्या टापूंत येतांच अजय अत्यानंदानें उसळून त्याकडे धांवला. हुशार आणि चाणाक्ष रणवीरनें आपल्या दूतपणास साजेल अशा रीतीनें जमिनीवर सपाट बसून आपलें विशाल मस्तक जमिनीवर टेंकून अजयला जणूं प्रणामच केला ! अजयनें निरतिशय प्रेमानें त्याच्या पाठीवरून हात फिरवीत त्याचें मस्तक उचलीत म्हटलें, " बेटा रणवीर ! आपल्या स्वामिनीचा कांहीं संदेश आणला आहेस काय ? "

रणवीरनें अजयकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहत त्याच्या हाताचें अवघ्राण केलें. रणवीर आपली मान त्याच्या हाताला घासूं लागला. जणूं काय त्या कृतीनें तो अजयला आपल्या मानेवरील पट्टा सोडून पाहण्यास सुचवीत होता. त्याची कृति अजयच्या लक्षांत येतांच त्यानें पट्टा सोडून उलगडला, तो त्यांतून पत्रिका बाहेर पडली. अजयला वाटलें, जगन्मोलाचा मोत्याचा शिंपलाच आपण उकलीत आहोंत. त्या पत्रिकेच्या बाह्यागावरच 'वीरभूषण अजयसिंह, यांचे सेवेसी'— अशी मुक्ताफळ अजयला दिसली. भाविकभक्त देवाचा प्रसाद जितक्या आदरभावानें घेतो, किंवा धनलोभी एक पैसा जितक्या उत्कटतेनें आपलासा करूं पाहतो, तितक्या आदरानें आणि उत्कंठेनें, अजयनें ती पत्रिका आपल्या दोन्ही हातांच्या अंजलींत घेऊन शिरोधृत केली.

काय तो आनंद ! त्याच्या विनंतीला मान मिळाला ! सौंदर्यसम्राज्ञी देवी सत्यबालेनें आपला प्राण त्याला ग्रहण करूं देण्याचें अभिवचन दिलें. पण मातृभूदेवतासमक्ष यथाविधि करग्रहण करण्यापूर्वी आपली भेट आणि ती एकांतांत घेण्याची विनंति आहे. अजय त्या आनंदानें जडदेहाचें भान विसरून उच्च-उच्चतम अवकाशांत रमूं लागला. त्या आनंदांत तो आत्मत्व विसरून गेला ! 'सत्यबाले !" आपल्याशींच तो उद्गारला; " तुझा शब्द माझा कायदा आहे—नव्हे तो नीतीचें शासनच होय; आणि तो पाळावयास हा अजय अक्षय तत्पर आहे."

परंतु, पत्रिकावाचन संपतांच त्याच्या मुखावरील आनंदाचा तजेला एकदम अर्धा करपून गेला. संम्मीलनाचा दिवस पौर्णिमा, आणि मध्यरात्र काय ?

" हाय, हाय, " अत्यंत विकल होऊन तो आपल्याशींच म्हणाला, " ही

सौख्याची आमंत्रणपत्रिका कीं मृत्यूचें बोलावणें आहे? ज्येष्ठ महिन्याची पौर्णिमा याच दिवशीं गतसालीं तें भयंकर द्वंद्व झालें ना? त्या द्वंद्वाची ही वर्षतिथिच ना? आणि प्रियेचें मीलन यमुनेच्या पुलावर त्या रक्तानें भरलेल्या जागेवर! मानाजीरावाचा शाप अजून माझ्या कर्णरंध्रांत घुमघुमत आहे. "पुन्हा तूं या पुलावर ये, कीं आम्ही तुझ्या सामन्यास तयार आहों! मी आणि मृत्यु!"

अजय विकल होऊन त्या शिलातलावर बसला! त्याला कळमळल्यासारखें झालें! त्याचा मुद्रा हीरपळल्यानें विवर्णरंग झालेल्या गुलाबाच्या फुलासारखी झाली! कपाळावर घर्मबिंदु चमकूं लागले. पुन्हा एकदां त्याची मुद्रा घोर आणि उग्र दिसूं लागली! तो शून्य आणि भ्रमिष्ट दृष्टीनें सभोंवार पाहूं लागला. पण त्याला त्याच्या शून्य आणि भ्रमिष्ट वृत्तींतून रणवीरनें तेव्हांच जागे केलें. तो इमानी कुत्रा अजयचे हात आपल्या जिभेनें चाटीत होता. अजयचें लक्ष्य त्याच्याकडे जातांच तो भानावर आला. त्याला वाटलें कीं रणवीर संदेशच मागत आहे.

अजयचा कृतनिश्चय झाला. सत्यबालेसारख्या अभिनव सौंदर्यदेवीची आज्ञा अमान्य आणि ती तिच्या एकनिष्ठ भक्ताकडून अमान्य कशी होईल? ज्या घातक विचारांनीं तिच्या मनांत उचल घेतली त्या विचारांची प्रेरणा तिला शुद्ध भावानें झालेली असो किंवा अशुद्ध भावानें झालेली असो; त्याला आपला बळी पडला तरी हरकत नाहीं. पण तिचा शब्द नव्हे आज्ञा, मानावयाची, त्यांत एक रतिभर देखील माघार घ्यावयाची नाहीं. सर्व आसुरी संपत्ति आणि बल हीं जरी त्या कार्याच्या पूर्णतेस आडवीं आलीं तरी तो अडथळा मानाजीरावा-सारखाच कापून काढावयाचा; असा विचार करून त्यानें चटकन 'आज्ञा शिरसा मान्य' एवढींच अक्षरें लिहून ती पत्रिका पट्ट्यांत घालून तो पट्टा पूर्ववत् रणवीरच्या गळ्यांत घालून अजयनें त्याला निरोप दिला.

७

ज्येष्ठी पौर्णिमेचा दिवस प्राचीकडे उगवला; पण त्या दिवशीं निदाघ ग्रीष्मांत तळपणारा भीषण भास्कर कोठें होता? त्याचें असहनीय ऊन कोठें होतें? प्राचीं ज्या तेजांत कढत राहावयाची तें तेज कोठें होतें? त्या प्रातःकालच्या वेळींही भूतलावर गर्द अंधार कां पसरलेला होता? दशदिशा भयभीत झाल्या-सारख्या कां दिसत होत्या? सती सावित्रीचा मंगलप्रद दिवस अमंगल आणि भीतिप्रद कां वाटत होता? प्रातःकालच्या समयीं निसर्गाचा स्तुतिपाठ उच्चतम

स्वरांत गाणारा विहंगमगण कोठें होता? प्रचंड झंझानिलानें उडवून दिला काय?

खरोखरच तो दिवस देवी मनोरमेच्या राज्याच्या इतिहासांत चिरस्मरणीय झाला होता! त्या दिवशींचा तो वारा नव्हता, त्या दिवशींचा तो पाऊस नव्हता, त्या दिवशींचें तें विजेचें तांडव नव्हतें, तर तें सर्व, प्रलयरुद्राचें थैमान होतें! ती वीज म्हणजे रुद्राच्या तृतीय नेत्रांतून विश्वस्वाहाकार करणाऱ्या आगीच्या ठिणग्याच बाहेर पडत होत्या. तो वारा नव्हता, तर क्षुब्ध झालेल्या रुद्राचा तो भीषण फूत्कार होता. आणि मेघांचा गडगडाट म्हणजे स्वर्लोकांत भीषण नाडवाचे वेळीं ऐन रंगांत केलेलें अट्टहास्यच होतें. तो पाऊस म्हणजे रुद्रदेवतेच्या थयथयाटानें स्वर्गस्थ उदधींचें आकाशरूपी तळें रिचवून तें उदधिच पृथ्वीवर उलंडलें होतें असें वाटे!

आप-तेज-वायु आणि या तिघांना आपल्या विस्तीर्ण अंगणांत ठाव देणारें आकाश, या चारी महाभूतांनीं कट करून पृथ्वीतत्त्वाचा संहार करण्याचीच मोहीम आरंभला होती कीं काय नकळे! विजांनीं देवी मनोरमेच्या राज्यांतील नयनमनोहर श्रीचें उत्पाटन करण्याचा धडाका इतक्या एकाग्रतेनें आणि कसून चालविला होता कीं, अशोकवनविध्वंसक हनुमानानें देखील अशोकवनाविध्वंसनाचें काम इतक्या मनापासून केलें नसेल. गोकुळाचा सत्यानास करण्याकरतां कंसानें पाठविलेल्या दूतानें सुद्धां त्या दिवशीं इतका भयंकर वेग धारण केला नसेल, इतका वेग वाऱ्यानें धारण केला होता! इंद्राज्ञातत्पर मरुद्गणांनीं देखील गोवर्धनावर इतकी भयंकर वृष्टि केली नसेल इतकी वृष्टि मेघांनीं चालविली होती! पुराणांनें म्हटल्याप्रमाणें पर्जुधारासारांचा तो पाऊस नव्हता; कारण त्याच्या विरल जलधारा दिसत नव्हत्या तर गगन आणि पृथ्वी यामधील पोकळीच जलराशींनीं तुडुंब भरल्यासारखी वाटत होती!

बादळाचें त्या दिवशींचें स्वरूप फारच भयंकर आणि उग्र होतें. एवढें आकाश पण त्याच्या अपार बाहूंमध्यें देखील मेघ समावूं शकत नव्हते. ते मेघ होते किंवा जलराशींच्या अधोभागीं भडभडणारा वडवानल भीमप्रभंजनानें फुंकून उधळलेला होता त्यामुळें, त्याचा धूम मेघरूपानें आकाशांत पसरला होता कीं काय नकळे. मेघांत दाहेशून्य करणारी ती वीज म्हणजे वडवानलानें धूमाबरोबर बाहेर फेंकलेल्या जणूं ठिणग्याच वाटत होत्या.

पृथ्वीदेवीला पंडितांनीं सर्वसहा हें साभिप्राय आणि अन्वर्थक नांव दिलें आहे यांत शंका नाहीं. गुलामगिरींत खितपणाऱ्या राष्ट्रावर देखील जेतृराष्ट्र जितका

जुलूम आणि धुडगूस घालीत नसेल इतका जुलूम आणि धुडगूस चारी तत्त्वांनीं तिच्यावर चालविला होता. परवश राष्ट्राची दाद जशी कोठेही लागत नाहीं, त्याप्रमाणें दीन धरणीची दाद कोठेही लागत नव्हती. तारा-वीज-पाऊस यांचा धिंगाणा एखाद्या उनाड पोराप्रमाणें स्वैर चालला होता-नव्हे, तिघेही दारू पिऊन झिंगल्यासारखे बेताल कोडत होते.

दुपार उलटली तरी वादळ कमी होण्याचें चिन्ह दिसेना-नव्हे क्षणाप्रतिक्षणीं त्याची चढती कमानच होती ! मनोरमादेवींची प्रजा भयाकुल झाली होती ! इमारतींचें कोसळणें, विजांचें कडाडणें आणि पावसाचा अखंड 'धो धो' असा आवाज यांशिवाय इतर शब्द ऐकण्याचे किंवा ऐकविण्याचें मुष्किल झालें. वाऱ्यानें भव्य प्रासाद डळमळत होते व विजांच्या आणि मेघांच्या गडगडाटानें कंप पावत होते. जणूं काय पृथ्वीदेवी अंतःकरणांत चर्र होऊन भीतीनें कांपतच होती ! इतक्यांत एखाद्या घरांतून भयंकर आक्रोशाचा गलबला उठून इमारतीच्या ढांसळण्याचा प्रचंड आवाज येई; पण क्षणमात्रांत पुन्हा अखंड 'धो' चा आवाज चालू होई !

असल्या भयंकर दिवशीं आणि त्यांतून रात्रीं यमुनेच्या पुलावर प्रियामीलन !

सायंकाळची वेळ झाली. आतां तर वादळाचा भर होता ते ऐन रंगांत आणि जोमांत आलें होतें. राजधानी अर्धी अधिक ढांसळली होती ! मध्येंच एखादे ठिकाणीं विद्युत्प्रहारानें भडकलेला प्रासाद भुमकार करीत आगीच्या लोळासह अंतरालांत फेकलेला दिसे, पण लागलीच तो लोळ विझून केवळ पांढरा बाष्पमय धूमस्तंभ आकाशांत उंचच उंच उभा गेलेला दिसे ! सायंकाळची वेळ. प्रकाश जाऊन घोर अंधार पडला होता ! पण त्या तसल्याही घोर अंधारांत त्या बाष्पमय धूम्रस्तंभाचा देखावा, उमळलेल्या ज्वालामुखीसारखाच दिसत होता. त्या भयंकर रात्रीं कोणाही मर्त्यप्राण्याच्या अंगीं आपलें आश्रयस्थान सोडून बाहेर पडण्याचें धैर्य नव्हतें; आणि अशा रात्रीं अजय यमुनेच्या पुलावर सत्यबालेच्या मीलनाकरतां जाणार !

होय, आणि अजयनें आपला पोषाख चढविलाही. तरवारीचा कमरबंद कसीत अजयची खिन्न आणि विषण्ण, पण साहसी व निश्चयी मूर्ति आपल्या महालांत उभी होती. बाहेर तुफान चाललेलें होतें ! मेघांच्या स्वानितानें आणि वाऱ्याच्या झोतानें त्याचें निवासस्थान आमूलांत डळमळत होतें. पण अजयचें हृदय शांत, स्थिर आणि स्वस्थ होतें. मधून मधून बाहेर चाललेल्या

महाभूतांच्या तमाशाकडे तो पाहत होता; आणि आपल्याशीच तुच्छतेनें हंसत होता. तो खिडकीपाशीं गेला आणि सलील मधुर हास्य करीत उद्गारला, "हे महाभूतांनो ! हा तुमचा खटाटोप व्यर्थ आहे. मला अडथळा करण्याचें सामर्थ्य तुमच्यांत नाहीं. हे वाऱ्या, आज तूं कितीं भवनें-वनें स्थानच्युत केलीस तरी माझ्या हृदयांतून सत्यबालेला स्थानच्युत करण्याचें सामर्थ्य तुझ्यांत नाहीं. हे विद्युल्लते ! आज तूं कितीं बळी घेतलेस तरी माझ्या प्रेमाचा बळी तुला घेतां यावयाचा नाहीं. वा मेघा ! तूं माझ्या आड कितीही जाडीचा अभेद्य जलतट उभा केलास तरी मला तूं माझ्या कार्यांत अडथळा करूं शकणार नाहींस. मी जाणार ! सत्यबालेची आज्ञा शिरसामान्य करून जाणार !"

अजय हंसत खिडकीमध्यें जाऊन उभा राहिला आणि धीक्कृत दृष्टीनें त्यानें एक कटाक्ष बाहेर फेकला.—एकच पण त्या क्षणैक कटाक्षांत त्याला काय दिसलें ? यमुनानदी-ती यमभगिनी-यमस्वरूपिणी होऊन चालली होती ! पुरावर पूर लोटत होते. वाऱ्याच्या तीव्रतेनें उसळणाऱ्या लाटा पुन्हा अधोभागीं खचत नव्हत्या; तर वरवरच उसळ्या घेत चढत होत्या. यमुनेला ऊत आला होता. पात्रांत पाणी न सामावल्यामुळे आतां तें आसमंतात् प्रदेशीं धावूं लागलें होतें. विजयी सैन्य शत्रूचे दुर्ग-किल्ले-कोट-प्रच्छन्नस्थानें सर करीत आपला अंमल गाजवीत पुढें पुढें जसें घुसतें तसें यमुनेचें पाणी तट ओलांडून राजधानीच्या तटाला टक्कर देत वेशींतून-मोहल्ल्यांतून नगरांत शिरलें होतें ! सर्व शहरांत जलसेना पसरून तेथें लुटीचा धडाका सुरू झाला होता !

अजयचें काळीज चर्र झालें ! अशा तुफानांत-अशा जलप्रलयांत-यमुनेच्या पुलावर-प्रियेच्या संदेशाची पूर्ति की प्रियेचें मीलन ! सौख्याचें आव्हान की मृत्यूचें बोलावणें !

पण अजय जाणार ! अजय निघाला ! त्या तसल्याही घोर रात्रीं साहसी अजय निघाला ! ह्या वेळेस अजयची मुद्रा पूर्ण निश्चयी आणि करारी दिसत होती. कृतनिश्चय दर्शविण्याकरतां व सर्वांना तुच्छ लेखण्याकरतां त्यानें आपला अधर दांतांत केला होता ! त्याच्या कपाळावरील यमस्वरूपी आठ्या अत्यंत निगाडत झालेल्या होत्या ! भुंवया वक्र होऊन डोळ्यांवर कलंडल्या होत्या ! अजयची एकाकिनी मूर्ति त्या रात्रीं स्वैर लीलेसाठीं निघालेल्या एखाद्या मनुष्येतर योनिसारखी किंवा कालासारखीच दिसत होती !

रस्त्यांत पाऊल पडतांच कालस्वरूपी अजयची वर्दी देण्याकरतांच जणूं मेघांनीं घोष केला–विजेनें दीप पाजळला–वाऱ्यानें जलधारा पार उडवून दिल्या !

रस्त्यांतून ठिकठिकाणीं गुडघ्या–कमरे–इतकें पाणी चढत उतरत अजय यमुनेचा पूल दृष्टिसमोर ठेऊन चालला होता. कोसळलेलीं घरें–उपटलेले वृक्ष–क्षणोक्षणीं चढणारें पाणी–यांची पर्वा त्याला नव्हती त्याच्या समोर विद्युत भाषणतांडव करीत होती ! त्याच्या शीर्षावर मरुद्गण मेघांचे पर्वतच्या पर्वत ढकलून देत होते. जलधरांचा कोट त्याच्यापुढें उभा केला होता, पण त्यांपैकीं एकालाही अजयला परत फिरावण्याचें सामर्थ्य नव्हतें. अजयचें पाऊल पुढेंच होतें !

अजय एखाद्या पिसाटाप्रमाणें चालला होता. पूल आला. त्यावर पाऊल ठेवलें मात्र. इतक्यांत वरील काळ्याकुट्ट आकाशांतून विश्वाला बधिर करून टाकणारी आरोळी फोडीत एक विजेचा गोळा यमुनेच्या पात्रांत गडप झाला ! त्या आवाजानें आणि तेजानें त्याच्या कर्णाला बधिरता आली ! डोळ्यांना अंधेरी आली ! एक निमिष मात्र तो अचळ राहिला; पण लागलीच पुन्हा अधर दंश करीत पुढें झाला !

यमुनेच्या लाटा पुलावर आदळत होत्या ! पूल डळमळत आहे असें अजयला वाटलें. अजयनें त्या काळ्याकुट्ट अंधेरांत यमुनेच्या पात्रावर दृष्टि फेंकली तों तों कृतांतभगिनी त्या पुलाच्या आडून आपल्याकडे जणूं काय डोकावून पहात आहे असें त्यास वाटलें ! वादळानें उपटलेले आणि पुरानें वाहून आणलेले वृक्ष पुलाला अडकून हेलकावे खात होते. अजयला वाटलें, यमुना देवी आपले कराल हात पसरून पुलाच्या आश्रयास राहिलेला बळीच हुडकून काढीत आहे !

यमुनेचें तें कृतांतस्वरूप पाहतांच अजयच्या मनाला चरका बसला ! त्यानें आपल्या हृदयावर हात ठेवला. जणूं काय कांहीं स्मृतीने होऊन ते स्मृतिशब्द बाहेर पडतां पडतांच तो दाबून टाकीत आहे. कोणते बरें ते शब्द ? अजय, पुन्हा तूं या पुलावर ये कीं, आम्ही तुझ्या सामन्यास तयार आहों, “ मी आणि मृत्यु ! ”

अजयच्या संत्रस्त मनाला पुलावर दोन मूर्ति दिसल्या. मानाजीरावाची आणि त्यानें साहाय्य घेतलेल्या मृत्यूच्या तर त्या मूर्ति नाहींत ना ? मानाजीराव खरोखरीच मृत्यूशीं साथ घेऊन सामन्यास आला काय ? मानाजीरावाचें पिशाच आणि मृत्युच तीं खरोखर आहेत काय ?

अजयचा विचार डळमळूं लागला ! पुढें पडणारें पाऊल मागें खेंचलें गेलें ! वीराला अनुचित असें पाठ दाखविण्याचें काम करावें का ? सत्यबालेचें प्रेमकवच आपल्या अंगात नाहीं काय ?

अजयच्या खळबळलेल्या मनांत असे विचार येत आहेत; त्याची दृष्टि समोरील भ्रममय मूर्तीवर अचल राहिलेली आहे; तोंच आकाशांत तीव्र तेजानें विद्युत्प्रकाश पाजळला गेला. त्या दिव्यप्रकाशांत त्याला भ्रममयी मूर्तिऐवजीं खरोखरीच शरीर धारण करणाऱ्या दोन मूर्ति दिसल्या ! पण त्या कोणाच्या ? मानाजीरावाची किंवा मृत्यूची मूर्ति त्यांत होती काय ?

नव्हे त्या मूर्तींतली एक मूर्ति हृदयोल्हासिनी सत्यबालेचीच होती. आणि कनकानकषास्नग्धा विद्युत्सखी सत्यबाला आपणाकडेच येत असलेली त्याला दिसून आली. त्याच्या पूर्वींच त्याचें स्वागत करण्याकरता ती तेथे आलेली होती. तिनें धवलवस्त्र परिधान केलेलें होतें. या वेळेस पाऊस झिमझिम पडत होता, पण वारा तमाच जोराचा वाहत होता. त्या वाऱ्यावर तिचा पदर क्रीडत होता. तो पदर नव्हता, तो प्रेमाचा ध्वज होता आणि तो आपल्या लाडक्या प्रेमाला मोठ्या आनंदानें आणि उतावीळपणानें बोलावीत होता.

अजयची आतां आनंदानें आणि सुखानें जणूं समाधिच लागून गेली. आतां केवळ मीलन नव्हे तर अननुभूत अशा प्रेमाच्या अमृतोदधीचा रसास्वाद, लुटावयास मिळणार ! अहाहा ! दोन्ही हात पसरून सत्यबाला अजयकडे धांवत निघाली ! अजयचे दोन्ही हात प्रगत झाले ! दोघांचे मीलन होणार ! जिवांशिवाचा अभेद्य संगम होणार ! आत्म्याला आत्मा मिळून सर्व एकमेव आणि अद्वितीय होणार ! एकच क्षण–एकच निमिष–पण हाय !

पुलाच्या तटाला अडकलेला वृक्ष खंडला; आणि त्यानें आपलें प्रचंड शरीर त्या दोघां प्रेमी जनांत आडवें लोटून दिलें. पडतांना वृक्षानें जो भीषण ध्वनि केला त्याचा ध्वनि प्रतिध्वनि घेत आसमंतात् मार्गी उसळला. अजयला वाटलें, " मी आणि मृत्यु ! " असाच ध्वनि उठत आहे !

पाणी चढलें. एकामागून एक असे अडकलेले वृक्ष खंडले ! पूल हदरूं लागला ! आकाशांत प्रचंड गडगडाट झाला ! सर्व विश्व एकदम भडकून जळल्यासारखें वाटूं लागलें ! पण हा दुसरा आवाज कशाचा ? पाण्याला एकदम जोर कसा आला ?

" अजय ! अजय ! " हृदयभेदन करणारी आर्त किंकाळी एकदम दुमदुमूं लागली ! " अजय ! धांव-धांव अजय ! "

अजय आणि सत्यबाला यांनीं अलौकिक प्रेमानें शृंगारलेल्या प्रेममहालांत प्रवेश करण्याकरतां प्रेममहालाच्या प्रवेशद्वाराला हात घातला. आतां प्रेमाचा दिव्य सुखमय महाल उघडला जाणार; आणि तें पवित्र आणि प्रणयी युग्म आनंदाच्या विलासात मग्न होणार ! पण कोण्या दुष्टाने त्यांचा प्रवेशद्वारावरील हात मागें सारला ? कोण्या दुष्टानें त्यांचा प्रेममहालच ढांसळून टाकला ? कोणी त्यांचा विरस केला ? मानाजीरावाच्या पिशाचानें कां ? मानाजीरावाच्या शापानें कां ? पुन्हां तूं या पुलावर ये कीं आम्हीं तुझ्या सामन्यास तयार आहों ! " मी आणि मृत्यु ! "

पुन्हा वृक्ष लवंडले ! पुलाची कमान कलंडली ! यमुनेनें पूल लोटून दिला ! पाण्याला स्वैर रस्ता झाला ! वृक्ष-पाणी भीमवेगानें लोळत-उसळत, नव्हे यमुनाच विजयभरानें उन्मत्त होऊन नाचत खिदळत पुढें धुसली ! अजय आणि सत्यबाला दोघेही त्या उसळणाऱ्या जलप्रवाहात पडली ! हाय हाय ! एकमेकांसन्निध असतां दैवानें त्यांना एकमेकांजवळ देखील मरूं देण्याचें नाकारलें ना ! अजयच्या दृष्टीस पुन्हा एकदांच आपल्या प्रियतम सत्यबालेचा पाढरा पदर पाण्याच्या लाटेबरोबर गुंडाळत असतांना दिसला. सत्यबाला जवळ आहे. आपण आतां तिला आपल्या हातावर झेलून घेऊं आणि हा क्षुद्र प्रवाह जवांमर्दीनें तोडून जाऊं ! अजयला केवढी आशा होती !

" सत्यबाले, प्रिये घाबरूं नको ! " अजय ओरडून म्हणाला.

परंतु, हाय हाय ! पुलाची एक कमान उलंडताच मागाहून भराभर पुढच्या कमानी लवंडूं लागल्या. अजयला वाटलें कीं, मानाजीरावाचाच कराल आणि प्रेममय हात आपल्या अंगावर पडून तो आपल्याला नदीच्या तळाशीं चेपीत आहे. त्याच्या डोक्यावर आदळणारा वृक्ष त्याला मानाजीरावाचा हात वाटला ! अजयचें रुधिर यमुना प्राशन करूं लागली !

त्या रात्रीं कृतांतभगिनी यमुना मनोरमादेवीच्या राजधानीचा भाग घेऊन कृतार्थ झाली ! पृथ्वीच्या पाठीवरची ऐश्वर्यवान् नगरी यमुनेने आजिबाद पुसून टाकली !

दिवस उगवला ! सूर्यनारायण जणूं भीतभीतच पूर्वेच्या गवाक्षांतून डोकावून पाहत होता. ओसरून गेलेल्या यमुनेच्या तीरावर एका कोमल बालिकेचा

चेतनाशून्य देह पडलेला होता. तिच्या मुखावर भीषण पांढुरता आलेली होता. तिच्या अस्ताव्यस्त झालेल्या केशांतून जलस्राव अद्याप चाललेला होता. तिचा देह कर्दमालेप झाला होता. ती बालिका कोण होती ? ती अभागी सत्य-बालेशिवाय दुसरी कोण असणार ? अशल्या प्रलयकालीन महापुरांतून तिला वांचविणारा तिचा इमानी दास रणवीर तिच्या सन्निध होता. पण अजय कोठें ? प्राणदीप कोठें ?

शेवटीं बालिकेनें आपले डोळे उघडून सभोवार नजर फेंकली; पण आपण कोणत्या अत्यवस्थ स्थितींत आहोंत, आपणावर केवढा दुर्धर प्रसंग ओढवला आहे याचें भान तिला नव्हतें. थोड्या वेळानें तिला पूर्वस्मृति होऊं लागली. त्या स्मृतीनें तिला तिच्या दैवदुर्विलासाची पूर्ण जाणीव करून दिली ! रण-वीराच्या गळ्यांत मिठी मारून ती मुक्तकंठानें रुदन करूं लागली !

" रणवीर ! रणवीर ! मला चांडाळणीला कशाला रे वांचविलेंस ! "

ती विलपत पुढें म्हणाली. " अरे ज्यांच्या मरणाला मी कारण झालें-नव्हे मीच ज्यांना मारलें त्यांना का तूं वांचविलें नाहींस ? रणवीर, ते कोठें आहेत ? अजय कोठें आहेत ?

सत्यबाला भ्रमिष्टासारखी त्या तीरप्रदेशावर भटकूं लागली. जिकडे तिकडे दलदल आणि पाणी ! जावयाचें तरी कोठें ? इमानी रणवीर पुढें, मागें भ्रमिष्ट झालेली बाला चालली होती ! एखाद्या यंत्राप्रमाणें सत्यबाला जाणीवरहित होऊन त्याच्या मागें चालली होती ! तो सारा प्रदेश तिला अपरिचितच होता. निदान त्या वेळच्या तिच्या दृष्टीवरून-तिच्या गतीवरूनच नव्हे, तिच्या प्रत्येक अंग-विक्षेपावरून-तिला वायूचा झटका झाल्याचें स्पष्ट दिसत होतें. तिच्या सर्वांगाचा दाह होत होता-नव्हे तें तापानें फणफणत होतें ! शेवटीं चालतां चालतां तिचें सर्व सामर्थ्य नष्ट झालें ! ती निश्चेष्ट होऊन तेथेंच पडली !

सूर्य आतां पूर्णपणें उगवला होता. तोही जणूं तिच्या साहाय्यार्थ जगदा-नंदाप्रमाणें धांवत आला होता.

" मला शोष लागला आहे माझा घसा जळत आहे. " सत्यबाला मोठ्या कष्टानें विलपत म्हणाली, " मला पाणी पाजा ! गुरुजी, गुरुजी ! माझा अजय कोठें आहे ?

" देवी सावध हो. मी जर एकाग्र मनानें माझ्या साऱ्या आयुष्यांत एक निमिषभर तपश्चर्या केली असेल-एक निमिषभर जर परमेश्वरध्यान केलें असेल तर तें फलद्रूप होईल. आणि तुझा आणि अजयचा अभेद संगम होईल. "

" बाबा, मरतेवेळीं तरी एक घोंटभर पाणी मला पाजा ! हाय अजय ! "

जगदानंदांनीं तिचें मस्तक आपल्या मांडीवर घेतलें आणि आपल्या कमंडलूंतून पाणी तिच्या मुखांत घालींत क्षितीजावर क्षणभर क्रीडा करणाऱ्या सूर्यनारायणाकडे अविरत नजरेनें पाहत ते म्हणाले: " हे सर्वसाक्षी लोकैकनाथा, विश्वाधारा दयापूर्णा, सत्यबालेला जीवदान दे ! माझ्या हातानें होऊं पाहणारा हा घोर अनर्थ परमेश्वरा तुझ्यावांचून कोण निवारण करील. अजय अत्यवस्थ स्थितींत आहे: पण सत्यबालेनें देह ठेवला तर अजयही जिवंत राहणें शक्य नाहीं. दोन घोर हत्या कां, देवा ! माझ्या शिरावर फोडावयाचा तुझा विचार आहे ? माझ्या चुकीच्या गणिताचा जाणें फलज्योतिषाचा परिणाम, देवा ! या दोघांना तूं काय म्हणून भोगावयाला लावीत आहेस ? माझ्या अपराधाची शिक्षा मलाच पाहिजे. मी ती भोगावयास तयार आहे. देवा ! माझी तपस्या मला या वेळेस पावो. ती फलोन्मुख होऊन अजय-सत्यबाला यांचा हृदयंगम संगम होवो ! माझें सर्व आयुष्य त्यांना लाधो !

स्वामिजींची तपश्चर्या फलवती झाली कां ? त्यांचें गाऱ्हाणें परमेश्वरानें ऐकिलें कां !

* * * * *

वरील गोष्टीस आज दोन वर्षें होऊन गेलीं. आजही सती सावित्रीचा मंगलदिन भूतलावर सुप्रकाशित झाला होता. गेल्या दिवसाप्रमाणें तो भीषण आणि क्रूर नव्हता. गेल्या सालाप्रमाणें आकाश-वायु-तेज आणि आप यांचा पृथ्वीवर रुसवा झालेला नव्हता. इतकेंच नव्हे तर तीं भूतें पृथ्वीदेवीचें कौतुक करीत होतीं. आकाशानें योग्याच्या सदैव प्रसन्नतेसारखी प्रसन्नता धारण केली होती. जणूं काय सती सावित्रीचा जयजयकार त्या अंबरमहालांत व्हावयाचा असल्यानें तो धुवून स्वच्छ केला असून त्याला गाढ नीलिमा दिला होता. समीरण किशोरलीला करीत वसंतानें फुलवून परिणत केलेल्या पुष्पांचा आणि आम्रमंजरींचा आमोद लुटीत नाचत-बागडत होता. तेज, दिव्य आणि लखलखीत असा हेमगर्भाचा पोषाख करून पृथ्वीदेवीस जणूं मुजराच करीत होतें. आप आपला पूर्वीचा खुनशी स्वभाव विसरून पृथ्वीदेवीच्या कंठांत मिठ्या मारून तिच्याशीं मृदुमंजुल गोष्टी करण्यांत गढून गेले होते ! सर्वत्र आनंद होता ! सर्व निसर्ग तिची पूजाच बांधीत होते.

सर्व निसर्ग पृथ्वीदेवीची पूजा बांधीत होतें, तशीच पूजा अत्यंत कृतज्ञ-बुद्धीनें आणि अपरिमित आनंदानें जगदानंदबुवांच्या पुण्याश्रमपदासमोर चालली होती. त्या पूजेचें कौतुक दोन वर्षांपूर्वीची सर्वग्रासी यमुना आपलें अत्यंत निसर्ग मनोहर आणि ललित स्वरूप धारण करून गोड कलरवानें आणि सुधाधवल अशा फेनांबुप्रोक्षणानें करीत होती. वृक्षराजि पवित्र आणि शुद्धप्रेमयुक्त पूजा करणारांवर आपले शाखारूपी हस्त पसरून त्यांना मंगल आशीर्वाद देत आहे. ती कोण आहेत ? जगदानंदाची तपस्या फलवती झाली कां ?

होय ! त्यांची तपस्या फलोन्मुख झाली होती ! देवानें त्याचे गाऱ्हाणें ऐकून अजय सत्यबाला यांचा संगम केला होता. आणि त्या प्रेमर्मीलनांतून जगदानंदांची तपस्या मूर्तस्वरूप घेऊन आली होती. त्या मूर्तिमती तपस्येचें कौतुक रणवीर करीत होता. इतक्यात ती तपस्या रणवीरला सोडून आपल्या मातेच्या गळ्यात विळखा घालून पूजा करण्याचा हट्ट घेऊन बसली. त्या हट्टाचें समाधान करण्याकरता सत्यबाला म्हणाली, " गुरुजी, हिनें दुसऱ्यांची पूजा करावयाची का दुसऱ्यांनीं हिची पूजा करावयाची ! "

जगदानंदबाबा म्हणाले, " अजय, याचें उत्तर दे बरें ! "

अजय प्रेमभरानें त्या मूर्तीकडे पहात निःशब्द राहिला. त्याच्या डोळ्यातून आनंदाश्रु खळखळू लागले, क्षणभरानें तो जगदानंदाकडे पाहत म्हणाला, " गुरुजी, तुमची तपस्याच मूर्तस्वरूपानें अवतरली, मग तिची पूजा आम्हांस नको का करावयाला ? "

जगदानंद आत्मतृप्तीचें हास्य करीत म्हणाले, " ही माझी तपस्या का ? बेटा तपस्ये ! तुझें नांव काय ग ? "

इतक्यांत यमुनेतून आवाज आला, " कालिंदी ! "

अजय-सत्यबाला आणि जगदानंद या तिघांनाही वाटलें कीं, यमुनादेवीनेंच उपमातृपद ग्रहण करून लाडक्या मुलीचें नांव-प्रेमपरीक्षेची खूण यावज्जीव स्मरण-पटांत राहण्याकरता आपलेंच नांव ' कालिंदी ' हे ठेवलें आहे. सर्व वृक्षलता, पक्षिगण, अजयादि सर्व मंडळी देखील म्हणूं लागले, " कालिंदी ! "

---

# आमची आळी.

[ विनोदात्मक लेख ]

( लेखक—बजरबट्ट )





मची आळी ! ' येशील का आमच्या आळीला ? ' हे बाळपणच्या ' गडी फू ' तील सलगीचें पाचारण कोणाला आठवत नसेल ? त्याचा आदरही तशाच सलगीनें कोणी केला नसेल ?

मग गतकाळाच्या गडप झालेल्या दरींत आठवणीच्या आधारानें उलटी उडी मारून, बाळपणच्या आखाड्यांत उभें राहून, वाचक हो, मी जर तुम्हाला हे पाचारण केलें, तर तुम्ही त्याचा आदर कराल कां ? पहा बुवा, तुम्ही दिसतां असेच्या असेच. जर पृथ्वीच्या गर्भांतून एकदम वर आलां नसाल, किंवा आभाळांतून खालीं पडलां नसाल, तर असल्या पाचारणाचा आदर करण्याकरितां, उलटी उडी मारावयाला, पाय मोडतील अशा धास्तीनें तुम्ही कचराल असें मला वाटत नाहीं. तुमच्यापैकीं जर तसें कोणी पाचारण करीत असेल तर मी सुद्धा तयार आहें तुमच्या आळीला यायला.

खरें म्हणाल तर, आजचें माझें पाचारण ' गडी फू ' तील नसून, अगत्यपूर्वक आणि प्रेमाचें असें आहे. पण करावें काय ? ' आमच्या आळीला ' हे शब्दच असे कांहीं चमत्कारिक आहेत कीं, ते पाचारणाच्या कोणत्याही वाक्यांत कसेही घातले तरी बाळपणच्या सलगीच्या वळणावरच जातात ! घरीं कोणाला बोलवावयाचें झालें, तर ' या हो एकदां आमच्या घरीं ' ' आमचें घर तर पहा एकदां ' याप्रमाणें कसें ना कसें तरी अगत्यानें म्हणतां येतें. गांवीं, शेतावर, क्लबांत, समाजांत कोठेंही बोलवावयाचें झालें, तरी प्रसंगाप्रमाणें अनुरूप

वाक्यप्रयोग सहज घालतां येतात. पण तांबडी मोंगली टोपी कोणाही पुणेकरानें घातली, म्हणजे तो जसा हटकून टांगेवाला दिसतो, त्याप्रमाणेंच ' आमच्या आळीला ' हे शब्द पाचारणाच्या कोणत्याही वाक्यांत घाला, त्या वाक्याला हटकून वरच्यासारखें ठरावीक स्वरूप येतें. तेव्हां ज्याप्रमाणें रात्रीं थिएटरांत नाटकाला जावयाचें वेळीं कित्येकांना त्या मोंगली टोपीबरोबर टांगेवाल्याचा दोषही माथीं घ्यावाच लागतो, त्याप्रमाणेंच कोणालाही आपल्या आळीला पाचारण करतेवेळीं बाळपणच्या सलगीचा दोष पतकरणें भाग आहे.

तेव्हां आतां पाचारणाप्रमाणें तुम्हाला आमच्या आळीला घेऊन जावयाचें म्हणजे ती कशी आहे हें प्रथम सांगितलें पाहिजे. कोठें आहे हें सांगण्यांत कांहीं मतलब नाहीं. कारण ' आमची आळी ' ही रानावनांत राहणारावांचून सर्वांना असतेच. तेव्हां कोणत्याही ग्रामस्थाला तिची ओळख पटावयास जड जाईल असें मुळींच नाहीं. ' जीभ ' म्हटली म्हणजे ' तोंडांत ' हें जर सांगितल्यावाचून सहज पटतें, तर ' आमची आळी ' असें म्हटल्यानें तिच्या ठावठिकाणाबद्दल कोणी भांबावून जाईल असें थोडेंच आहे ?

असो. तर आमची आळी ही दुसऱ्या एका सरळ आळीच्या टोंकाला काटकोन करून गेलेली आहे. तिला गोमुखी आळी असें म्हणतात. काटकोनामुळें गोमुखी आळी हें तर खरेंच, पण अशा सर्वच काटकोनी आळ्यांना गोमुखी म्हणत असतील कीं काय याची मला शंका आहे. मला वाटतें, आमच्याच आळीला गोमुखी आळी हें नांव मिळण्याचें विशेष कारण, तिच्यामध्यें केव्हांही इथूनतिथून सगळे रुद्राक्षच भरलेले दिसतात, हें असावें ! माझ्या आठवणींत कांहीं आमच्या आळींत मला कोणी जरा गुबगुबीत, अंग धरलेला, बाळसेदार असा प्राणी दिसला नाहीं. म्हातारेकोतारे हे तर चिरम्या पडलेले रुद्राक्ष असायचेच म्हणा, पण येरवीं बाप्ये, तरणेबांड, पोरें, पोरी बायका—नाहीं, बायकांत केव्हां तेव्हां फरक दिसत असे—पण गुरेंढोरें, कुत्रींमांजरें कोणीही पहा, सगळे आपले हाडकुळे, वाळलेले रुद्राक्ष ! कधीं एखादा पाहुणासुद्धां आमच्या आळींत लठ्ठ असलेला माझ्या पहाण्यांत नाहीं ! एकदां परगांवचा एक कारकून आमच्या गांवच्या मामलेदार कचेरींत बदलून आला, आणि तो आमच्या आळींतच बिऱ्हाड करून राहिला. त्याचें नांव गणपतराव दोंदे आहे असें जेव्हां मी ऐकलें, तेव्हां मी मोठ्या आशेनें त्याला पाहण्याकरितां गेलों. पण

काय ? दोंदेकुळांत जन्माला येऊन, गणपतराव हें नांव धारण करून असे-रींला पहातों तों रुद्राक्षाचा अवतारच ! तरी म्हटलें आमची आळी ! त्यावर एकदां बाबुराव बाबाजी लठ्ठे अशा उघड उघड लठ्ठभारती नांवाचे शिवाय मुन्सफ या बड्या हुद्याचे एक हपीसर आमच्या आळींत राहायला आले होते. पण या लठ्ठ्यांच्या इतका हाडकुळा आमच्या आळींत सुद्धां एखाद दुसराच असेल ! बरें हे नामधारी दोंदे आणि लठ्ठे तरी फार दिवस आमच्या आळींत टिकायचे होते ? वाळक्या शरीरामुळें प्रथम त्यांना आमच्या आळींत थारा मिळाला खरा, पण त्यांचीं तीं गुबगुबीत नांवें तिला सोसेनात म्हणून कीं काय कोण जाणे, उभयतांनाही लवकरच तिला रामराम ठोकावा लागला. त्यांच्यापैकीं जे मुन्सफ होते, त्यांच्या नांवाला कांहीं सरकारी तोहमतीमुळें क्षय लागून ते बड्या हपीसराचे वाळून छोटे झाले. आणि सदेह आळी सोडून स्वर्गाला गेले. म्हणजे स्वर्गवासी झाले असें मात्र नव्हे हां, तर अमरावतीला त्यांची बदली झाली ! आणि दुसरा बिचारा कारकून. त्याच्या देहाला क्षयाची भावना होऊन त्याला मात्र जिवानिशींच आळी सोडून स्वर्गाला जावें लागलें. कां आहे कीं नाहीं आमची गोमुखी आळी !

नाहीं म्हणायला एक अगदीं यथास्थित विशालदेही व्यक्ति मात्र आमच्या या गोमुखी आळींत खमली होती. त्या व्यक्तीचा उल्लेख मी कशा रीतीनें करावा बरें ? वंदन करूनच मला त्या व्यक्तीचा उल्लेख केला पाहिजे. कारण ती व्यक्ति म्हणजे मला चार वेडीवांकडीं अक्षरें लिहितां येतात याचें पहिलें श्रेय ज्यांकडे आहे, ते माझे बाळगुरु भाऊ पंतोजी होत. माझ्या विद्यार्जनाचें पहिलें गणपतिपूजन यांच्यासमोरच झालें. धूळपाटीवर श्री ग णे शा य न मः प्रथमच त्यांच्यासमोर बसून गिरवीत असतां मधून मधून डोळे वर करून त्यांच्याकडे पहात असल्यामुळें, आदल्यावर्षी घरांत आणलेल्या गणपतिबाप्पाचें स्मरण होऊन, मला या गणपतिपूजनाचे वेळीं बिलकूल चुकल्याचुकल्यासारखें वाटलें नाहीं !

पण हे तरी आमच्या आळींत खमले होते म्हणजे काय कीं, त्यांचें विद्यालय फक्त आमच्या आळींत होतें. बाकी रहात होते ते दुसऱ्या आळींतच ! दिवसा-पुरतें मात्र त्यांचें वास्तव्य आमच्या आळींत असे. एखादी रात्र जर कां त्यांनीं आमच्या या गोमुखींत वस्ती केली असती, तर मी खास सांगतों कीं

आमच्या गोमुखीच्या प्रसादानें तेव्हांच त्यांचा रुद्राक्ष वळून, दुसऱ्या दिवशीं त्यांच्या समोर उभें राहून ' विद्या द्यावी गजानना ' असें आम्हाला म्हणतां आलें असतें कीं काय याची मला शंकाच आहे! तरी पण दिवसापुरतें तरी त्यांचें वास्तव्य आणि विशेषतः त्यांचें विद्यालय आमच्या आळींत असल्या-कारणानें आमच्या आळीवर त्यांचा हक्क चालतोच. म्हणून त्यांचें व त्यांच्या विद्यालयाचें अधिक वर्णन ओघानें पुढें मी देणारच आहें तूर्त मी आमच्या आळीकडे वळतों.

आणि खरोखरच वळतों. शाब्दिक नव्हे. आमच्या आळीकडे गोमुखी आळींतून वळसा घालून वळतों. कारण आमचें घर वर सांगितलेल्या काटकोनाच्या अगदीं कोनांत असल्यामुळें, आमची आळी म्हणजे नुसती गोमुखी आळीच होत नाहीं. आमच्या घराचें तोंड गोमुखी आळींत असल्या-मुळें त्याला त्या आळींत धरतात हें खरें, पण घराची सबंद एक बाजू आणि पाठीमागचें लांबच लांब परसूं ही काटकोनाच्या दुसऱ्या आळींत येत असल्या-कारणानें या आळींतही आमच्या घराची जमा होत असे. याप्रमाणें मी जोड-आळीचा आळीकर असल्याकारणानें ' आमच्या आळी ' च्या वर्णनांत मला या दुसऱ्या आळीचाही समावेश केला पाहिजे. या जोड आळीच्या स्वामि-त्वाचा लहानपणीं मला एक फायदा होत असे. अति चिडखोर–भांडखोर-पणामुळें केव्हां केव्हां कांहीं कांहीं मुलांशीं त्यांचे सगळे सोबती त्रासून जाऊन गडी फू करतात आणि मग अशा मुलांना नाइलाजानें आपल्या आपल्याशींच खेळून स्वतांची करमणूक करून घ्यावी लागते, याचा अनुभव लहानाचे मोठे झालेल्या बहुतेकांना असेलच. मला बरेच वेळां असा प्रसंग येई. आणि अशा वेळीं कोणी म्हणून कोणीसुद्धां माझ्या वाऱ्याला देखील उभा रहात नसे. परक्या आळींतील मूलसुद्धां माझ्या दूरवर पसरलेल्या कीर्तीमुळें माझ्या आजू-बाजूला अशा वेळीं फिरकत नसे. तेव्हां मग मीही कोणाची पर्वा न करतां दोन्ही आळया माझ्याच असल्यामुळें, माझा मीच एकदां एका आळींत उभा राहून, दुसऱ्या आळींतील स्वतांला ' येशील काय आमच्या आळीला? ' हें ठराविक सलगीचें पाचारण करी, आणि लागलाच दुसऱ्या आळींत उभा राहून, पहिल्या आळींतील स्वतांला तोच रोखठोक जबाब देई. अशा रीतीनें अगदीं कडक बहिष्काराच्या गडीफूंत सुद्धां ही सलगीच्या पाचारणाची खुम-

तुमी जोड आळीच्या स्वामित्वामुळें, हा आळीपाळीचा खेळ खेळून मला एकट्याला देखील जिरवून घेतां येत असे.*

या आमच्या दुसऱ्या आळीला 'कव्यांची आळी,' असें म्हणतात. 'कव्या' हें 'कवि' शब्दाचें अडाणी रूप असावें अशी माझी ठाम समजूत आहे' उदाहरणार्थ; त्याच भाषेंत 'हरि' चें 'हऱ्या' असें होतें. आणि 'हरि' प्रमाणेंच 'कवि' चे कोणत्याही भाषेंत अवतार किंवा रूपें व्हावयाचीं, असा नियम आहे. तेव्हां 'कव्याची आळी' ही मूळची 'कवीची आळी' असली पाहिजे. किंवा तसें नसेल तर शुद्ध मराठी भाषेमध्यें तिचें तसें भाषांतर होतें असें म्हटलें पाहिजे. आणि रामू कव्या, धोंडू कव्या, नाऱ्या कव्या, हऱ्या कव्या अशीं जीं नांवें या आळींत आढळून येतात, तीं सर्व कविकुलोत्पन्नच होत यांत कांहीं संशय नाहीं. त्यांच्या बायकानाही सीता कवीण, धोंडी कवीण, दगडी कवीण असें म्हणण्याची वहिवाट आहे, त्यावरून देखील माझाच तर्क खरा ठरतो. शिवाय जेथें मुळीं काव्यच जिवंत आहे, तिथें आणखी दुसरें प्रत्यंतर कशाला पाहिजे ? 'कवि' चा 'कव्या' हा अवतार ज्या भाषेंत झाला, त्याच भाषेंत काव्याचा ओघही अजून अव्याहत तथें चालू आहे. मासल्याकरितां कांहीं उतारे येथें देतों.

**बाल कव्यांचे उतारेः—**

१ घरांतील कोंबड्या अंडीं घालूं लागतात, त्या हंगामाचें गाणः—

**एक आंडं पिलूचं । सांवळ्या बालूचं ॥**
**एक आंडं पिलूचं । गंग्य: ब लूचं ॥**
**एक आंडं पिलूचं । ढवळ्या बालूचं ॥ इ० इ० ॥**

याप्रमाणें घरांतील मुलांच्या संख्येप्रमाणें गाण्याचीं कडवीं व्हावयाचीं.

---

* हा आळीपाळीचा खेळ मीच खेळत असें असें नाहीं. लहानथोर सर्वजण हा खेळ खेळत असल्याचें माझ्या चांगलें अनुभवाला आलें आहे, इतकेंच काय पण वयाची किंवा लिंगाची कसलीच चाड अशा प्रकारच्या खेळांना असत नाहीं. कारण जोड आळ्या नसल्या, तरी जोड मनें हीं सर्वांना असतातच. आणि बऱ्यावाईट दोन्ही प्रकारच्या परिस्थितीमुळें, प्रत्येकाला माझ्याप्रमाणेंच आपापल्या जगाच्या बहिष्काराचा कोंडमारा होऊन केवळ मनोराज्यांत मनामध्येंच हितगुज प्रणयसंरंभ, प्रेमकलह, सवालजबाब, बोलाचाली, तंटेबखेडे, हमरीतुमरी, केशाकेशी, दंडादंडी करावी लागते. हे आळीपाळीचे प्रकार नव्हेत काय ?

२ दारावरून कोणी भट-बामण गेला म्हणजे त्याच्या सन्मानार्थ गाणें:—

आला र बामनाचा काका ।
पोरींनो कोंबड्या झाका ॥

**प्रौढ कव्यांचे उतारे:—**

१ गांवांतील वीरेश्वर नांवाच्या महादेवाच्या देवळावरील गाणें:—

घ्या घ्या कुराडी । चला जाऊं डोंगरां ।
इरोबाचें देउल काय बांधायाला । काय चंदन रुक्ष
तोडायाला ॥

२ होळीच्या पोळींवरील गाणें:—

तुला रुपय देतों नऊ । आन याचे गहू
पोल्या कर मऊ ग ऽ ऽ ऽ माझे रंगू ॥

एक म्हातारा आंधळा कव्या होता. तो पहांटे जागा झाल्यावर आपल्या यकोला काव्यबद्ध कामें सांगत असे. उदाहरणार्थ:—

निजलिस काय ग । होना जागी तंबाकु देय ग
बटव्यांत नाय तर गठल्यांत पाय ग
गठल्यांत नाय तर गाडग्यांत पाय ग
गाडग्यांत नाय तर बोडक्यांत पाय ग
निजलिस काय ग । होना जागी तंबाकु देय ग ॥

ता कवीण पहांटे दळणाचे वेळीं जात्यावर गाणीं म्हणत असे त्याचा मासला:—



हिग पाट ग लाची सून । हिग पाट ग लाची सून
हीग पाट ग लाचि सून । लाचि सून ।
लाचि सून । लाचि सून ॥

कधि झाली ग बाळातीण । कधि झालि ग बाळातीण
कधि झाली ग बाळातीण । बाळातीण
बाळातीण । बाळातीण ॥

वरील गाण्यांत 'पाट ग लाचे' किंवा 'लाचे सून' असे जे तुकडे आहेत, त्याबद्दल नवल वाटण्याचें कारण नाहीं. कारण दळण्याचे वेळीं धान्याबरोबरच ओव्यांचेही तुकडे होत असतात. शेवटचे घोळविलेले तुकडे जात्याची दुगण चौगुण करावयाच्या वेळचे आहेत. या ओवींतील पाटलाच्या सुनेप्रमाणेंच ती ओवी म्हणणारी कव्याची सूनही 'बाळातीण' होऊन आपल्या कुळाची परंपरा कायम ठेवो आणि आमच्या आळीचें नांव अखंड राखो!

माझ्या मनाचा ओढा गोमुखी आळीपेक्षां अर्थातच पहिल्यापासून या कव्याच्या आळीकडे विशेष. गोमुखांतील 'रुद्राक्ष' म्हणवून घेण्यापेक्षां कव्याचे आळींतील 'कव्या' म्हणवून घेण्यांत मला साहजिकच भूषण वाटतें. आणि कां नाहीं वाटणार? कारण कुळांत जरी नाहीं, तरी आळींत जन्म झाल्याकारणानें कवितादेवी आळींतून संचार करीत असतां, बाळपणापासूनच तिच्या डोळ्यांत भरण्याची संधि मीं कांहीं वाया जाऊं दिलेली नाहीं! पण अलीकडे मात्र माझ्या कांहीं कांहीं कंदर्परसयुक्त* काव्यामुळें तिला भरतें येऊन तिच्या डोळ्यांतील अश्रुधारांबरोबर तेथून गळून पडण्याची मला भीति वाटत आहे. आणि म्हणून आतां मी तिच्या नाकांतील बाल होण्याची खटपट करीत आहें. कारण केसांची चिकाटी फार असल्यामुळें, जरी शैत्य झालें तरी त्याबरोबर, डोळ्यांतील अश्रूंप्रमाणें नाकांतून गळून पडण्याची कांहीं धास्ती नाहीं. आणि शिवाय, नसती हाव बाळगणाऱ्या कित्येक अहंमन्य कवींच्या काव्याकडे पाहून कवितादेवी जेव्हां जेव्हां नाक मुरडील तेव्हां तेव्हां मलाही तिच्याबरोबर मुरडतां येईल. त्यामुळें मत्सरबुद्धीनें कांहीं कवि-हजाम बेटे! माझी तेथून तासरपट्टी करण्याचा प्रयत्न करतील, आणि कांहीं दुष्टाचार्य मोठ्या शिष्ट-

* कंदर्प म्हणजे कामदेव, पण सामान्य भाषेंत कंदप म्हणजे कांदा. कामरसयुक्त काव्यांत कामविव्हलतेचें वर्णन असलें म्हणजे अश्रु येणें अगदीं अनिवार्य आहे. पण कांद्याच्या रसानेंही डोळ्यांना पाणी येतें. आणि कांहीं कवींच्या चहा, विडी, पानतंबाकूप्रमाणें मला कांदे खाण्याची लज्जत फार असल्यामुळें माझें काव्य तयार व्हावयास कांद्याचा रस बराच लागत असे. त्यावरून माझे सोबती मला कवींच्या कांदा किंवा काव्य कंद असेंही म्हणतात.

पणाचें तपकिरीची डबी कवितादेवीच्या पुढें करून मला तशा रीतीनें सताव-ण्यालाही कमी करणार नाहींत हें मी जाणून आहें. पण त्यांना हें कुठें ठाऊक आहे कीं तिला तपकिरीची लज्जत आहे कीं काय याची प्रथम चौकशी करून मगच मी तिच्या नाकांतील बाल होणार आहें !

आतां कवितादेवीच्या डोळ्यांत भरण्याचे बाळपणापासून माझे कसकसे प्रयत्न झाले ते मी तुम्हाला सांगतों. दृष्टांतानें सांगतों म्हटलें तर आया आपल्या मुलांच्या डोळ्यांत काजळ भरीत असतात, त्याप्रमाणें हुबेहूब ते होते. काजळाची डबी दृष्टीस पडल्यापासून मुलांची चाललेली चुकवाचुकव, मग धरपकड आणि आरडाओरड आणि मग बोटें खुपसून त्यांच्या डोळ्यांत काजळ भरणें हें चित्र तुम्ही डोळ्यांसमोर आणलेंत म्हणजे माझ्या प्रयत्नांची बरोबर कल्पना तुम्हांला येईल. अशा वेळीं जी धडाड चालते त्यामुळें काजळ नुसतें डोळ्यांतच भरून न रहातां, आजुबाजूचा सर्व प्रदेश व्यापून गालांवरही मधूनमधून दृश्यमान होत असतें. त्याला आया गालबोट असें म्हणत असतात. व त्याच्यायोगानें मुलांना दृष्ट लागत नाहीं. माझीं काव्येंही कवितादेवीच्या डोळ्यांत अशाच रीतीनें भरलीं जात असल्यामुळें गालापर्यंत येऊन, कवितादेवीला दृष्ट लागूं नये म्हणून गालबोटाप्रमाणें होत असतात ! हा कांहीं असातसा सामान्य मान नव्हे ! वाग्देवीच्या गालांवरील गालबोट, तिच्या गळ्यांतील बजरबट्टू रुमणी— म्हणजे कंठमणीच तो !—तिच्या नाकांतील बाल,—म्हणजे श्वासोच्छ्वासा-बरोबर अशुद्ध काव्याचा वाराही आंत न जाऊं देण्याकरितां परमेश्वरानें योज-लेलें गाळणेंच !—या कांहीं सामान्य अभिमानाच्या जागा नव्हेत ‘ भासो हासः कविकुलगुरुः कालिदासो विलासः ’ अशा प्रकारें निरनिराळ्या कवींचीं नांवें योजून काव्यात्मक वर्णन करण्यासारख्या जागा आहेत त्या ! †

हे प्रयत्न कसेही झाले तरी वास्तविक कोणतीही विद्या गुरुकृपेवांचून साध्य होत नाहीं. गुरूची कृपा होऊन गुरुदेवतेचा प्रसाद मिळाला म्हणजे शिष्याचे अंगांत अधिकारानुरूप त्या त्या विद्येचा संचार होत असतो. हा संचार कर-विणारी अमोघ, अक्षय्य आणि अभंग अशी विद्यायक्षिणीची कांडी, शिष्यांवर कृपाप्रसाद करण्याकरितां सदैव गुरुजी हस्ताचे ठायीं धारण करीत असतात.

---

† हें काव्यात्मक वर्णन करण्याचे सर्व प्रकारचे हक्क राखून ठेवण्यांत आलेले आहेत. होतकरू कवींना योग्य सवलतीनें मिळूं शकतील.

केवळ विद्युल्लतेच्या झटक्याप्रमाणें तिचा तो स्पर्श शिष्याचे शरीराला करून गुरुजी आपल्या विद्येचा विद्युत्प्रवाह शिष्याचे अंगांत सारखा ओतीत असतात. कविता-देवीचा प्रथम संचार किंवा स्फूर्ति माझ्या अंगांत अशा रीतीनेंच झाली. माझे प्रथम गुरु भाऊ पंतोजी—गुरुदेवतेला नमस्कार असो!—त्यांचा उल्लेख मी आदरपूर्वक पूर्वी केलाच आहे—त्यांनीं जेव्हां कृपाळु होऊन आपल्या हस्तांतील कांडीचा प्रथम स्पर्श माझ्या शरीराला केला—काय तो प्रसंग! अहाहा! गुरुमाउली प्रसन्न होऊन तिनें केलेला प्रसादच तो! लगेच 'आयाई ऽऽ' असा माउलीचा धांवा स्फूर्तीनेंच माझ्या मुखांतून बाहेर पडला. तोच कवितादेवीचा प्रथम संचार! तीच गुरुदेवतेची प्रथम कृपा! तेंच माझें पहिलें काव्य! पण प्रसन्न झालेल्या गुरुमाउलींची शिष्यवात्सल्य कांहीं सामान्य नसतें. शिष्याचें अंगांतील अल्प स्वल्प स्फूर्तीनें गुरुदेवतेचें विशाल हृदय—आणि माझ्या गुरु-देवतेचें कांहीं सामान्य विशाल हृदय नव्हतें!—कसें तृप्त होईल? माझा स्फू-र्तीचा धांवा ऐकून गुरुमाउली म्हणाली, "नुसते 'आयाई ऽऽ' करून काय होतें? अरे बाबा, 'छडी लागे छम् छम्' तेव्हां 'विद्या येई घम् घम्'"! मग काय? 'छम् छम्' आणि 'घम् घम्' विद्येचा सारखा ओघ–ओघ कसला लोंढाच सुरू झाला! काव्यदेवतेचा निःसंशय संचार म्हणायला कांहीं हरकत नाहीं. त्या संचाराचा अनुभव सुद्धां मी आपल्या सोबत्यांना काव्यांतच सांगूं लागलों.

**हरे राम! हरे राम! मास्तर मास्तर हरे राम!**
**राम राम, राम राम, विद्या देवी राम राम।**

(म्हणजे हें प्रसन्न झालेल्या विद्यादेवीला नमन आहे. नाहीं तर समजाल तुम्ही कीं मी विद्यादेवीला हा रामराम ठोकला म्हणून!)

असो अशा रीतीनें काव्यदेवतेचा प्रथम संचार माझ्या अंगांत झाल्यावर, मग पुढें प्रसंगाप्रसंगानें माझें काव्य बाहेर पडूं लागलें. हे कवितादेवीवरील कांहीं कांहीं प्रसंग ओघाओघानें पुढें देण्याचा माझा विचार आहे.

सध्यां गुरुजींच्या विद्यालयांतीलच एखाद दुसरा प्रसंग येथें मासल्याकरितां देतों. आमच्या भाऊपंतोजींच्या विद्यालयांत शिष्यांनीं, गुरुजींच्या किती तरी वेळ अगोदर येण्याची वहिवाट असे. यावरून आम्ही ठरलेल्या वेळेच्या पूर्वी येत असूं असा मात्र त्याचा अर्थ नव्हे. आमच्या विद्यालयाची सकाळची ठरलेली वेळ सूर्योदयाची—म्हणजे सकाळचीं उन्हें पडलीं कीं, सर्वांनीं शाळेंत



छडी लागे छम् छम् ।
* पाणी येई घम् घम् ।

* डोळ्यांतून, नाकांतून, आणि अंगांतून सुद्धां !

यावयाचें. मग कमी अधिक उंचसखलपणामुळें अगर झाडीमुळें ज्याच्या घरीं जेव्हां हीं उन्हें पडलेलीं दिसतील तेव्हां त्यानें शाळेंत यावें. पण आमच्या गुरुजींचें घर जरा विशेषच खोलगट जागेंत होतें. (कदाचित् पिढ्यान्पिढ्या चालत आलेल्या वजनशीरपणामुळें ती जागा खचली गेली असेल!) त्यांतून त्यांचें निजावयाचें खोलीला, उगवत्या बाजूला एकही खिडकी नव्हती. बाकी त्यामुळें आमच्या गुरुजींना उठायला उशीर होत असे, असें बिलकूल नव्हे. ते सूर्योदयालाच बरोबर उठत असत. पण सूर्यालाच त्यांचें घरीं यायला उशीर होत असे, याला त्यांचा काय इलाज! आतां त्यामुळें आम्ही शिष्यांना मात्र विद्यालयांत येऊन सगळ्या आळीच्या कानठळ्या बसेपर्यंत आमचे पंतोजीच उशिरा येतात असें आळीला जाहीर करायला चांगली सवड मिळत असे. म्हणजे सगळ्या आळीला तशा शब्दांनीं आम्ही समक्ष सांगत असूं असें नव्हे, तर आमच्या दंगामस्तीनें आळीला तें आपोआपच कळत असे. शिवाय आमचे पंतोजीही वर सांगितल्याप्रमाणें सूर्योदयाबरोबर उठल्यानंतर लागलीच आमच्याप्रमाणें घाईघाईनें तोंड धुवून शाळेंत येत असत, असें नाहीं. त्यांच्या तोंड धुण्यालाही बराच वेळ लागे. मात्र तें, उठल्याबरोबर, अंथरुणांतच चाले. कारण त्यांची राखुंडी कांहीं आमच्याप्रमाणें कोठेंतरी उकिरड्यावर टाकलेली नसे. तिच्याकरितां एक मोठा थोरला बटवा असून तो नेहमीं गळ्यांतील जानव्याप्रमाणें जवळच ठेवलेला असे. तसेंच आमच्याप्रमाणें ती नुसत्या गोवरीची बनवलेली नसून तिला तंबाकूची भुकटी आणि ओला चुना असे दोन पदार्थ लागत असत. उठल्याबरोबर बटव्यांत हात घालून एका कप्प्यांतून तंबाकूची भुकटी आणि दुसऱ्या कप्प्यांतून एका जस्ताच्या लांबट डबींत असलेला चुना काढून, एका हातावर दोहोंचें मिश्रण करून ती ते तयार करीत. तसेंच त्यांना आमच्याप्रमाणें बोटांनीं दांत घांसावे लागत नसत. तर एकदां तें मिश्रण तोंडांत टाकल्यावर दातांनींच दांत घांशीत राहिलें म्हणजे झालें. पाण्याचीही त्यांना आमच्याप्रमाणें तोंड धुते वेळीं गरज नसे. वर सांगितल्याप्रमाणें कांहीं वेळ दातांनीं दांत घांसणें झालें कीं, त्यानें आपोआप तोंडांत पाणी उत्पन्न होत असे. आणि मग दोन तीन वेळ त्याच्याच गुळण्या--पिचकाऱ्या म्हणतात त्यांना—गादीवरूनच खिडकीबाहेर, भिंतीवर अगर कोपऱ्यांत टाकून मग आमच्या पंतोजींची स्वारी अंगावर एक दुहेरी धोतर, डोकीला आजोबांनीं कां पणजोबांनीं सुमुहूर्तावर बांधून ठेवलेलें पागोटें, काखेंत तो बटवा आणि हातांत



आमच्या पंतोजींची स्वारी अंगावर एक दुहेरी धोतर
डोकीला आजोबांनी का पणजोबांनी सुमुहूर्तावर
बांधून ठेवलेलें पागोटें, काखेंत तो बटवा.
आणि हातांत शिंगापुरी छत्री अगर
सोटा घेऊन शाळेमध्यें येत असे..

शिंगापुरी छत्री अगर सोटा घेऊन शाळेमध्यें येत असे. शाळेंत आल्यावरही त्यांना वरच्या प्रमाणेंच तीन चार वेळां तरी दांत घांसावें लागत असत. त्यांच्या दांतांकडे पाहून, अधिक वेळां दांत घांसण्याची त्यांना आवश्यकताच आहे, हें कोणालाही पटलें असतें !

असो. तात्पर्य: आमच्या गुरुजींच्या या उत्थापनमुखमार्जनादि प्रातर्विधि-मुळें आम्हां शिष्यांना मात्र शाळेंत येऊन दंगामस्ती करायला बराच वेळ सांपडे पण एक दोन वेळां आमचा दंगा ऐन रंगांत यायला आणि संतापलेली पंतोजींची स्वारी अचानक येऊन तेथें उभी रहायला एकच गांठ पडली ! मग काय, त्या वेळच्या आमच्या दंग्याला विशेषच रंग आला ! इतका कीं, त्यामुळें आम्हा सर्वांच्या पाठीसुद्धां रंगल्या ! पण याप्रमाणें अंगें रंगविणें हें रानटीपणाचें लक्षण असल्यामुळें आम्हाला कोणालाच तें इष्ट वाटलें नाहीं. तेव्हां त्याची पुनरावृत्ति होऊं नये, म्हणून गुरुजींच्या पाळतीवर रहाणाऱ्या मुलानें म्हणण्या-साठीं म्हणून मी एक इषाऱ्याचें गाणें रचलें. तें असें—

**इषाऱ्याचें गाणें.**

[ **चाल**—आला र बामनाचा काका ]

**आलारे पंतोजी बोका**
**पोरांनो वांचण्या घोका**
**प आइ ओ आऊ कका***
**घोकारे घोकारे घोका**

पुढें यावरूनच, गुरुजी जरा कुठें बाहेर गेले कीं, तेवढ्यापुरता खेळाचा इषारा देण्यासाठीं मला दुसरें एक गाणें रचण्याचा प्रसंग मिळाला—

**( खेळाच्या इषाऱ्याचें गाणें. )**

**भाऊपंतोजी काळकुंद्रा । बोका पळाला चल उंद्रा**
**घ्या घ्या भोंवरे चला जाऊ रंगणा**
**भोंवरापाणी खेळायला । काय । रंगण बोचू**
**घायायाला ॥**

( हें गाणें म्हणते वेळीं भोंवऱ्यांतील 'व' दीर्घ करावयाचा. याचें कारण भोंवऱ्यांतील मध्य दीर्घच असतो ! तसेंच 'घावयाला' चें काव्यात 'घाया-

---

* ए ऐ, ओ औ, क का, यांची ही वाचणी आहे.

याला ' असें होतें, रंगणबोचू हा शब्द भोंवरे खेळणारांना तरी सांगा-यला नकोच.)

असो. याप्रमाणें जे जे प्रसंग माझ्यावर आले, ते ते कवितादेवीवर लादून त्यांच्यामध्यें तिला गुरफटून टाकण्याची संधि मीं बहुधां वांया जाऊं दिली नाहीं. आणि आमच्या ' कव्यान्च्या आर्ळी ' चा मला असा कांहीं गुण लागला कीं, पुढें केव्हा जर प्रसंगाचा तुटवडा पडला, तर मनाला चैन पडेनासें होई. इतकें कीं, केव्हां केव्हां काव्यस्फूर्तीच्या अनावर इच्छेनें असेंही वाटे कीं, आमची गुरुमाउली तरी प्रसन्न होऊन आतां एखादा दुसरा प्रसंग माझ्यावर आणील तर बरें होईल!

काव्यस्फूर्तीकरितां प्रसंग मिळावेत म्हणून मन कितीं आतुर होतें, अनावर होतें आणि वेडावून वहकून जाऊन मिळेल तो प्रसंग--कोठें का मिळेना-येईल तो प्रसंग-कसला का येईना-सटकन उचलून घेण्याला हापापलेलें असतें याचा अनुभव माझ्याप्रमाणेंच माझ्या कविवर मित्रांना असेलच. खऱ्या कवीचें लक्षण हेंच आहे कीं, काव्यप्रसंग म्हटला कीं, तो अतिलोभ्याच्या दिडकीप्रमाणें कोठला का असेना उचलून घेनलाच! एकदां एका कविबहाद्दराची वृद्ध आई प्लेगनें लागली होती. पण मागल्या जन्मीं कोठल्याशा देशांत वैद्यराज म्हणून बनलेले असतांना ' प्लेगचा काळ ' या नांवाचें औषध त्यांनीं शोधून काढलें होतें. म्हणून या जन्मीं प्लेगच आपला काळ बनेल कीं काय या कविकल्पनेनें त्यांचें मन नेहमीं पछाडलेलें असल्याकारणानें प्लेगची गांठ त्यांना कोठेंही सोसत नसे. तेव्हा वेडावल्याचा बहाणा करून या काव्यकोकिलानें आपल्या मातेच्या प्लेगचा हिंवाळा टाकून कोठें तरी जाऊन आपला वसंत गाठला! पण काय, त्यामुळें ' भित्रा भागुबाई ' हें अनुप्रासात्मक अप्रतीम काव्य गाण्याचा अपूर्व प्रसंग त्याला मिळाला! बिचारा काय करतो, त्याची आई पुढें वांचली! नाहीं तर पुढें लागलीच ' मातृशोक ' या नांवाचेंही काव्य तो लिहिणार होता! नाहीं, पुढें त्याला दैववशात् मातृशोक झाला; पण तो म्हातारीच्या मरणप्रकृती-मुळें, प्लेगसारख्या हृदयभेदक काव्यात्मक प्रसंगामुळें नव्हे! त्यामुळें त्याचा तो प्रसंग फुकट गेला! काय करतो बिचारा!

दुसरे एक काव्यानंदी कवि प्रसंगाच्या अभावामुळें वेडावलेले असतां, त्यांचें एकुलतेंएक अपत्य गत झालें! मग काय, कविहृदयच तें! अगोदरच वेडावून गेलेलें, त्यांत प्रियकर अपत्याचा चिरवियोग! लागलीच अपत्यशोकाचा प्रसंग

सुचून ' कवीचा अपत्यशोक ' म्हणून एक अभिनव कृति बाहेर पडली. आणि चमत्कार असा कीं, त्याबरोबरच पूर्वीची वेडावलेली वृत्ति माहींशी होऊन कविहृदय प्रफुल्लित झालें ! इतकें कीं, तो ' अपत्यशोक ' ज्याला त्याला प्रसन्न चित्तानें दाखवीत सुटल्यामुळें हा शोकाकुल कवीचा ' अपत्यशोक ' का एक अभिनव कृति बाहेर पडल्यामुळें वाटणारा ' काव्यनंदी ' कवीचा ' पुत्रजन्मोत्सव ' याचीच लोकांना भ्रांति पडली ! वज्राहूनही कठोर व कुसुमाहूनही मृदु अशा अगम्य लोकोत्तर कविहृदयाचा चमत्कार असाच आहे !

तिसरे एक ' शारदारमण ' नांवाचे कवि होते. त्यांची प्रियपत्नी निवर्तल्यामुळें त्यांना अर्थात् ' चिरवियोग ' काव्य लिहिण्याचा प्रसंग वरच्याप्रमाणें घरच्या घरींच मिळाला ! ते काव्य चालू असतां–असतांच मोठमोठ्या मार्मिकांना तें दाखवून त्याच्यावर अभिप्राय गोळा करण्याचेंही काम चालू होतें. कारण खऱ्या कवीचें दुसरें लक्षण असें आहे कीं काव्य झालें-मग तो स्वतांचा शोक कां असेना !-कीं तें प्रसिद्धीस आलेंच पाहिजे ! आणि बऱ्या लोकांच्या अभिप्रायाचा अगडबंब नगारा मढवल्यावांचून जगांत कांहींच प्रसिद्धीस येऊं शकत नाहीं. म्हणून त्यानें आपल्या काव्यावर ' लोकहितवादी ' च्या परिशिष्टाइतके, किंवा बाणभट्टाच्या उपमांच्या इतके अभिप्राय गोळा करण्याचा झपाटा सुरू ठेवला. अशाच एका झपाट्यांत ते आपल्या दुसऱ्या एका कविमित्राकडे अभिप्रायाच्या इच्छेनें आपलें तें काव्य दाखवावयास गेले. काव्य अजून अपुरेंच होतें. तो कविमित्र बिचारा गरीब कुटुंबवत्सल, दहा रुपये पगाराचा शाळामास्तर असून, तीन मुलगे आणि सात लग्नाच्या मोठ्या मुली अशा दहा पोरांचा बाप होता. पण कवि होता ! व त्यानें तें काव्य वाचून पाहिलें. सद्गदित झाला. कंठ इतका धरून आला कीं, कांहीं वेळ त्याला बोलवेना ! अखेरीला तें काव्य हृदयाशीं धरून मोठ्या कष्टानें म्हणाला, ' अहाहा ! काय कविहृदय हें ! ( त्या वेळीं काव्य स्वतांच्या हृदयाशीं असल्यामुळें कविहृदय कोणाचें याची कदाचित् भ्रांत पडेल. पण पुढें खुलासा झाला आहे. ) शारदारमण ! तुमचें हृदय खरोखरच कवीचें ! पत्नीचा शोक, पण काय कल्पनांवर कल्पना केल्या आहेत ! या एकाच काव्यानें तुमची कीर्ति अजरामर होईल ! या तुम्ही आपल्या काव्यानें तुमची गत झालेली पत्नी तुम्हीं पुन्हा सजीव केलीत यांत कांहीं संशय नाहीं. आणखी कां नाहीं सजीव होणार ? आपल्यामुळें आपल्या पतीला इतक्या कविकल्पना सुचून आपल्या पतीची कीर्ति अजरामर होते, असें पाहून कोणत्या कुमारिकेला तुमची

पत्नी होण्याची लालसा उत्पन्न होणार नाहीं ! बनें ! ( सर्वांत मोठी लग्नाची मुलगी. वय सुमारें बावीस वर्षे. ) हे पाहिलेंस का शारदारमण ? विचारीत होतीस ना तूं ? त्यांचें हें ' चिरवियोग ' काव्य तर वाच. अजून पुरें व्हायचं आहे म्हणा. याच्यावर अभिप्राय मागायला आले आहेत हे. शारदारमण ! या तुमच्या काव्यावर दुसरा कोणता अभिप्राय देऊं ! हा तुमचा विरहशोक नाहींसा करण्याकरितां या आमच्या बनीलाच तुम्हाला देऊन टाकतों म्हणजे झालें !



**हा तुमचा विरहशोक नाहींसा करण्याकरितां या आमच्या बनीलाच तुम्हाला देऊन टाकतों म्हणजे झालें !**

अखेरीला सांगायास कारण, बनी ही शारदारमणांची शारदा बनली ! लग्न झाल्यावर पत्नी सजीव आहे या सबबीवर बनीनें तें पत्नीवियोगाचें काव्य फाडून टाकून त्याचा चहा बनवला !

असो. याप्रमाणें काव्यप्रसंगांच्या अभावीं निरनिराळ्या कवींवर आलेल्या प्रसंगांच्या गोष्टी सांगाव्या तितक्या थोड्या आहेत. अलीकडे मला मात्र प्रसंगांच्या अभावाचें कारणच उरलें नाहीं. कारण ' हरि कवि, ' असे शब्द

शिकून तयारी झाल्याबरोबर मी हल्लीं एका महाकाव्यालाच सुरुवात केलेली आहे.* आणि तें काव्य बहुतेक माझ्या जन्माला पुरणारें असल्याकारणानें प्रसंगांची वाण पडण्याचें मला कारणच नाहीं. त्या काव्याच्या नमनाचे फक्त दोनच चरण मी या ठिकाणीं देतों. म्हणजे 'बाळाचे पाय पाळण्यांतच दिसतात' या न्यायानें माझ्या काव्याचे पायही (चरण म्हणजे पायच.) नमनांतच दिसून येतील.

## माझ्या महाकाव्याचें मंगलाचरण.

शुभकर कल्याणप्रद
आरोग्याद धनद पेशिया या दिव्याला कविवर कविता
कवितां करि नमन, काय त्या यादि ॥

नमनाचें हें चरणयुगल या ठिकाणीं मी केवळ मासल्याकरितांच देत आहें असें नव्हे. तर त्या चरणयुगुलांतून गंगेप्रमाणें माझें काव्य बाहेर पडण्यापूर्वी ह्या चरणयुगुलाचेंच एक निराळें रामायण झालें आहे. इंग्रजींत Thereby hangs a tale असें म्हणत असतात, तशीच गोष्ट या चरणयुगुलाचीही आहे. प्रथमच मी आपले हे चरण मुद्दामच गमतीनें एका अहंमन्य गृहस्थांस दाखविले, पण 'हात दाखवून अवलक्षण' म्हणतात तसें इथें चरण दाखवून मी अवलक्षण करून घेतलें. हे गृहस्थ आपणाला मोठे कवि म्हणून समजतात. पण एखादी कविता धड वाचायलाही येत नाहीं. मग लागण्याची गोष्ट तर बाजूलाच राहिली. दुसरा चरण 'व्याला कविवर कविता' असा वाचला न वाचला, तोंच शहाणे म्हणतात कसे, "काय कविवर कविताच कविता व्याला! म्हणजे कवि कोण, कुत्री होता कां मांजरी होता?" आता काय करावें असल्या शहाणपणापुढें? मीं म्हटलें, "अहो, नीट वाचा तरी. 'व्याला' नव्हे. पहिल्या चरणांतील शेवटच्या अक्षरापुढें रेघ आहे, ती पाहिली नाहींत का? त्या 'दि' ला जोडूनच पुढचा चरण वाचायचा, एवढं देखील तुम्हांला समजूं नये?" मग त्यांनीं पुन्हा वाचण्याचा प्रयत्न केला तरी पण काय? पुन्हा

---

* 'जधीं कांहीं कांहीं हारे कावे असे शब्द शिकलों। तधीं मी सर्वज्ञ' हा वामन पंडिताचा सुप्रसिद्ध श्लोक माझ्याप्रमाणेंच सर्वंश वाचकांना अवगत असेलच. आणि 'हरीप्रमाणेंच कावे शब्द चालतो,' अशा अर्थाचें पूर्वी जें मीं विवरण केलें आहें, त्यावरून हे शब्द मीं शिकलों असल्याची साक्षही सर्वांना पटेलच.

शहाणपण कसें पाजळतात तें पहा " हं हं हं. दिव्याला, म्हणजे दिवा संध्याकाळीं लावतात, त्याला. आणि ' शुभकर कल्याणप्रद ' म्हणजे हं, आलं ध्यानांत, ' शुभं करोति कल्याणं ' असें जें दिवा संध्याकाळीं लावल्यावर म्हणतात त्याचं तुम्हीं हें भाषांतर केलं आहे होय ? "

' भाषांतर ' म्हटल्यावर मी फारच रागावलों. मग मीं त्या अहंमन्याची शोभाच ठेवली नाहीं. मी एकदमच उसळलों. ' भाषांतर ! माझं काव्य भाषांतर ? तर मग महाराज तुमच्या कवित्वाचा आतां जो हा तुम्हीं दिवा लावलात, त्यालाच मी नमस्कार करतों. अहो, तुम्ही आपल्याला कवि म्हणवतां, आणि एवढं दिखील तुम्हाला समजूं नये ? अहो, माझ्या महाकाव्याचें हें नमन आहे. तुमच्या आमच्यासारखे कवि, महाकाव्य लिहिणारे, ते एखादा साधा दिवा–मग तो एखादे वेळेला कसला असेल त्याचा कांहीं नियम आहे ? पूर्वी समया, लामणदिवे तरी असत. पण आतां एखादे घासलेटाचें भिकार टमरें दिखील असेल ! — अशा दिव्याला आपण नमन करूं काय ? अहो साधे, नीरस, संसाराचा भार वहाणारे, रुक्ष अशा गद्य लोकांनींच त्या संध्याकाळच्या दिव्याला नमन करीत रहावें ! कविवरांच्या नमनाचा विषय दिवा ! थुः ! ! ! अहो दिवा नव्हे तो. दिव्य दिव्य. त्याला माझे नमन आहे तें. अहो, ' नमः शांताय तेजसे ' हें भर्तृहरीचें नमन आठवत नाहीं काय ? काय करावें ! उच्चार प्रमाणें वास्तविक ' व्या ' हें द्वित्त लिहायला पाहिजे, म्हणजे असा घोटाळा व्हावयाचा नाहीं. पण वहिवाटच नाहीं. तें कांहीं नाहीं, ज्या अर्थी तुमच्यासारखे वाचणारे भेटतात, त्या अर्थी आतां मी माझ्या महाकाव्याची आवृत्ति उच्चाराप्रमाणें शब्द छापवूनच काढीन. म्हणजे माझ्या महाकाव्यामुळें ती वहिवाटच पडून जाईल.

पुढें आमचे शहाणे अहंमन्य, " बरं, पण हें ' कविता कविता ' असें दोन वेळां काय घातले आहेत ? ' काय त्या यादि ' म्हणजे काय ? " असे शब्दागणीकच अर्थ विचारूं लागले. तेव्हां मीं म्हटलं, " आतां सगळाच अर्थ तुम्हाला सांगून टाकतों, म्हणजे मग कटकट नको. एकदां कविता दाखविली आहे खरी तुम्हाला.* हा घ्या अर्थ.—' शुभकर कल्याणप्रद इ० ' याचा

* याप्रमाणें वरून मीं अगदीं त्रासल्याचा आव आणून म्हटलें खरें, पण मनांतून मात्र मला त्या गोष्टीचा फार आनंद वाटला. आपल्या काव्याचा अर्थ कोणालाही विशद करून दाखविण्याची संधि मिळाली, म्हणजे किती आनंद होतो, याची कल्पना कविच करूं जाणे ! ही संधि दिल्यामुळें तो तिरस्करणीय अहंमन्य सुद्धां मला मनांतून किती प्रियकर झाला म्हणून सांगूं ! तेव्हांपासून मी त्याच्यावर बहाल असे. कित्येक मोठमोठ्या व्यक्तींचें अगदीं तिरस्करणीय अशा व्यक्तींशीं मेतकूट कां जमतें याचा यावरून थोडासा उलगडा होईल !

अर्थ तर उघडच आहे. ‘ ऐशिया या दिव्याला ’ म्हणजे असें जें दिव्य— दिवा नव्हे !–देदीप्यमान परमेश्वरस्वरूप त्याला ‘ कविवर ’ म्हणजे हें महाकाव्य करणारा कविश्रेष्ठ, ‘ कविता कविता ’ म्हणजे काव्य गात असतां किंवा करीत असतां ( दुसऱ्या ‘ कवितां ’ वर अनुस्वार आहे, त्याकडे लक्ष द्यावें ) नमन करी. ‘ काय त्या यादि ’ म्हणजे त्या नमनाच्या यादि काय सांगाव्या ? अमक्याला नमन, तमक्याला नमन याप्रमाणें काव्यारंभीं नमनाची यादीच यादी जोडण्याचा महाकवींचा प्रघात आहे. तो जरी गैर नाहीं, तथापि अशा रीतीनें नमनालाच घडाभर तेल जाळण्यापेक्षां फक्त एका दिव्याला ( दिव्य जें त्याला. नाहीं तर तेल जाळण्याच्या कल्पनेवरून पुन्हां दिवा म्हणून समजाल ! ) नमन करून बाकीच्या नमनांचा समारोप. ‘ काय त्या यादि ’ अशा रीतीनें करून टाकला आहे. शिवाय वास्तविक पाहिलें तर भगवंताच्या नमनाला चरणयुगुलच पुरे होतं. सगळ्या विराट स्वरूपाची कांहीं अपेक्षा नसते.

आणि जरी नमनाला दोनच चरण असले, तरी काव्याचे दृष्टीनें कांहीं हानि झालेली नाहीं. त्या दोनच चरणांत अलंकार किती साधले आहेत ते पहा. एक प्रथम ‘ ऐशिया या दि–’ या प्रथम चरणाला ‘ काय त्या यादि ’ हें यमक जोडून देऊन अगदीं सोळा आणे मोरोपंती **यमकालंकार** साधला आहे. शिवाय, पहिल्या चरणांत ‘ द ’ चा व दुसऱ्या चरणांत ‘ क ’ चा याप्रमाणें **अनुप्रास** साधलेला आहे. याशिवाय आणखी दोन अगदीं नवीनच अलंकार या नमनांत मीं घडवलेले आहेत. यांपैकीं एक सहज हातून घडला गेला असून, तो माझ्या लक्षांतही नव्हता. पण आमच्या छोकऱ्यानें तो आम्हाला दाखवून दिला. कवीचाच छावा तो ! हत्तीचें गंडस्थळ ओळखल्याशिवाय थोडाच राहील ? त्याचा नुकताच अक्षरबोध चाललेला होता. वरील चरण लिहिलेला कागद त्याचे हातीं लागतांच साहजिकच तो ते पाहूं लागला. आणि पहिल्या चरणावरून दृष्टि फिरवतां फिरवतां एकदम आनंदानें म्हणाला, ‘ बाबा, बाबा, हें पाहिलंत का द ध न तुम्हीं लिहलं आहेत ! हं ! पहा तुम्हीं लिहिलेलं मीं वाचलं ! ’ पहातों तों खरेंच !

शुभकर कल्याणप्रद आरोग्यद धन—

वा ! हा एक अक्षरालंकारच झाला ! लहान मुलांना अक्षरबोध करून देणारा हा अलंकार अतएव **अक्षरबोधालंकार** असें याला नांव द्यायला कांहीं हरकत नाहीं !

आतां दुसरा अलंकार मीं मुद्दाम योजून नमनालाच साधला आहे. हा अलंकार गद्यांत असतो किंबहुना गद्याचा तो सहजालंकार आहे. पण काव्यांत आजपर्यंत तो कोणींच घेतलेला नाहीं. वास्तविक अलंकाराचे बाबतींत तरी, ज्याप्रमाणें स्त्रियांची व्याप्ति पुरुषांपेक्षां अधिक असते, त्याप्रमाणेंच काव्याचीही व्याप्ति गद्याहून अधिक असावयास पाहिजे. कारण, अलंकार हे स्त्रियांप्रमाणेंच काव्याचेही जीव कीं प्राण आहेत ! असें असून गद्यांतील हा अलंकार काव्याला आजपर्यंत कोणीं घातला नाहीं, हें मला बरें वाटलें नाहीं. म्हणून मुद्दाम मीं तो माझ्या काव्याच्या नमनापासूनच वापरला आहे. हा अलंकार म्हणजे 'दिव्याला' या शब्दांतील 'दि' एका चरणांत ठेवून 'व्याला' हा तुकडा दुसऱ्या चरणांत घातला आहे, हा होय. या योगानें गद्याप्रमाणेंच ओळींचा ओघ कायम रहातो. गद्यांत असें सहज होतें, पण कवितेंत काव्याचा ओघ साहजिक राहून चरण मात्र तुटक तुटक रहातात असें कां ? म्हणून गद्याप्रमाणेंच चरणांचा ओघ कायम ठेवणारा हा **चरणौघालंकार** मुद्दाम माझ्या काव्यांत योजला आहे. आतां हें ऐकून एका फाजील टीकाकारानें 'गद्याप्रमाणें चरणांचा ओघ' याचा ओढाताणीनें 'गद्धयाप्रमाणें लाथांचा सुकाळ' असा अर्थ करून माझ्या महाकाव्याला 'गाढदाचा गोंधळ' असें टवाळकीनें नांव दिलें. पण शिरस्त्याप्रमाणें इतर देवताबरोबरच टीकाकारालाही नमन करण्याचे बाबतींत मीं टाळा दिला आहे, त्याचें हें प्रायश्चित्त आहे, असें समजून मी गप्प बसतों. 'अरसिकेषु कवित्वनिवेदनं । शिरसि मा लिख मा लिख मा लिख' असें त्रिवार वाणीनें ब्रह्मदेवापाशीं एका कवीनें मागणें मागितलें आहे, तें कांहीं उगाच नव्हे !

हो, आतां ही ब्रह्मलिखिताचीच गोष्ट निघाली आहे, तिच्यावरून माझ्या ब्रह्मलिखिताची मला येथें आठवण होते. हें ब्रह्मलिखित मूल जन्मल्यानंतर सहाव्या दिवशीं रात्रीं लिहिलें जातें. त्या दिवसाला षष्ठीचा दिवस किंवा सटीचा दिवस असें म्हणतात. व तें लिहून ठेवणारी ब्रह्मदेवाची जी शक्ति किंवा देवता तिला सटवाई असें नांव आहे. षष्ठीवरून सटी आणि षष्ठीची स्वामिनी म्हणजे सटवाई असें हें नांव आलें असावें. सरस्वतीप्रमाणें ही सुद्धां ब्रह्मकुमारीच असली पाहिजे. दोघीही, ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेल्या प्राण्याच्या शरीरांत वास्तव्य करून सृष्टीचा व्यवहार चालविण्याला साहाय्य करीत असतात. फरक इतकाच कीं, सटवाईचें वास्तव्य प्राण्यांच्या फक्त भालप्रदेशींच

तेवढें असतें, आणि सरस्वती अधिकारानुरूप निरनिराळ्या ठिकाणीं वास करून रहाते. उदाहरणार्थ, चित्रकाराचे हस्ताचे ठायीं, वक्त्याच्या जिह्वाग्रीं, गायकाच्या कंठीं, कवीच्या हृदयांत व इतरत्र गुप्त असा तिचा वास असतो.

जगदुत्पत्तीच्या वेळच्या या दोघां आद्यस्त्रियांची केवढी ही योग्यता ! एक तर प्रत्यक्ष विद्येची स्वामिनी, आणि दुसरीच्या अंगीं भवितव्यता लिहून ठेवण्याचें सामर्थ्य ! असें असतां हल्लींच्याच स्त्रिया अशा निरक्षर आणि अवनत कां ? मला वाटतें, त्या आद्यस्त्रिया आजन्म कुमारी आणि हल्लींच्या स्त्रिया आजन्म विवाहिता असा भेद झाल्यामुळें तर हें अंतर पडलें नसेल ! ब्रह्मदेवाला एकवार स्वतांच्याच कुमारिकेच्या पाठीस लागण्याचा अनावर मोह पडून त्यामुळें प्रायश्चित्त भोगावें लागलें होतें. म्हणून कीं काय कोण-जाणें, हल्लीं त्यानें ' कन्येपूर्वी तिच्या पतीतें ' निपजवून सगळ्या स्त्रियांना जन्मतः विवाहित स्थितींतच उत्पन्न करण्याचा क्रम सुरू केला असावा ! ब्रह्मदेवानें स्वतांला मोह पडूं नये, एवढ्याकरितां काढलेल्या या युक्तीमुळे बिचाऱ्या स्त्रियांच्या गळ्यांत मात्र पतीचें लोढणें जन्मापासूनच पडलें. आणि एकदां पति गळ्यांत पडल्यावर मग स्त्रियांना विद्याबिद्या थोडीच सुचणार आहे !

असो. ब्रह्मलिखितांची मुद्रा कपाळावर मारली जाण्याकरितां प्राण्याचा ओतलेला सांचा योग्य स्थितींत यावयास पूर्ण सहा दिवस लागत असावेत, असें दिसतें. जगदुत्पत्तीचा पूर्ण विकास करावयास परमेश्वराला सहा दिवस लागले, अशी जी ख्रिस्ती धर्मशास्त्रांत कल्पना आहे, तीच या सहावींमध्यें असली पाहिजे. सहा दिवसांपूर्वी प्राण्याचें जें कांहीं होत असतें, तें ब्रह्मलिखितामुळें झालें, असें न मानतां, सांच्याचा सांधा बरोबर न साधल्यामुळें झालें, असें मानलें पाहिजे. ' सहावी ' च्या आंतील मृत्यु म्हणजे न चुकणारे ब्रह्मलिखित नसून अस्खलनशील ब्रह्मदेवाच्या चुक्या होत ! पांचव्या दिवसापासून सटवाईच्या आगमनाची मार्गप्रतीक्षा, सहावा दिवस ब्रह्मलिखिताच्या शिक्कामोर्तबाचा, आणि केलेला शिक्कामोर्तब वाळून स्थिर व्हावयास सहाव्या दिवसापासून बाराव्या किंवा एकविसाव्या दिवसापर्यंत अवधि धरलेला आहे, सटवाईचा अंमल तेथपर्यंत असतो. कारण सहापासून एकवीस दिवसपर्यंत मुलाचें जर कांहीं झालें, तर तें सटवाईनें झपाटलें असें म्हणत असतात. ब्रह्मलिखित लिहिण्याचें जबाबदारीचें काम जेव्हां सटवाईनें पतकरलें, तेव्हां तिचा आणि ब्रह्मदेवाचा, मला वाटतें, असा करार झाला असावा कीं, प्राण्याच्या

कपाळावर मारलेला शिक्का एकवीस दिवसांच्या आंत जर वाळून स्थिर झाला नाहीं, तर तो कच्चा प्राणी कच्च्या अंड्याप्रमाणें तिनें गिळंकृत करावा, आणि या एवढ्या मोबदल्यांत ब्रह्मदेवाच्या सृष्टींत ब्रह्मलिखिताचें काम तिनें करावें. तेव्हां सहा दिवसपर्यंतचे मृत्यु म्हणजे ब्रह्मदेवाच्या हातून घडणाऱ्या उघड उघड चुका, सहापासून एकवीस दिवसपर्यंतचे मृत्यु म्हणजे सटवाईच्या मोबदल्याकरितां उघड उघड योजलेली कच्चीं अंडीं, आणि एकविसाव्या दिवसानंतर मात्र ब्रह्मलिखित !

हें ब्रह्मलिखित कपाळावर लिहिण्याची जी वेळ, म्हणजे सहाव्या दिवसाची रात्र, ती अत्यंत महत्वाची, आयुष्यांत फिरून कधींही न येणारी, अतएव मोठ्या खबरदारीनें साधावयाची अशी समजली जाते यांत नवल नाहीं. पांचव्या रात्रीपासूनच पाटापूजन करून सटवाईची मनोभावानें व फार खबरदारीनें जपून प्रार्थना चाललेली असते. पाटा हा बहुधा प्राण्याच्या कपाळाचा दर्शक असावा. त्यावर सटवाईची स्थापना होत असते. सत्ताधारी पुरुषांच्या आगमनाप्रीत्यर्थ नागरिक ज्याप्रमाणें गुढ्यातोरणें उभारून मार्ग शृंगारून ठेवीत असतात व स्वागताकरितां उच्चासन तयार करून त्यावर विराजमान होणाऱ्या व्यक्तींपाशीं मानपत्रांच्या द्वारें आपल्या ब्रह्मलिखिताची याचना करीत असतात त्याप्रमाणेंच सटवाईच्या आगमनाकरितां दरवाजापासून एकवीस ठिकाणीं—कारण एकवीस दिवस तिचा अम्मल असतो म्हणून—सटीचीं चिन्हें भिंतीवर काढून तिचा मार्ग तयार करतात; व बाळंतिणीच्या खोलींत रंगविलेल्या भिंतीवर तिची प्राणप्रतिष्ठा करण्याकरितां भिंती शेजारीं प्राण्याच्या कपाळाचा दर्शक जो पाटा त्याचें उच्चासन तयार करून ठेवतात. पांचव्या रात्रीपासून सटवाईचें आगमन अपेक्षित असल्याकारणानें, लिखिताचा शिक्कामोर्तब होणाऱ्या बालकाला घेऊन माता व सुईण सटीचा जागर करीत असतात. बाळंतिणीच्या खोलींत सुईणीचा मान फार मोठा असतो. सटवाईच्या स्वागतमंडळाची अध्यक्ष ती. वर्णांशीं असली तरी सटवाईची सवाष्ण ती. सटवाईजवळ कौल लावणारी भगत ती. तिचा योग्य तो मानपान ठेवावा लागतो. मूल उपजल्यापासून सटवाईचा कृपाप्रसाद होईपर्यंत मातेला तें तिच्याच ओटींत घालून संरक्षणाकरितां तिच्या पहाऱ्यांत द्यावें लागतें. ब्रह्मलिखिताचा शिक्कामोर्तब होऊन तो वाळून कांहींसा स्थिर झाल्यावर मग बाराव्या दिवशीं मातेला धीर येऊन ती मूल आपल्या ओटींत घेते व नांव ठेवून लौकिकी सुखसोहळे करते.

या सटवाईचा स्वागतमंडप म्हणजे बाळंतिणीची खोली, तो तयार करण्याची आह्मां पौर्वात्यांची जी रीत आहे ती अगदीं अपूर्व आहे ! खरोखरच अपूर्व आहे ! आह्मी पौर्वात्य असून अ-पूर्व, म्हणजे पूर्वविरहित अशी आहे ! आतां अपूर्व शब्दाचा हा विग्रह संस्कृत नसेल, पण माझ्या सरणीला सरळ असून, येथें तर अर्थाला जुळणारा—विग्रह असून देखील जुळणारा—असा आहे. कारण, पूर्व म्हटली कीं, तिथें सूर्य येतो. आणि बाळंतिणीच्या खोलीत तर तो कधींच येत नाहीं ! घरांतील नीट चांगली एखादी चकडबंद खोली पाहून तिचीच मुद्दाम या कामीं योजना होते. घर बांधते वेळेलाच असल्या एखाद्या खोलीची खबरदारी घेतलेली असते. पण यदाकदाचित् तिला एखादी खिडकी अगर झरोका राहिलेला असला, तर कागद वगैरे चिकटावून त्याचाही बंदोबस्त योग्य वेळीं होत असतो. मोरीचें एक भोंक असावें लागतें, पण गरज नसेल त्या वेळीं तें सुद्धां बोळा घालून बंद ठेवीत असतात. दरवाजाशिवाय भागतच नाहीं हें जरी खरें, तरी पण त्यांतल्या त्यांत होईल तितकें भागवून घेण्याचा शक्य तितका कसून प्रयत्न झाल्याशिवाय रहात नाहीं. अशा प्रकारचा हा अपूर्व स्वागतमंडप प्रसूतिकालीं सिद्ध असल्याशिवाय ब्रह्मालिखिताची अधिष्ठात्री देवता जी सटवाई ती प्रसन्नच होत नाहीं ! जन्मलेल्या बालकाला एकवीस दिवसपर्यंत सूर्य दिसतां कामा नये आणि वायूचें वारेंही लागतां कामा नये. तरच त्या बालकाच्या कपाळावरून सटवाईचा हात नीट रीतीनें फिरेल. नाहींतर काय होईल आणि काय नाहीं तें कोणीं सांगावें ? प्राण्याच्या जन्मकालीं अशा प्रकारची ही चकडबंद तयारी ब्रह्मदेवाच्या सृष्टींत इतरत्र कोठेंच होत नसेल !

पण ही आमची आर्यभूमि म्हणजे अवतारभूमि आहे ! येथें परमेश्वर कोण्या वेळीं कोणाच्या शरीरांत कसा अवतार घेईल त्याचा नियम नाहीं. आणि अवतार म्हणजे, तो एक प्रचंड अव्यक्त शक्तीचा प्रत्यक्ष संचार असल्याकारणानें खळबळ आणि अस्वस्थता उत्पन्न करणारा असतो. इतकेंच नव्हे, तर केव्हां केव्हां निव्वळ आपल्या वेगाच्या झपाट्यामुळें आपल्या आजुबाजूला तो त्रासदायकही होतो. आणि यामुळें दुष्ट दानवाचा संहार करण्याकरितां जरी तो असला, तरी त्याच्या वेगाच्या झपाट्यांत सांपडणाऱ्या देवांनाही तो तापदायक झाल्यावांचून रहात नाहीं. शत्रुसैन्याचा नाश करण्याकरितां सोडलेली गर्‍हांकाळी तोफ आजुबाजूच्या गर्भवतींचे अकालीं गर्भपात करून ज्याप्र-

माणें आपल्याही पक्षाच्या भावी सैन्याचा संहार करीत असते, त्या प्रमाणेंच दानवांकरितां प्रगट झालेला अवतार देवांनाही जाचक होतो. म्हणून या अवतारभूमींत भलत्याच प्राण्याच्या शरीरांत, भलत्याच वेळीं, भलताच अवतार नकळत प्रगट होऊन, अचानक एखादें संकट आपल्यावर ओढवेल कीं काय, या धास्तीनें, त्याची खबरदारी राखण्याकरितां कांहीं देवांनीं आपापल्याकरितां कांहीं योजना करून ठेवलेल्या असाव्यात असा मला जबरदस्त संशय आहे. आणि बाळंतिणीची चकडबंद खोली ही एक अशाच प्रकारची योजना सूर्यमहाराजांनीं आपल्याकरितां केलेली असली पाहिजे असें वाटतें. कारण कीं, समुद्र उल्लंघन करून रावणाच्या लंकेचा नाश करण्याकरितां रामावतारीं जेव्हां वायुपुत्र हनुमान् प्रगट झाले तेव्हां, त्यांच्या अवताराचा पहिला झपाटा रावणाच्या ऐवजीं सूर्यमहाराजांनाच सोसावा लागला होता. लखलखीत लंकेचा नाश करण्याकरितां समुद्राचें उल्लंघन करण्याचा आवेग बरोबर घेऊन मारुतिराय प्रगट झालेले असल्याकारणानें प्रथम डोळे उघडतांच सूर्यबिंब दृष्टीस पडल्याबरोबर त्यालाच लंका समजून आकाशाचें त्यांनीं उल्लंघन करावें, आणि सूर्यबिंबाचा ग्रास करण्याला उद्युक्त व्हावें हें स्वाभाविक आहे. त्या वेळीं सूर्यमहाराजांची अर्थातच गाळण उडून ते अगदीं गर्भगळित होऊन गेले असले पाहिजेत. 'सूर्यापोटीं शनैश्वर' म्हणतात ते बहुधा याच वेळीं 'गळित' होऊन बाहेर निघाले असावेत. आणि यावरूनच मारुतिरायांना शनिवारचा मान मिळालेला असला पाहिजे. खरेंखोटें सूर्यमहाराजच जाणोत!

असो. त्या वेळीं गर्भगळित झालेल्या सूर्यमहाराजांची हातींपायीं सुटका झाली खरी, पण त्या वेळेपासून अवतारासंबंधानें त्यांच्या मनाला धास्ती बसून त्यांनीं या अवतारभूमींतील प्राण्याच्या जन्मकालीं, त्या प्राण्याचें ब्रह्मलिखित नक्की ठरेपर्यंत तरी निदान आपण त्याच्या दृष्टीस पडलें जाऊं नये; त्याचप्रमाणें वायूचें पोर जन्मतःच वारा प्यालें तर काय करतें याचाही त्यांना चांगला अनुभव आलेला असल्याकारणानें वायूचें वारेंही त्या प्राण्याला लागलें जाऊं नये, येवढ्याकरितां सटवाईशीं संगनमत करून त्यांनीं ही चकडबंद खोलीची व्यवस्था केलेली असावी. सटवाई ही ब्रह्मलिखिताची स्वामिनी. तेव्हां तिनेंच आपल्या स्वागताकरितां अशा चकडबंद खोलीच्या मंडपाची अट घातली म्हणजे सहजच सटवाईचा अंमल असे तोंपर्यंत—म्हणजे अर्थात् प्राण्याचें नक्की ब्रह्मलिखित कळेपर्यंत—जन्मलेल्या प्राण्याला सूर्यदर्शन कांहीं व्हायला नको,

आणि वायूचें वारें लागल्यामुळें वारा पिऊन प्राणी कांहीं भलभलतें करील ही धास्तीही बाळगायला नको! ब्रह्मलिखित एकदां कळलें—आणि सटवाईनें लिहिल्यावर देवांना तें कळायला कांहीं कठिण नाहीं—म्हणजे मग तो जन्मलेला प्राणी अवतार जरी ठरला, तरी फक्त त्याच्या वेगाच्या झपाट्यांत न सांपडण्याची तेवढी खबरदारी घेतली, कीं भीतीचें कारणच उरत नाहीं. अशा दूरदर्शीपणानें ही योजना सूर्यमहाराजांनीं केलेली असावी.

या योजनेचे परिणाम सूर्यमहाराजांच्या अगदीं कल्पनेप्रमाणें, किंबहुना त्यांच्या कल्पनेपलीकडे सुद्धां झालेले आहेत असें दिसून येईल. आतां या अवतारभूमींत जन्मकालीं तर कोणाही माणसाची सूर्यमहाराजांकडे डोळे वर करून पहाण्याची छाती नाहींच. पण पुढें जन्मभर सुद्धां केव्हांही नाहीं. इतकेंच नव्हे, तर कांहींकांहींना सूर्याचा खालीं पडलेला प्रकाश सुद्धां इतका असह्य झाला आहे कीं, आडपडदा केल्याखेरीज त्यांना कांहीं पहावत देखील नाहीं! त्याचप्रमाणें सूर्यबिंबाचा ग्रास करण्याकरितां वायुमंडळाचा भेद करून स्वतांच उड्डाण करणारे वायुपुत्र ज्या ठिकाणीं निर्माण होत असत, त्या ठिकाणीं आतां प्रखर तापाच्या योगानें सूर्यच आपला ग्रास करील कीं काय या धास्तीनें वाळून वाळून पाचोळा बनलेले वाऱ्यानें उडून जाणारे वायुपुत्र निर्माण होत आहेत!

सूर्यमहाराजांनीं याप्रमाणें जी आपली अवस्था करून टाकली आहे, तिच्याबद्दल या अवतारभूमींत आतां कोठें थोडीबहुत जाणीव उत्पन्न झाल्यासारखी दिसत आहे. आणि सूर्याचा प्रकाश व वायूची हवा यांबद्दल इतके दिवस लोकांची अगदीं जन्मतःच जी चकडबंद डोळेझांक झालेली होती, ती कांहींशी कमी होऊन त्या बाबतींत आतां किंचित् डोळे उघडत चालले आहेत असें दिसतें. कारण सूर्याशीं संगनमत करून आपणाशीं द्रोह करणाऱ्या सटवाईबद्दल आतां या अवतारभूमींत अनादर उत्पन्न झालेला दिसत आहे. आणि उदेलानें तिचा उदे उदे करणाऱ्या व ओंव्याच्या धुरीनें तिचा भ्रामक संचार कायम ठेवणाऱ्या तिच्या तेलकट धुरकट भगत सुइणी कमी कमी होत चालल्या आहेत. आणि त्यांच्या ऐवजीं आतां आपल्या वेषाच्या शुभ्रपणानें सूर्यप्रकाशाला काबीज करून व सर्वत्र संचार करण्याविषयीं असंख्य पायांवर तयार असलेल्या वायूला त्याचा मार्ग मोकळा करून, त्या उभयतांनाही बेलाशक प्रसूतिगृहाच्या आंत घेऊन येणाऱ्या नवीन धीट सुइणी द्रोह करणाऱ्या सट-

बाईला चकडबंद खोलीच्या स्वागत-मंडपाऐवजीं उघड्या धान्यावरच बसवू पहात आहेत! याप्रमाणें जन्मकाळीं कीड लावणाऱ्या सटवाईचें उच्चाटन करण्याचा प्रयत्न होत असून शिवाय खुद्द सूर्यमहाराजांनींच कृपाळु होऊन आपल्याला या अवस्थेंतून मुक्त करावें येवढ्याकरितां त्यांना प्रसन्न करण्यासाठीं रोजच्यारोज नमस्कार घालण्याचा नेम करून एकीकडून नेमस्त उपाय चालले आहेत, तर दुसरीकडून त्यांना घाबरवून सोडणारे वायुपुत्र जे मारुतिराय त्यांचें अवसान अंगीं आणण्याकरितां मारे हवा खाण्याचा अभ्यास करून आणि शरीर घटविण्याकरितां बलभीम मारुतिरायांच्या वस्तादगिरीचे आखाडे काढून त्यांच्याशीं दंडेली करण्याचे जहाल उपायही चालू आहेत. पण नेमस्त उपाय योजा किंवा जहाल उपाय योजा, प्रथम तेलाचा तुटवडा केल्यामुळें बहुतेक जळून राख झालेल्या वातीच्या जागीं, नवीन वात घातल्यावांचून नुसत्या त्या पहिल्याच वातीच्या राखेवर तेल ओतीत बसण्याचा प्रयत्न करून काय होणार आहे?

अरे, पण मी हा कोणीकडे वहावलों? ‘ आमच्या आळी ’ त म्हणून तुम्हाला घेऊन जाऊन ‘ काव्याच्या आळी ’ तून हिंडतां हिंडतां हवा तिकडे वहात चाललों आहें. एखाद्या नावेंत बसून लहानशा नदीच्या पात्रांतून सहज सहल करायला म्हणून निघावें आणि आजुबाजूचा प्रदेश पहातां पहातां ओघाबरोबर वहात जाऊन अफाट समुद्रांत शिरण्याच्या पंथाला लागावें, तद्वतच बहुतेक माझी अवस्था झाली आहे. आणि अशा रीतीनें समुद्राच्या धारेस लागलेल्या नावेला आतां मागें परतवीन म्हणेन, तर तेंहि दुरापास्त होणार आहे. बाळपणाच्या सलगीनें प्रथम तुम्हाला ‘ आमच्या आळी ’ ला म्हणून पाचारण करून आतां हलकेंच जगाच्या अफाट समुद्रांत कांहीं मतलबानें तुम्हाला नेऊन सोडण्याचा माझा विचार असेल असें तुम्ही म्हणाल, पण माझ्यासारख्या ‘ वजरबटू ’ चा मतलब तो काय असणार आहे? कोलंबसानें आपल्या देशाच्या लोकांना नानाप्रकारचीं आमिषें दाखवून अफाट समुद्रांत नेलें, पण त्यांत त्याचा मतलब तरी होता. समुद्राचें कुंपण घातलेल्या टिचभर भूमीच्या तुकड्यांत कोंडमारा होऊन, गर्दीमुळें चळवळ करूं लागलेल्या हापापलेल्या जीवांना यथेच्छ वावरायला मिळेल अशा प्रकारच्या एका सुवर्णभूमीचा शोध त्याला करायचा होता. आमच्या या वाङ्मयाच्या भूमींतील रहिवासी जो वाचकवर्ग तो इतका अल्प आहे कीं, त्याला येथल्या गर्दीच

यथेच्छ हातपाय पसरायला मुबलक जागा मिळून त्याचा बिलकूल कोंडमारा होत नाहीं! मग तो चळवळ कशाला करील? आणि मग कोलंबसासारखा शोधक निपजून असल्या वाचकांकरितां एखाद्या वाङ्मयात्मक सुवर्णभूमीचा शोध करण्याची कल्पना तरी त्याच्या मनांत कशाला येईल? असल्या सुवर्ण-भूमींची कल्पना जागेपणीं तर काय, पण स्वप्नांत सुद्धां मज गरीबाच्या कधीं मनांत आली नाहीं. मी आपला सहज गमतीनें सहल करायला म्हणून निघालों तों आतां नकळत ओघाच्या धारेंत सांपडलों. माझ्याबरोबर तुम्हाला आणल्यानें तुमची फसवणूक झाली खरी, पण आतां काय इलाज? नौका ढकलली आहे खरी. आतां माझ्या हातून जेव्हां ही कधींकाळीं किनाऱ्याला लागेल, त्या वेळीं तुमची सुटका होणार आहे. तोंपर्यंत मी जर ही नीट रीतीनें चालविली तर ठीक आहे. जर नीट रीतीनें चालविली नाहीं किंवा कांहीं तरी करून निदान तुमची सुटका केली नाहीं, तर तुम्ही काय कराल हें मी जाणून आहे. कोलंबसानें सुवर्णभूमीसारखें ध्येय पुढें ठेवलें असतांहि त्याचे लोक त्याला अनेक वेळ वैतागून समुद्रांत बुडविण्यास तयार झाले होते. मी समुद्राच्या धारेला तर लागलों आहे. आणि माझ्यापुढें चित्त गुंगवून टाकणारें असें कोणतेंच ध्येय नाहीं. वहातां वहातां रत्नाकाराच्याच कृपेनें तुमच्या शरीराला, बुद्धीला आणि मनाला साजतील, पटतील आणि रुचतील अशा प्रकारचे कांहीं अलंकार जर मला तुम्हांला देतां आले तर बरें. नाहीं तर खालीं पाणी आणि वर आकाश असला कंटाळवाणा देखावाच जर मी तुम्हाला दाखवूं लागलों, तर त्याच रत्नाकराच्या पोटांतून पुराणकालीं निघालेल्या चौदाव्या रत्नानें तुम्हीच मला विभूषित करून रत्नाकराच्या पोटांतील रिकामी झालेली जागा भरून काढण्याकरितां माझी तेथें रवानगी कराल हें उघड आहे!

---